# चितोडचा चंद्र.

लेखिका—आनंदीबाई जयवंत.

सन १९३६.



---

किंमत १ रुपया.

# अनुक्रमणिका

# आरंभापूर्वी

भिक्षु अखंडानंद यांच्या गुजराती ' सस्तुं साहित्यवर्धक मंडळा ' तर्फे राजस्थानो इतिहास ' हा प्रसिद्ध झालेला ग्रंथ कांहीं वर्षांपूर्वी वाचण्यांत आला. मूळ ग्रंथ कर्नल टॉड यांचा आहे हें सर्वश्रुत आहेच. राणा लाक्ष याचा ज्येष्ठ पुत्र चंद्रसिंह याचे विषयींचा कथाभाग वाचून तो अतिशय हृदयंगम वाटल्यामुळें ' चितोडचा चंद्र ' ही ऐतिहासिक कादंबरी लिहिली. परंतु अलीकडे ऐतिहासिक कादंबऱ्यांचें युग मागें पडून सामाजिक कादंबऱ्यांचाच झपाट्यानें प्रसार होऊं लागला आहे, नवमतवाद, साम्यवाद यासारख्या :विषयावर चर्चा होऊं लागली आहे; अशा परिस्थितींत ऐतिहासिक कादंबरी वाचकांस कितपर्यंत रुचेल ही शंकाच आहे.

कादंबरी लिहून झाल्यानंतर याच कथानकावर सुप्रसिद्ध लेखक श्री. ना. ह. आपटे यांची 'रजपुतांचा भीष्म' ही कादंबरी सुमारें वीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाल्याचें कळलें. तेव्हां आपण उगाचच इतका खटाटोप केला असें वाटूं लागलें. नंतर 'रजपुतांचा भीष्म' ही कादंबरी वाचून पाहिली.ती चंद्रसिंहाच्या चरित्रावर जरी रचलेली असली तरी दोन्ही कादंबऱ्यांचीं कथानकें अगदींच भिन्न आहेत, असें जिज्ञासू वाचकांस सहजच आढळून येईल.

ही कादंबरी लिहिल्यानंतर ' जगाशीं बंडखोरी ' ही कादंबरी लिहिली, परंतु या कादंबरीला प्रसिद्ध होण्याचा योग मात्र मागाहून येत आहे.

ही कादंबरी प्रसिद्ध होण्यास श्री. जानकीबाई प्रधान यांची मला फार मदत झाली. तसेंच चित्रशाळेचे मालक श्री. शंकर नरहर जोशी यांनीं प्रकाशनाचें कार्य हातीं घेऊन पुस्तकाची सजावट शक्य तेवढी चांगली केली. माझे वडील बंधू ती. ग. द्वा. कोर्डे यांनींहि ज्या उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल मी वरील मंडळींची आभारी आहे.

या कादंबरीनें रसिकांची कितीशी करमणूक होईल हें त्यांचेवरच सोपविणें बरें.

' कोर्डे लॉज ' बडोदें
२२-३-३६

**आनंदीबाई जयवंत**

ऐतिहासिक कादंबरी

# चितोडचा चंद्र

## प्रकरण १ लें

## दरबार

महाराणा लाक्ष उर्फ लाखाराणा आपल्या सरदारसामंतांसह दरबारांत बसले होते. शिसोदिया कुलभूषण लाक्ष इ. स. १३८३ मध्यें चितोडचें सिंहासन शोभवीत होते. राणाजीच्या कारकीर्दीत मेवाडची राजलक्ष्मी अत्यंत वृद्धि पावली होती. राणाजी महाप्रतापी होते, राज्यावर बसतांच मेरवाडा नांवाचा पहाडी मुलुख जिंकून राणाजींनें आपल्या राज्याला जोडला होता; तसेंच अंबर जवळील नगराचलच्या शंकलवंशीय कित्येक रजपूत राजाना जिंकून तोहि प्रांत आपल्या सीमेला जोडला. स्वजातीयाशीं लढूनच त्यांनीं विजय मिळविला नव्हता, तर प्रचंड बादशाही सेनेचा पराभव बिदनौरजवळ करून प्रत्यक्ष दिल्लीपतीलाहि आपल्या शौर्यानें दरारा बसविला होता. चितोडचीं वीररत्नें एक एक अशी होतीं कीं, प्रातःस्मरणांत त्याचीं भक्तिभावानें नावें ध्यावीत. स्वदेशप्रेमी राजांत महाराण्याची प्रामुख्यानें गणना होत होती. महाराणा जसे शूर तसेच कलाप्रेमी होते, त्यानीं आपल्या अमदानींत चितोडपुरीची शोभा अमरपुरीसारखी केली होती, शिल्पकलेची राणाजीला फार आवड होती, उत्तमोत्तम शिल्पकलेच्या मोठमोठ्या सुंदर इमारती बाधवून जलाशयानें युक्त अशीं अनेक सरोवरें ठिकठिकाणीं खोदविलीं होतीं, * चप्पन नांवाच्या भिल्ल प्रदेशात एक

---

* १ महाराणा लाक्ष इ. स. १३८३ मध्यें चितोडच्या सिंहासनावर बसला व सिंहासनावर बसतांच त्यानें मेरवाडा मुलुख जिंकून प्रसिद्ध विराटगडचा नाश करून त्याच्यावर बिदनौर नांवाचा दुर्ग बांधविला. राणा लाक्षानें दुसरें पण एक महत् कार्य केलें व त्यामुळें तो फार प्रसिद्धीला येऊन त्याच्या

[ पुढें चालू ]

चांदीची व कथलाची मोठी खाण सांपडली होती व त्या खाणीचें जें उत्पन्न येई त्यांतून राणाजी चितोडनगरीची शिल्पकला वाढवीत होते. ८०–८५ वर्षांपूर्वी दुष्ट अल्लाउद्दीनानें चितोड भस्म करून टाकलें होतें, त्याच्या दश-गुणानें राणाजीनें आतां त्या पुण्यनगरी चितोडला शोभा आणली होती. अल्लाउद्दीनानें सती पद्मिनीचा तेवढा महाल ठेवून बाकी सर्वांचा विध्वंस केला होता, परंतु राणाजीनें आतां त्याचा पुनरुद्धार केला होता.

राणाजींच्या कारकीर्दीत सर्व प्रजा आनंदांत होती,राणाजी आपल्या पूर्वजां-सारखेच शूरवीर–धीरगंभीर होते. जनतेचा न्यायनिवाडा ते भरदरबारांत आपण स्वतःच करीत, त्यामुळें अगदीं गरीबालाहि योग्य न्याय मिळून सर्व राणाजीला धन्यवाद देत.

आजहि नित्याप्रमाणें दरबार भरला होता. त्या दिवसाचे न्यायनिवाडे झाल्यानंतर राणाजीनें आपल्या सल्लागार मंडळाबरोबर राज्यासंबंधी इतरहि चर्चा केली. राणाजी गुणाचे चहाते असल्यामुळें त्यांचें लक्ष एखाद्या लहानसान सरदारापासून मोठ्या सामंतापर्यंत सारखें असे व सर्वांची योग्यता ते जाणून असत.

दरबार बरखास्त होण्याची वेळ आली आणि राणाजी आतां उठणार तोंच " खम्मा, महाराणा, खम्मा, " म्हणून दरवाजाशीं कोणी तरी उच्च स्वरानें ओरडलें.

" कोण आहे रे, " महाराणाजीनें मोठ्यानें विचारलें. एक दूत पुढें आला व हात जोडून म्हणाला, " मारवाडाधिपतीकडून पुरोहित महाराज आले आहेत. "

---

राज्याचा विस्तारहि पुष्कळ वाढला. राणा लाक्षापूर्वी चितोडच्या सिंहासनावर राणा क्षेत्रसिंह होता, त्यानें भिल्ल लोकांचा ' चप्पन ' नांवाचा देश जिंकून घेतला होता, त्या देशांत ' जावडा ' नांवाच्या ठिकाणीं चांदी आणि कथील यांची खाण निघाली होती. असेंही म्हणत कीं, त्या स्थानांत सप्त धातु निघत परंतु आतां सात धातु निघत नाहींत. सोनें तर मुळींच निघत नव्हतें, पूर्वी चांदीमिश्रित कथील मात्र पुष्कळ निघे. त्या खाणीचें जें उत्पन्न येई तें राज्याच्या वृद्धिसाठींच खर्च करण्यांत येऊं लागल्यामुळेंच राज्यविस्तार अधिक झाला.

भिक्षु अखंडानंदकृत राजस्थाननो इतिहास.

" येऊं द्या त्यांना आंत. " राण्यानें हुकूम केला. इतर सरदारांकडे वळून ते म्हणाले, "मंदोरच्या राठोड रणमल्लजीकडून पुरोहित कशाला आला असेल?"

" कळेलच आतां. " वृद्ध माधोसिंग म्हणाले. इतक्यांत पुरोहित स्वतः दरबारांत येऊन राणाजीला आशीर्वाद देऊन उभा राहिला.

" बसा. पुरोहित महाराज बसा. राजा रणमल्लजींचा काय निरोप आहे ? " राणाजींनीं पुरोहिताला प्रश्न केला.

मेवाडाधीशाचें तें वैभव व राणाजींची धीरगंभीर मूर्ति पाहून बिचारे पुरोहित महाराज अगदीं लटपटून गेले होते. परंतु आपल्या जवळचें श्रीफळ राणाजींपुढें ठेवून ते म्हणाले, " महाप्रतापी शिसोदिया कुलचूडामणि ! आमच्या राजेसाहेबांनीं हें शुभदायक श्रीफळ आपल्या कुमार चंद्रसिंहासाठीं पाठविलें आहे, याचा आपण स्वीकार करून राजेसाहेबांना धन्य करावें अशी त्यांची विनंति आपल्या चरणांजवळ आहे."

" अस्सें, अस्सें. एकंदरींत रणमल्लजींना आमच्याशीं संबंध जोडायचा आहे होय ना ? " कांहींशा थट्टेच्या स्वरांत राणाजी बोलले, " बरें आहे, पुरोहित महाराज, आम्ही याचा अवश्य विचार करूं !"

" पण कन्येचें वय काय आहे ? " माधोसिंगानें मध्येंच विचारलें.

" आमची राजकन्या तेरा वर्षांची आहे तेव्हां दोघांचा जोडा चांगला शोभेल. " पुरोहित म्हणाला.

" खरंच, बरं आहे, पण कुमाराला विचारून आम्ही तुम्हांला कळवितों." नंतर आपल्या पांढऱ्या दाढीवरून हात फिरवीत व किंचित् हास्यपूर्वक राणाजी म्हणाले. " काय हो माधोसिंग, हे पुरोहित हें श्रीफळ घेऊन आले आहेत, असलीं खेळणीं कोणी या अशा पांढऱ्या दाढीमिशीला आणणार नाहींत खरं ना ?"

राणाजींच्या या थट्टेच्या वाक्यानें दरबारांत एकच हंशा पिकला. आज राणाजींना थट्टाच करण्याची लहर लागली होती; श्रीमंतांची लहर ती; त्यांची मर्जी सुप्रसन्न करून घ्यावयाला सर्वच उत्साहित दिसत होते. त्याच विषयावर आणखी थोडा वेळ त्यांचा थट्टाविनोद चालला होता. परंतु कुमार चंद्रसिंह तेथें केव्हा आला हें प्रथम कोणालाच कळलें नाहीं. इतक्यांत माधोसिंगाचें लक्ष त्याचेकडे गेले. " महाराणाजी, हें पहा, कुमारच येथें आले आहेत यांना आतां विचारावें. कुमार, या इकडे. "

कुमारानें आपल्या पित्याला लवून नमन केलें व तो जवळच आदबीनें उभा राहिला. मंदोरच्या पुरोहिताचें आगमन कां झालें हें राणाजींनीं कुमाराला थोडक्यांत सांगितलें. पुढें असलेला नारळ बोट दाखवून ते म्हणाले, " या श्रीफळाचा स्वीकार केला म्हणून सांगूं ना ? "

कुमारानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, पण त्याचा चेहरा बराच गंभीर दिसत होता. पुनः राणाजींनीं तोच प्रश्न केला, तरी पण कुमार गप्पच. कुमाराच्या या स्तब्धपणाचा कोणालाच अर्थ समजेना आणि जो तो आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागला.

" कुमार, कांहीं बोलत नाहींस याचा अर्थ काय ? " भुंवया चढवून किंचित् मोठ्यानें राणाजी म्हणाले..

" पिताजी, याचं कारण मी इथं सांगत नाहीं, पण या मुलीशीं मला लग्न करायचं नाहीं. "

" त्याचें कारण ? " कांहींशा कठोरपणानें राणाजी म्हणाले. कुमारानें उत्तर केलें नाहीं.

" तूं विचार करून उत्तर दिलें नाहींस, जा. याचें उत्तर मला उद्यां दे. जा."

" उद्यांहि माझं हेंच उत्तर आपणास मिळेल. " इतकें म्हणून कुमार निघून गेला.

कुमाराच्या या विचित्र वर्तनाचा कोणालाच बोध होईना !

आपल्या या ज्येष्ठ पुत्रावर राणाजींचें फार प्रेम होतें, आणि कुमार चंद्रसिंह तसाच गुणी व शूर राजपुत्र होता. तो कोणतीहि गोष्ट अविचारानें करीत नसे, हें राणाजीस ठाऊक होतें; मग त्यानें आतांच असें अविचाराचें उत्तर का दिलें याचें राणाजीस गूढ पडलें. कुमाराचा एखाद्या चांगल्या राजकन्येशीं विवाह करण्याचा राणाजींचा विचार होता व कन्येसाठीं आसपास शोधहि चालू होता. मारवाडच्या राजाची उपवर मुलगी चांगली रूपवान् आहे हें राणाजीला कळलें होतें; अनायासें रणमल्लाकडूनच विवाहाचा नारळ येताच हा शुभ शकुन समजून तें स्थळ नक्की करून टाकावें असें राणाजीस वाटल्यास नवल नाहीं. परंतु कुमाराच्या या विचित्र उत्तरानें राणाजी कुमारावर कांहींसे रागावले होते.

असो; नंतर पुरोहिताची नीट व्यवस्था ठेवावयास सांगून राणाजी आपल्या खास महालांत गेले व दरबार बरखास्त झाला.

## प्रकरण २ रें

# प्रतिज्ञा

दुसरे दिवशीं सकाळींच राणाजी आपल्या खास महालांतील एका खाजगी दालनांत लोडावर रेलून पडले होते व हुक्क्याची नळी ओठांत धरून कांहींतरी आत्मगत विचार करीत होते. त्याच्या अंतरंगांतील पांचसहा मंडळी तेथें होती. राणाजी स्तब्ध बसलेले पाहून मंडळींनाहि स्तब्धतेचा भंग करण्याचें साहस होईना, कारण आज राणाजी कुमार चंद्रसिंहावर फारच रागावले होते. आधले दिवशीं भरदरबारात कुमारानें मारवाड राजकन्येसंबंधीं जो नकार दिला होता तो त्याचा कायमच होता. कुमाराचा मित्र संग्रामसिंह राणाजींच्या बोलावण्यावरुन तेथें आला व राणाजीला नम्रपणें प्रणाम करून उभा राहिला.

त्याच्याकडे भुवया चढवून पहात राणाजी म्हणाले, " संग्राम, कुमाराला पुनः माझा निरोप सांगितलास ? "

" होय. "

" मग तो काय म्हणतो ? "

" त्याचें तेंच उत्तर आहे. " खालीं पहात संग्राम म्हणाला.

" मूर्ख. कांहीं तरी दुराग्रहानं म्हणत आहे झालं, पण काय रे ? कांहीं कारण सांगितलं का त्यानं कां उगाच भलताच हट्ट घेऊन बसला आहे ? "

" कुमारानीं कारण सांगितलं पण- "

"पण काय ? काय कारण सांगितलं ? "

संग्रामसिंहाला आता सांगणें भागच पडलें. तो भीतभीतच म्हणाला— "कुमाराचं असं म्हणणं आहे कीं, जो संबंध वडिलांनीं थट्टेत कां असेना, मनांत आणला तो मला शिरसामान्य केला पाहिजे; म्हणून ही मुलगी मला मातेसारखी पूज्य आहे. तिच्याशीं मी कालत्रयीं विवाह करणार नाहीं. "

राणाजी क्षणभर आश्चर्यचकित झाले ! " काय, काल मी जी गोष्ट सहज थट्टेत बोललों त्याचा अर्थ या मूर्ख पोरानें असा केला अं ? कुमाराला आजपर्यंत मी शहाणा समजत होतों. ऐका, सरदारहो, ऐका, कुमाराचं बोलणं ऐका. " सरदारांकडे वळून राणाजी म्हणाल. परंतु संग्रामसिंहाच्या भाषणानें त्यांच्या मनाला जोराचा धक्का बसला. नंतर ते चिडून म्हणाले, " संग्राम, जा

त्या वाड्यात पोराला इकडे घेऊन ये. भलतीच कल्पना लढवून मारवाड राजकन्या नाकारतां येत नाहीं. ”

राणाजींची आज्ञा होतांच संग्रामसिंह गेला. राणाजींचा चेहरा क्रुद्ध दिसत होता, सर्वांगाला कंप सुटला होता, दाढीवरून हात फिरवीत ते म्हणाले, “ कांहीं झालं तरी या मुलीला नाकारणं शक्यच नाहीं. ”

“ होय. राणाजी, आपल्या रिवाजाप्रमाणें मारवाडचा नारळ आपल्याला तशाच कारणाशिवाय परत करतां येणार नाहीं. नाहींतर राठोड रणमल्लजींना वाटेल कीं आपण त्यांचा अपमान केला. ” वृद्ध माधोसिंग बोलला.

“ आपल्या रिवाजाप्रमाणें या नारळाचा स्वीकार केलाच पाहिजे. सरदार करणसिंग म्हणाला. “ नारळ परत करणं म्हणजे मारवाडाधिपतीचा जाणून-बुजून अपमान केल्यासारखंच होईल व कन्या नाकारणं आपल्या शीलाला शोभणार नाहीं. पूर्वीच्या पुष्कळ स्त्रिया असल्या तरी चालून आलेली कन्या नाकारणं रजपूताला नामुष्की आणण्यासारखं आहे. ”

“ कांहीं झालं तरी ही कन्या तशाच कारणाशिवाय मला नाकारतां येणार नाहीं. ” राणाजी म्हणाले. “कुमाराला अद्याप तितका व्यवहार कळत नाहीं” परंतु कुमार जसा सुज्ञ तसाच हट्टी आहे हें राणाजी ओळखून होते; तेव्हा त्यानें नाहींच ऐकलें तर काय करावें ? हा पेंच राणाजींना पडला होता. इतक्यांत कुमार स्वतःच तेथें आला व पित्याला प्रणाम करून काहीं अंतरावर आदबीनें उभा राहिला.

“ कुमार ” कपाळाला आठ्या घालून राणाजी म्हणाले, “ संग्रामसिंहाबरोबर तूं जें सांगून पाठविलें तें मला कळलें, पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. उगाच कांहीं कारणाशिवाय मारवाड राजकन्येला मला नाकारतां येत नाहीं. यांत मारवाड राज्याचा अपमान होतो, तेव्हां तुला या कन्येशीं लग्न करावेंच लागेल. ”

“ नाहीं. पिताजी, आपण मला दुसरी वाटेल ती आज्ञा करा, पण ही गोष्ट कालत्रयीं घडणार नाहीं. ” निश्चयी स्वरानें कुमार बोलला.

“ काय, माझी अवज्ञा करतोस ? ” नीट बसून क्रोधानें गर्जना करून राणाजी म्हणाले. हिमालयाला मेघराजाच्या गडगडाटाचें कितीसें भय वाटणार ?

" पिताजी, आपली अवज्ञा करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं; वाटेल ती दुसरी आज्ञा करा, वाटेल तशा बलाढ्य शत्रूशीं झुंझ घ्यायला सांगा, एका क्षणाचाही विलंब न लावता मी रणक्षेत्रांत उडी घेईन. परंतु आपली ही एकच आज्ञा मला मान्य करता येत नाहीं, याचें मलाहि वाईट वाटतें. दुसरा वाटेल तो हुकूम करा."

" दुसरा काय हुकूम करूं ? मी जी गोष्ट तुला सांगतो ती तर तुला ऐकायची नाहीं, मग दुसरें काय सांगणार ? "

" पिताजी, आपणास मी अपराधी वाटत असलो तर माझा शिरच्छेद करायची आज्ञा करा, ती आपली आज्ञा मी आनंदानें मान्य करीन--"

" काय ! " राणाजी मध्येंच म्हणाले, "तुझा शिरच्छेद करूं ! म्हणजे जगांत माझी चांगलीच कीर्ति होईल ! " यावेळीं त्यांच्या मुखावर उद्वेग दिसत होता. कुमार हात बांधून जमिनीकडे पहात उभा होता. आपल्या पित्याच्या रागाकडे अगर उद्वेगाकडे त्यानें लक्षच नव्हतें.

राणाजी पुनः म्हणाले, " विचार कर, अजूनहि विचार कर. कुमार, सहज विनोदात मी जें बोललो त्याचा तूं असा भलताच अर्थ करून दुराग्रह करशील असं मला वाटलं नव्हतं. अरे, हा राज्यभार वाहण्याची आता मला मुळींच इच्छा नाहीं. हें राज्यभाराचं जोखीम तुझ्या हवालीं करून उरलेलं आयुष्य भगवान् एकलिंगजीच्या सेवेंत घालविण्याचं माझ्या मनात आहे. मी आता पुनः संसारात पडेन असं का तुला वाटतं ? संसारातल्या माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत, आता मला कसलीच इच्छा नाहीं. तूं आता तुझा हट्ट सोड, अन् लग्न करून हा राज्यशकट आपल्या हातीं घे. "

महाराण्यानें इतकें सांगितलें, तरी कुमार निःस्तब्धपणें उभा होता. त्याच्या निश्चयी मुद्रेंत यत्किंचित्‌ही फरक पडला नाहीं. किंवा त्यानें पित्याला प्रत्युत्तरहि दिलें नाहीं. राणाजींनीं व इतर सरदारांनीं त्याची नानाप्रकारें समजूत घालून पाहिली. परंतु सर्व व्यर्थ ! त्याचें एकच ठराविक उत्तर. राणाजी त्याच्यावर प्रथम खूप रागावले, नंतर त्यांनीं त्याच्या अनेक प्रकारें विनवण्याहि केल्या, पण कुमार कशानेंहि वळला नाहीं. अखेरीस कंटाळून गेल्यामुळें, काय करावें हें राणाजींना सुचेना. ज्या पुत्रावर त्याचें प्राणाधिक प्रेम होतें, त्याच्या मुळेंच आता त्यांना प्राणांतिक वेदना होऊं लागल्या ! कोणत्याच उपायानें त्याची समजूत पडणें शक्य होईना !

" मग तुझा विचार कायमच आहेना ? या मुलीशीं तूं लग्न करणार नाहींस ? " निर्वाणीनें राणाजी म्हणाले.

" मी तिला माझी माता समजतों, तेव्हां तिच्याशीं लग्न करण्याचा आपण मला आग्रह करूं नये. "

झालें ! राणाजींचे सर्व उपाय खुंटले ! ज्या मुलीविषयीं आपल्या पित्यानें थट्टेंत कां असेना ते शब्द उच्चारिले, तेव्हां आतां त्या मुलीशीं आपण विवाह करणें त्या मानधन राजकुमारास असह्य वाटूं लागलें. आपल्या पूज्य पित्याच्या रागाची अगर विनवण्यांची त्यानें पर्वा केली नाहीं. कुमाराच्या या हट्टीपणा-मुळें मात्र राणाजींना अत्यंत दुःख झालें, एक दीर्घ निश्वास सोडून ते म्हणाले. "बरं आहे. त्या मुलीला आतां मला नाकारतां येणार नाहीं. मारवाड राजाला मी काय सांगणार ? ही गोष्ट कळल्यानंतर त्या मुलीशीं आतां कोणीच विवाह करणार नाहीं, मलाच तिच्याशीं विवाह केला पाहिजे. " राणाजींच्या आवाजांत कंप होता व त्यांना अतिशय कष्ट होत आहेत असें दिसत होतें. " मी तर त्या कन्येशीं लग्न करतोंच, पण कुमार, तुला बजावून सांगतों कीं, ईश्वरेच्छेनें त्या मुलीला जर मुलगा झाला तर राज्याधिकाराचा तुझा हक्क नष्ट होईल व चितोडच्या सिंहासनाचा उत्तराधिकारी तो होईल हें लक्षांत ठेव. " महा-राण्याचा स्वर कठोर झाला होता. आपल्या पित्याच्या तोंडचे शब्द ऐकून कुमाराच्या मुखावर मुळींच फरक झाला नाहीं.

" इतकेंच ना ? पिताजी, आपल्या चरणाला स्पर्श करून मी या सर्वांसमक्ष भगवान् एकलिंगजीची आण वाहून सांगतों कीं मारवाड राजकन्येला जर पुत्र झाला, तर तो समस्त मेवाडचा अधिपति होईल. मी माझ्या राजसिंहासनाचा हक्क स्वखुषीनं सोडून देईन व इतर सामान्य सामंतासारखीच चितोडची सेवा करीन. ही माझी प्रतिज्ञा जर मी मोडीन तर चितोड* विध्वंसाचें पातक मला लागेल ! "

---

* मुसलमानांनीं चितोडवर ज्या वेळीं स्वाऱ्या केल्या त्यांत अल्लाउद्दीनानें पद्मिनीसाठीं जी स्वारी केली व चितोडचा जो भयंकर विध्वंस केला, ती गोष्ट रजपूतांच्या जिव्हारीं लागली होती व त्या वेळपासून जर एखादी खरोखरी शपथ घ्यावयाची असली तर रजपूत लोक चितोडविध्वंसाच्या पातकाची घेत आणि वाटेल तें झालें तरी ती पाळीत.

क. टॉडकृत राजस्थानचा इतिहास.

कुमाराच्या तोंडची ती घोर प्रतिज्ञा ऐकतांच सर्वजण चित्रासारखे तटस्थ झाले ! कांहीं क्षण महाराण्याच्या मुखांतून एकहि शब्द निघाला नाहीं !

" कुमार" असली घोर प्रतिज्ञा करूं नका. राणाजींना तुमच्या या वागण्यानें किती दुःख होत आहे हें तुम्हाला कळत नाहीं कां ? " अखेरीस वृद्ध माधोसिंग कंपित स्वरानें म्हणाला. पित्याचें सांगणें इतका वेळ ज्यानें मान्य केलें नाहीं, तो कुमार प्रतिज्ञेचा उच्चार झाल्यावर माघार घेणें शक्यच नव्हतें.

" जाऊं द्या, माधोसिंग, आतां बडबड करण्यांत अर्थ नाहीं. भगवान एकलिंगजीचीच इच्छा म्हटली पाहिजे ! ":राणाजी दुःखपूर्ण स्वरानें म्हणाले."पुनः संसारांत पडून या आपत्ति मीं भोगाव्या अशी शंकराचीच इच्छा असली पाहिजे; नाहीं तर इतक्या थराला या गोष्टी कां आल्या असत्या ? सहज गोष्टीला इतकं खरं स्वरूप कां आलें असतें ? जा कीर्तिसिंग, मारवाडच्या पुरोहिताला सांगा कीं, तुमच्या नारळाचा स्वीकार केला आहे व कन्येशीं मी स्वतःच विवाह करणार आहे. "

राणाजींच्या चेहऱ्यावर पूर्ण औदासिन्य दिसत होतें. कुमारला जाण्याला त्यांनीं आज्ञा केली, त्यालाहि तेथें अधिक रहाण्याची इच्छा नव्हती. आपल्या वृद्ध, परमपूज्य पित्याला दुःख देण्याला आपणच कारण आहोंत हें तो जाणून होता. परंतु ज्या स्त्रीला एकदां माता म्हणून म्हटलें, तिचा स्वीकार करणें भयंकर पातक आहे असें त्याला वाटत होतें. आपल्या तत्त्वासाठीं पित्याचा क्रोध व राज्यत्याग त्यानें स्वखुषीनें पतकरला आणि तशी घोर प्रतिज्ञाहि घेतली, तो खरा रजपूत वीर होता. आपल्या शब्दाची किंमत त्याला कळत होती !

## प्रकरण ३ रें

# " भवितव्यता बलीयसी "

दैवाची लीला किती विचित्र आहे पहा ! पन्नास वर्षांच्या राण्याला एका तेरा वर्षांच्या बालिकेशीं विवाह करावा लागला ! या वयांत पुनः संसारांत पडण्याची राणाजींची मुळींच इच्छा नव्हती, परंतु सहज शब्दांत अडकून त्यांना संसारचक्रांत पुनः भ्रमण करावें लागलें ! आपण आतां स्वर्गाच्या पाय-

रीवर पाय ठेवणार असें त्यांना वाटत होतें, तोंच संसारगर्तेत आपण पडलों असें वाटूं लागलें !

चंद्रसिंहाचा विवाह करून आपण श्रीशंकराची सेवा करावयाची हा विचार बाजूला राहून त्यांना संसारांत पडावें लागलें. ईश्वरी सूत्र किती चमत्कारिक आहे पहा !

स्वतः राणाजींनींच आपल्यासाठीं मागणी घातली व तिला होणाऱ्या मुलांस राज्य मिळेल असा भरवंसा वाटल्यावरून मारवाडाधिपति रणमल्लांनीं आपली कोवळी कन्या राणाजींच्या उतारवयाकडे न पहाता त्यांना अर्पण केली ! आपल्या या पत्नीच्या सहवासांत राणाजींना मोठें सुख लाभत होतें असें मुळींच नाहीं, ते इतर राज्यव्यवस्था करून बराच वेळ ईश्वरचिंतनात घालवीत असत. या विवाहासंबंधीं कुमाराचा व त्यांचा बराच खटका उडाला होता. तरी आपल्या या पुत्रावर त्यांचें फार प्रेम होतें. त्यांना इतरहि मुलें होतीं, परंतु विशेष मर्जी चंद्रसिंहावरच होती. ते कुमाराशीं पूर्वीच्या प्रेमळपणानेंच वागत होते, पण कुमारालाच एकप्रकारचा संकोच वाटत होता. आपण आपल्या पित्यास त्याच्या मर्जीविरुद्ध हें लग्न करावयास भाग पाडलें हें शल्य त्याला टोंचीत होतें. इतर कोणत्याही बाबतींत त्यानें पित्याची अवज्ञा केली नव्हती.

आपलें लग्न झाल्यानंतर कुमाराच्या लग्नासंबंधीं राणाजींनीं गोष्टच काढली नाहीं. तो स्वतःच एखादी मुलगी पसंत करील असें त्यांनी मनाशीं ठरविलें होतें. कुमारहि आपल्या विवाहासंबंधीं उदासच होता. आपल्या विवाहामुळेंच ही भानगड उपस्थित झाली हें तो जाणून होता. त्याची एकंदर वृत्तीच उदास बनून गेली. राज्यकारभारांतहि तो फारसें लक्ष घालीत नसे; व मुख्य व्यवसाय म्हणजे मृगया, यांतच तो आपला बहुतेक काल व्यतीत करूं लागला. राणाजींनीं बळेंच एखादें राज्याचें कार्य त्याचेकडे सोंपविलें तर तें कर्तव्य म्हणून तो करीत असे. चितोडची होईल ती सेवा करावयाची इतकेंच. त्यानें केलेल्या प्रतिज्ञेचें त्याला विस्मरण व्हावें म्हणून राणाजी काळजी घेत व कधीं स्वतः उच्चार करीत नसत व दुसऱ्या कोणालाहि न करण्याची सक्त ताकीद होती. परंतु त्य मानी स्वभावाच्या कुमाराला आपल्या प्रतिज्ञेचें विस्मरण झालें नव्हतें. तो आपल्या पित्याला शक्यतों दुखवावयाचें नाहीं अशा धोरणानें तो वागत होता.

अशा स्थितींत दोन वर्षें लोटलीं. कुमार अद्याप अविवाहितच होता, पुष्कळ राजांच्या व सरदारांच्या रूपसुंदर मुली त्याला सांगून आल्या, पण त्यानें कोणालाच धड जबाब दिला नाहीं. राणाजीहि त्याच्या मर्जीविरुद्ध कोणाला उत्तर देऊं शकत नव्हते

कुमार आपल्या चंद्रमहालांत अस्वस्थ मनानें शतपावली घालीत होता. कारण रामपुरच्या राजकन्येशीं त्यानें विवाह करावा असा दरबारी लोकांचा राणाजींना आग्रह चालला होता ही गोष्ट त्याला कळली होती व त्याला हा संबंध करावयाचा नव्हता. कुमाराच्या विचाराचा भंग करून वृद्ध मेरामण आत आला. " मेरामण, कां आलास ? " कुमारानें विचारलें.

" सिंहबापू, मेरा आता म्हातारा झाला, " आपली लांब पांढरी दाढी हातात धरून तो म्हणाला.

" मग तुझा विचार काय आहे ? मेरा, दाढीला काळा रंग देणार आहेस कां छाटून टाकणार आहेस ? " किंचित् स्मित करून कुमार म्हणाला.

" बापू, बापू, ही दाढी छाटून टाकण्यासाठीं इतकी लांब वाढविली नाहीं."

"मग तुझं म्हणणं तरी काय ? " कोचावर एक पाय ठेवून कुमार म्हणाला.

" बापू, तुम्हाला आठवत नसेल, पण ही काळी दाढी होती तेव्हा तुम्ही रोज हिच्याशीं खेळत होतात. अन् माझ्या डोळ्यांतून पाणी येईपर्यंत ओढत होतात. "

" खरंच " कुमार हसला " मेरा, पण आता तर मी ओढत नाहींना, मग तुझी तक्रार काय आहे ?

" बापू, तुम्ही ओढत नाहीं हें खरं पण—"

" पण काय बाबा ? "

" पण, तुमच्या कच्च्याबच्च्यांनीं या पांढऱ्या दाढीशीं खेळावं अशी या म्हाताऱ्या मेराची इच्छा आहे ? बापु, मी मरायच्या अगोदर ही एकच इच्छा माझी राहून जाईल. "

कुमाराची मुद्रा गंभीर झाली ! " मेरा, भगवान् एकलिंगजीच्या इच्छेविरुद्ध आपल्या हातून कांहीं होऊं शकत नाहीं. "

" पण तुमचीच इच्छा नाहीं तिथं एकलिंगजी तरी काय करणार ! "

" मेरा, या गोष्टी जाऊं दे. जा संग्रामाला बोलावून आण. मला मृगयेला

जायचं आहे." बिचारा मेरामण निराश झाला. इतक्यांत स्वतः संग्रामसिंहच तेथें झाला. त्याच्याकडे पाहून कुमार म्हणाला. " संग्राम, बरं झालं तूं आलास. या मेरानं मला आज नसतेच प्रश्न विचारायला सुरवात केली होती, चल, आपण मृगयेला जाऊं."

" मेराकाका, काय विचारीत होतां तुम्ही ?" संग्रामनें मेराला विचारलें.

" दुसरं काय ? त्यांनीं आपला हट्ट सोडून या चंद्रमहालाला मालकीण आणावी असं मीं म्हणत होतों, पण माझं भाग्य इतकं कुठें आहे?" मेरामणनें एक लांब सुस्कारा सोडला.

" कुमार, माझं सुद्धां तसंच म्हणणं आहे अन् राणाजीपासून सर्व लोकांनाहि वाटतं कीं, आपण आतां किती दिवस असेंच रहाणार ?"

" खरंच सांगूं संग्राम, तो विचारच मीं बहुतेक सोडून दिला आहे !"

" छे, छे, भलतंच कांहीं तरी ! कुमार, पिताजींना आधींच किती वाईट वाटतंय अन् आपण जर असे आजन्म अविवाहित राहिलांत तर त्याना किती क्लेश होतील बरं ? तुमच्या प्रतिज्ञेमुळं त्यांना किती वाईट वाटतंय ! तुम्ही केवढा स्वार्थत्याग केला आहे हा !"

" संग्राम, त्यांत मी मोठसं कांहीं केलं नाहीं, पित्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करणं हा पुत्रधर्मच आहे. त्यांत मी बहादूरी ती काय केली ? भीष्माचार्यांनीं आपल्या पित्यासाठीं नाहीं का प्रतिज्ञा केली अन ती पाळली ! मग आम्हाला सुद्धां तसं कां करतां येऊं नये ?"

" कुमार, भीष्माचार्यांची गोष्ट वेगळी होती. राजा शंतनूचें मत्स्यगंधेवर मन बसलें होतें व तिच्या प्राप्तीचा ध्यास त्याला लागून राहिला होता. पित्याची इच्छा पूर्ण करण्याकारितां तरुण देवव्रतानें भीष्मप्रतिज्ञा करून तो भीष्माचार्य झाला. आजन्म अविवाहित राहण्याची तुम्ही सुद्धां प्रतिज्ञा केली आहे कीं काय ?" संग्राम कांहींसा घाबरून म्हणाला.

" घाबरूं नकोस संग्राम, मी फक्त राज्यत्यागाची प्रतिज्ञा केली आहे." कुमार किंचित् हंसून म्हणाला.

संग्रामसिंहाला थोडा धीर आला. " कुमार पिताजींच्या इच्छेप्रमाणें तुम्ही लवकर विवाह कां करीत नाहीं ?" कुमार कांहींच बोलला नाहीं. क्षणभर थांबून संग्रामच म्हणाला, "राजस्थानांत पुष्कळ सुंदर कन्या आहेत.रामपुरच्या

राजाकडून त्यांच्या कन्येविषयीं सूचना पण झाली आहे व पिताजीनें मला मुद्दाम सांगितलें आहे—"

" अरे, इतकी घाई करण्याचें कारण काय ? तुला मी एक गोष्ट सांगतों. मी राज्यत्याग केला आहे ही गोष्ट कळूनहि जी स्वखुषीनें मला वरील तिच्याशींच विवाह करायचा असं मी ठरविलं आहे. "

" परंतु बिचाऱ्या मुग्धबालिकांचं अंतरंग आपल्याला कळणार कसं ! कुमार, सावित्रीसारखी एखादी राजकन्या आपल्या शोधाला येणार आहे कां ? "

" मग तोंपर्यंत मी वाट पहायला तयार आहे. " कुमार हंसत म्हणाला. इतका वेळ मुकाट्यानें ऐकत असलेला मेरामण मुस्कारा सोडून म्हणाला. "जाऊं द्या, संग्रामसिंह, चितोडचे राजपुरुष फार हट्टी असतात." तो पुढें म्हणाला. " सिंहबापू , मला तुम्ही परवानगी द्या समस्त राजस्थान धुंडाळून सावित्री आणून उभी करतों. "

" मेरा, सावित्रीची पुतळी नको आहे मला. " कुमार हंसून म्हणाला.

" कुमार, एक बातमी ऐकली कां आपण ? " " संग्राम म्हणाला. " कसली "

" आपल्याला लवकर बंधु होणार असं ऐकलं. "

" खरं का हें ! संग्राम, ही गोष्ट खरी असली तर मला केवढा आनंद वाटणार आहे ! "

" गोष्ट खरी आहे. त्यांत आनंद मानण्यासारखं काय आहे ? "

" का बरं ? माझ्या प्रतिज्ञेंतून मी लवकर मुक्त होईन ! "

संग्राम व मेरामण आश्चर्यानें कुमाराकडे पाहूं लागले. " कुमार, तुमची प्रतिज्ञा तुम्ही खरी करणार ? " संग्राम म्हणाला.

" म्हणजे ? मी शिसोदिया कुलांत जन्म घेतला आहे. महाराणा लाक्षाचा मी पुत्र आहे, मला माझ्या प्रतिज्ञेचें विस्मरण झालं असं कां वाटतं तुला ? मुखांतून शब्दोच्चार होऊन गेल्यानंतर जो तो पाळूं शकत नाहीं, धिःकार असो अशा कुलांगार नामर्दाला ! संग्राम, नव्या महाराणीला केव्हां पुत्रलाभ होतो व मी माझ्या कर्तव्यांतून केव्हां मुक्त होतो असं मला झालेलं आहे." कुमाराच्या मुखावर दृढतेचें तेज चमकूं लागलें. संग्राम कांहींच बोलला नाहीं. क्षणभरानें कुमारच म्हणाला. " संग्राम, चल, आपण मृगयेला जाऊं. म्हणजे क्षणभर बरं वाटेल तरी. " दोघेहि उठले.

## प्रकरण ४ थें

# चार वर्षांनंतर

" महाराज, आपण रणक्षेत्रावर गेल्यावर आमचं कसं होणार? "

कुमार मुकुलजींची माता-राणाजींची तरुण पत्नी डोळ्याला पदर लावून म्हणाली.

" कां बरं ! मी गेलों तरी चंद्रसिंह इथं आहे, तो तुम्हांला कांहींच उणं पडूं देणार नाहीं ! "

" आपल्याला तसं वाटतं. बाकी ज्याचं त्याला जसं वाटतं तसं दुसऱ्याला थोडंच वाटणार आहे ? मुकुल तर अगदींच अज्ञान, अन् मी पडलें बायको माणूस. आपण रणक्षेत्रावर जाऊं नये असं मला आपलं वाटतं. "

कांहींसा विचार करून राणाजी म्हणाले, " हें पहा, चंद्रसिंहाविषयीं तुम्ही मनांत भलतीच शंका घेऊं नका. तो तुम्हांला योग्य त्याच सन्मानानें वागवील. लहानपणापासून मला त्याच्या स्वभावाची खात्री आहे. मुकुल चार वर्षांचा झाला, पण हा आपला सावत्र भाऊ असा त्यानें अद्यापपर्यंत भेदभाव दाखविला नाहीं. मग तो माझ्या मागं तसा सावत्रपणा दाखवील असं मला वाटत नाहीं. तूं विनाकारण माझ्या जाण्यात अडथळा आणूं नकोस. तूं क्षत्रियकन्या आहेस व वीरपत्नी आहेस, आपल्या पुण्यक्षेत्र गया तीर्थाच्या उद्धारासाठीं मी जात असतां तुझ्यासारख्या वीरपत्नीनं अडथळा करणं बरोबर नाहीं. दुष्ट यवन आपल्या धर्मक्षेत्राचा विध्वंस करीत असता त्या क्षेत्राला त्यांच्या अपवित्र पंजांतून सोडविणं हें प्रत्येक क्षत्रिय वीराचं कर्तव्य आहे. अन् माझ्यासारख्या एका प्रमुख राजानं तर अवश्यच गेलं पाहिजे. त्यांतून माझं आतां वय झालेलं आहे. हा देह जर रणक्षेत्रावर पडला. तर सत्कारणीं तरी उपयोग झाल्यासारखं होईल व शेवटलं समाधान तरी मला लाभेल. "

आतां तर राणी स्फुंदूनस्फुंदून रडूं लागली. " महाराज, असं बोलून आपण जाऊं लागलांत तर मी काय बोलावं ? खऱ्या मायेचं माझं इथं कोण आहे ! आधींच माझ्यासंबंधीं सर्वांचा वाईट ग्रह झालेला आहे. आपल्यामुळं कोणी स्पष्ट बोलूं शकत नाहींत, पण मग मला कोणाचा आधार ? "

" काय वेडी कल्पना! तुझ्याबद्दल वाईट ग्रह कोणाचा झाला आहे ? काण तसं म्हणतं ? "

" आपल्याला काय ठाऊक. माझ्या मुळंच आपले थोरले चिरंजीव लग्न करीत नाहींत म्हणे ! मीं सांगितलं कां त्यांना ? त्यांत आणखी मुकुलचा जन्म झाल्यापासून त्यांच्या मंडळींना जास्तच वैषम्य वाटूं लागलं आहे; कां तर चंद्रसिंहांनीं कायशी प्रतिज्ञा केली आहे म्हणून. प्रतिज्ञा घ्यायला सुद्धां मीच सांगितलं का ? " राणीसाहेब पुनः पदर डोळ्याला लावून रडूं लागल्या. राणाजी आतां विचारांत पडल्यासारखे दिसले. चंद्रसिंहानें सिंहासनावर न बसण्याची प्रतिज्ञा घेतली खरी, परंतु ती पाळणें सोपें नव्हतें ! चितोडच्या राजसिंहासनाचा त्याग करणं सामान्य माणसाचं कार्य नव्हतं ! उत्तराधिकारी तोच असतां त्यानं राजसंन्यास करावा असेंहि राणाजीस वाटेना ! त्यांचें आपल्या ज्येष्ठ पुत्रावर अलोट प्रेम होतें. मुकुलजीच्या मातेलाही वाटत होतें कीं, आपल्याच मुलानें राजा व्हावं आणि त्यातहि आश्चर्य नव्हतं. मुकुल लहान आहे व त्याची कांहीं तरी व्यवस्था केली पाहिजे खरी, नाहींतर आपल्या मागें इथें बखेडा माजण्याचा संभव आहे असें राणाजीस वाटूं लागलें. चंद्रसिंहाचें व त्याच्या सावत्र आईचें नीट पटलें नाहीं तर ! हें लग्न करून आपण आपल्याला केवढ्या घोर संकटांत घालून घेतलें आहे असें त्यांस वाटूं लागलें. वृद्धावस्था झाल्यामुळें आपल्या हातून ईश्वराची दुसरी सेवा घडत नाहीं; तर निदान धर्मक्षेत्राच्या उद्धारासाठीं धारातीर्थी देह ठेवतां आला तर तितकीच मनाला शांति मिळेल असा विचार करून गयेला युद्धासाठीं जाण्याचा त्यांनीं निश्चय केला, परंतु तरुण पत्नी व अज्ञान मुलाच्या मायामोहांत आतां ते गुरफटूं लागले. आपल्या मागें यांची कांहीं तरी सोय केली पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. चंद्रसिंह अंतर देणार नाहीं पण पुढचें कोणी सांगावें ? राणीच्या भाषणानें त्यांच्या मनांत चंद्रसिंहाविषयीं शंका उत्पन्न झाली. थोडा वेळ विचार करून ते म्हणाले " माझी खात्री आहे. चंद्रसिंह तुम्हाला अंतर देणार नाहीं, तरी पण मी जाण्यापूर्वी तसें त्याच्या जवळून वचन घेईन व मग जाईन. "

" म्हणजे ! चंद्रसिंहाच्या ताब्यांतच आम्हाला देऊन जाणार वाटतं ? " राणी आश्चर्यानें म्हणाली.

" चंद्रसिंह त्रास देईल असं वाटतं कां तुला ? "

" पण मी म्हणतें असं केलं तर ? " कांहीं हेतु मनांत योजून राणी म्हणाली

" काय ? "

" आपल्याला ही लढाईची दगदग कशाला पाहिजे ? आपल्या वतीनं कुमार चंद्रसिंह गेले तर नाहीं कां चालणार ? ते तरुण आहेत, शूर आहेत. खरं पाहिलं तर तरुणानंच संग्रामाला जावं हें योग्य होईल. आपण इथंच भगवान् एकलिंगजीचं भजनपूजन करीत रहावं. "

" छे छे ! लढाईवर जायचा माझा विचार अगदीं ठाम आहे. तूं विनाकारण मोडतां घालूं नकोस. इतके दिवस तुमच्या मायामोहांत अडकून राहिलों तें पुरें झालं. आतां मला माझ्या देहाचं या वयांत तरी सार्थक केलं पाहिजे. " राणाजी निश्चयानें म्हणाले.

" भगवत्‌चिंतन कुठंहि करतां येतं." राणी शब्दावर जोर देऊन म्हणाली.

" आमचा कंटाळाच आला आहे असं दिसतं दुसरं काय ! "

" तसं कां होईना ? " विरक्तपणें राणाजी म्हणाले. " माणसानं आपल्याला जितकं संसारांत गुरफटून घ्यावं, तितका आंत तो गुरफटला जातो. या संसाराचा मला आतां खरोखरीच वीट आला आहे, हें बंधन मी तोडून टाकायलाच पहातों आहे. " दृढ निश्चयानें राणाजी म्हणाले. आपण वाटेल तें केलें तरी आतां त्यांचा निश्चय ढळणार नाहीं हें जाणून कांहीं तरी दुसरी युक्ति योजण्याच्या विचारांत राणीसाहेब होत्या. त्यांना तशी युक्ति सुचलीहि.

" मग आपला विचार कायमच आहे तर ? "

" हो, कायमच . "

" जाण्यापूर्वी मुकुलला सिंहासनावर तरी बसवून जावं."

" मुकुलला सिंहासनावर ! " ते आश्चर्यानें म्हणाले.

" हो, आश्चर्य कां वाटलं !

" चंद्रसिंह उत्तराधिकारी आहे, हें तूं विसरतेस वाटतं ! मुकुल माझा कितीहि लाडका असला तरी खरा अधिकारी चंद्रसिंह आहे हें लक्षांत ठेव. "

" कुमारांनीं तर शपथ घेतली आहे ? चितोडच्या सिंहासनावर न बसण्याची प्रतिज्ञा केली आहे ना ? असं मी ऐकलं आहे, तेव्हां चंद्रसिंह आपली शपथ मोडतील असं मला वाटत नाहीं, ते खरे रजपूत आहेत. " राणीच्या बोलण्यांत खोंच होती.

" होय, त्यानें प्रतिज्ञा केली आहे खरी, तो आपली प्रतिज्ञा मोडणार नाहीं ही गोष्ट खरी असली, तरीपण सिंहासनाचा तूं त्याग कर असं मी त्याला केव्हांहि सांगणार नाहीं. " राणाजी कांहींसे खिन्नपणानें म्हणाले व त्यांना प्रतिज्ञेच्या दिवसाची आठव झाली.

" आपण कशाला सांगायला पाहिजे? त्यांनीं प्रतिज्ञा घेतेवेळीं विचार करू-नच घेतली असेल, अन् आपणसुद्धां त्यांना तसंच बजावून माझ्याशीं लग्न केलं आहे, शिसोदिया कुलातले राजे आपला शब्द मोडत नसतात. " राणाजींनीं कपाळाला आंठ्या घातल्या व ते विचारांत निमग्न झाले. राणीनें त्यांना त्यांच्याच शब्दांत धरलें होतें. आपल्या पुत्रालाच चितोडचें सिंहासन मिळालें पाहिजे ही तिची इच्छा होती व राणाजींच्या हातानेंच त्याला सिंहासनावर बसविलें पाहिजे असें तिला वाटत होतें. न जाणों; राणाजी चितोड सोडून गेल्यावर, चंद्रसिंहानें आपली प्रतिज्ञा मोडून सिंहासन घेतलें तर काय कराव-याचें ? ही तिला भीति वाटत होती.

मनुष्याला थोडासासुद्धा द्रव्यलोभ सुटत नाहीं, मग चितोडचा राजमुकुट झुगारून देणं काहीं तितकें सोपें नव्हतें ! आपल्या लग्नापूर्वी चितोडच्या दरबा-रांत घडलेला सर्व प्रकार राणीला ठाऊक होता. कुमारानें आपल्याला कां नाकारलें हें तिला पुरोहिताकडून कळलें होतें. कुमारासारख्या तेजस्वी तरुणानें नाकारल्यामुळेंच महाराण्यासारख्या वृद्धाशीं आपला विवाह झाला ! हें अपमा-नाचें शल्य तिच्या हृदयात खोल रुतलें होतें व ती मनांतून चंद्रसिंहाचा द्वेष करीत होती. त्याच्या प्रतिज्ञेचा फायदा घेऊन तिला आपल्या पुत्राला सिंहासनाधिष्ठित करून कुमारानें जो आपला अपमान केला त्याचा अंशतः तरी सूड घ्यावयाचा होता. लग्न होऊन सहा वर्षे झालीं तरी तिच्या मनांत तें दुःख ताजेंच होतें. राणीसाहेबांचें मन आपल्याविषयीं साफ नाहीं ही गोष्ट कुमारहि जाणून होता व शक्य त्या कारणाखेरीज तो अंतर्गृहांत जातच नसे. राणाजी कांहीं बोलत नाहीं हें पाहून राणीच पुढें म्हणाली " महाराज, माझं एक राहो, पण मुकुलची आपणांस काळजी वाटत नाहीं कां ? चंद्रसिंह जसे आपले पुत्र तसाच मुकुल नव्हे कां ? असं जर होतं तर आपण या वयात लग्नच करायचं नव्हतं. चंद्रसिंहासारखा कर्ता पुत्र होताच. " तरुण राणीच्य भाषणानें राणाजींच्या अंतःकरणाला तीव्र वेदना झाल्या. दशरथासारखी आपली स्थिति झाली आहे असें त्यांना वाटूं लागलें. विषयलोलूप होऊन त्यांनीं वृद्ध-

पणीं हें लग्न केलें नव्हतें. शिवाय हें लग्न होण्याला मूळ चंद्रसिंहाचा हट्टीपणाच कारण झाला होता. वृद्धपणीं लग्न करून आपण केवढा मूर्खपणा केला हें ते जाणत होते, पण आतां कांहीं इलाज नव्हता.

"बरं आहे." एक दीर्घ सुस्कारा सोडून ते म्हणाले, "मी जाण्यापूर्वी तुझी व मुलाची व्यवस्था लावूनच जाईन. तुला तुझा स्वार्थ पहावयाचा आहे, पण मला सर्व गोष्टींचा विचार केला पाहिजे." कांहींसें रागांतच बोलून राणाजी तेथून उठून दरबारांत गेले. राणीनें रागानें भुंवया चढविल्या व ती विचार करीत बसली. "कांहीं झालं तरी माझ्या मुलालाच सिंहासन मिळालं पाहिजे अन् त्याला सिंहासनावर बसवीन तरच मी खरी रजपुतानी," ती मनाशींच पुटपुटत होती !

## प्रकरण ५ वें

# प्रतिज्ञापूर्ति

महाराणा लाक्ष जेव्हां चितोडच्या सिंहासनावर विराजमान होते, तेव्हां दिल्लीस तघलक घराण्यापैकीं महम्मद तघलक हा राज्य करीत होता. यापूर्वी चितोडचें वैभव फार मोठें होतें. चितोडनगरी प्रत्यक्ष इंद्रनगरी-सारखी वैभवसंपन्न होती. परंतु इ० स० १३०३ मध्यें रमणीरत्न पद्मिनीच्या अभिलाषानें अल्लाउद्दीनानें जेव्हां चितोडवर आक्रमण केलें, तेव्हां अल्लाउद्दी-नाच्या अफाट फौजेशीं आपला निभाव लागणार नाहीं हें जाणून रजपूतवीरांनीं केसरिया करून आपल्या स्त्रिया व द्रव्य यांचा स्वहस्तानें अग्नींत नाश केला ! वीररमणी पद्मिनीनें आपला सुकुमार देह अग्नीच्या भयंकर ज्वालेंत भस्म करून घेतला ! पद्मिनी न मिळाल्यामुळें अल्ला उद्दीनानें संतापून चितोडनगराच्या शोभेचा विध्वंस करून त्याचें स्मशान बनविलें ! तरीपण चितोडचें पावित्र्य इतकें जाज्वल्य होतें कीं, कांहीं वर्षांनीं पुनः राणा लाक्ष यांच्या कारकीर्दींत चितोड पूर्वीच्याच वैभवशिखरावर आरूढ झालें ! अद्यापपर्यंत चितोडच्या सिंहासनावर बसणारे राजे बुद्धिमान व शूर असेच निपजत गेल्यामुळें त्यांनीं आपलें नष्ट झालेलें वैभव पुनः प्रस्थापित

केलें. अल्लाउद्दिनाच्या स्वारीनंतर मेवाडवर दुसरी स्वारी न झाल्यामुळें नगराचें वैभव वाढविण्यास राजांना अवकाश मिळाला. परंतु प्रत्यक्ष चितोडवर जरी यवनांची वक्रदृष्टि वळली नव्हती, तरी भारतवर्षांत इतरत्र त्यांनीं धुमाकूळ माजविला होताच ! ज्या वेळचा हा कथाभाग आहे त्या वेळीं हिंदूंचें जें पवित्र तीर्थ गयाक्षेत्र यावर यवनांनीं आक्रमण केलें होतें व तें विध्वंसून समस्त हिंदूंना चांगलीच दहशत बसेल असें त्यांना वाटत होतें. त्याच वेळेला कांहीं धर्माभिमानी हिंदू राजांचें तिकडे लक्ष जाऊन आपल्या धर्मक्षेत्राला यवनांच्या तडाख्यांतून सोडविण्याचें त्यांनीं ठरविलें व मदतीला इतर राजानाहि आमंत्रणें पाठविलीं.आपल्या प्राणांपेक्षांहि प्रिय अशा पवित्र तीर्थाचें रक्षण करण्यास पुष्कळ राजेरजवाडे धांवून गेले. राजस्थानांतील लहानसहान राजे गेले तेव्हां आपल्यासारख्या राजांनीं सुद्धा अवश्य गेलें पाहिजे असें महाराणा लाक्षास वाटूं लागलें व युद्धावर जाण्याचा त्यांनीं विचार ठरविला.

ईश्वराच्या सेवेला अंतरून वृद्धपणीं विवाहबद्ध व्हावें लागलें ही गोष्ट महाराण्याच्या मनाला तापदायक वाटत होती. तरुण राणीला पुत्रप्राप्ति झाल्यावर आपण तिच्या बंधनातून सुटलों व आतां ईश्वरसेवेंत काल घालवावा असा त्याचा संकल्प झाला होता. त्यात गयेच्या लढाईचें कारण निघालें व त्या पवित्र क्षेत्राला यवनांच्या हातून सोडविण्याचें पुण्य तरी साधून घ्यावें अगर लढता लढता रणक्षेत्रांत या देहाचें विसर्जन करावें असा राणाजींनीं बेत करून राणीलाहि आपला हेतू सांगितला. राणीकडून राणाजी लागलेंच दरबारांत गेले. आपल्या दरबारी मंडळींनाहि तोच बेत त्यांना सांगावयाचा होता.

राणाजी दरबारांत येतांच सर्वांनीं उठून त्यांना खडी ताजीम दिल्यावर ते आसनस्थ झाले व आपल्या अमात्याकडे वळून म्हणाले, " रामसिंग कुमारचंद्रसिंहाला बोलवायला पाठवा. " आज्ञेप्रमाणें रामसिंगानें एका दूताला कुमाराला बोलवावयास पाठविला. राणाजींच्या मुखावर विलक्षण गंभीरपणा दिसत होता. कांहीं तरी तसाच प्रकार आहे असें जाणून दरबारी मंडळी कुतूहलानें व आतुरतेनें कुमाराची वाट पाहूं लागले. दरबारांत अगदीं निःस्तब्धता पसरली होती, इतक्यांत कुमारानें धीरगंभीरपणानें दरबारांत प्रवेश केला व आपल्या पित्याला प्रणाम करून तो उभा राहिला.

" पिताजी, काय आज्ञा आहे ? " कुमारानें शांततेचा भंग केला.

" कुमार, तुम्हां सर्वांना मला सांगायचें आहे कीं, मी स्वतः गयाक्षेत्राच्या मोहिमेवर जाणार आहे."

" काय ? रणक्षेत्रावर ?" कुमार आश्चर्यानें म्हणाला. " पिताजी, आम्ही इतके सर्व असतां स्वतः आपल्यालाच कशाला जायला पाहिजे ? मला आज्ञा द्या मींच जातों."

" छे ! कुमार, मीच जाणार आहे. पुण्यक्षेत्राच्या उद्धारासाठीं धांवून जाणं आपलं क्षत्रियांचं कर्तव्य आहे अन् त्यांत पुण्यहि आहे. आतां मला वृद्धाला तितकं तरी साधून घेतलं पाहिजे म्हणून मीच जाण्याचा विचार निश्चित केला आहे. म्हणून तुला इथं बोलावून सांगितलं."

" पिताजी, पुण्यक्षेत्राच्या उद्धारासाठीं रणक्षेत्रावर जायला कोणता खरा रजपूत माघार घेईल ! खरं म्हटलं तर आम्ही तरुणांनींच रणक्षेत्रांत उडी घेतली पाहिजे, आम्हाला तसा हक्कच आहे. तेव्हां पिताजी, आपण मलाच आज्ञा द्या."

" अं हं ! कुमार, या वेळीं मी कोणालाच जाऊं देणार नाहीं. मी कामास आलों तर माझ्या देहाचं सार्थक होईल. हा देह केव्हां पडेल याचा नियम नाहीं, तेव्हां अशा सत्कार्यांत जर पडला तर अधिक काय पाहिजे ? इतके दिवस मी संसारसागरांत गटांगळ्या खात होतों. या निमित्तानं मला ईश्वर-सेवा घडत आहे. त्यांत कोणी मोडता घालूं नका. कुमार, लढाईवर तरुणांनीं जावं हें खरं आहे, परंतु माझ्या मागं इथं पुष्कळ जबाबदारीचीं कामं तुझ्या शिरावर आहेत."

" महाराणाजी, आपल्याबरोबर मलाहि येण्याची परवानगी असावी." माधोसिंग उठून म्हणाले. " कारण या संसाराचा मलाहि आतां कंटाळा आला आहे."

" बरं आहे, माधोसिंग, तुम्हीहि माझ्याबरोबर चला. ज्या कोणाला संसाराचा वीट आला असेल त्यानं आमच्याबरोबर यावं." राणाजी किंचित् स्मित करून म्हणाले. कुमारनें व इतरांनीं पुष्कळ प्रकारें सांगून पाहिलें, पण राणाजींचा निश्चय रतिमात्र ढळला नाहीं. अखेर राणाजींनीं जावें असेंच ठरलें. त्यांच्या बरोबर माधोसिंहादि वृद्ध सरदारसामंत बरेच निघाले. जाण्याचा दिवस मुकर करण्यांत आला.




चंद्रसिंहानें मुकुलजीकडे पाहून हास्यमुद्रेनें हातांतील पाघडी चटकन् त्याच्या मस्तकावर ठेवली. [पान २१.

" कुमार, युद्धाला जाण्याचें तर नक्की ठरलें, परंतु माझ्या समक्ष तूं सिंहासनावर बसावेंस अशी माझी इच्छा आहे. तसंच तुझ्या सावत्र मातेची व मुकुलची कांहीं व्यवस्था करावी असंहि वाटतं, कारण युद्धांतून परत येईनच असा भरंवसा नाहीं व मागें तुमच्यांत कांहीं तंटेबखेडे होऊं नयेत. " इतकें बोलून राणाजींनीं आपल्या मस्तकावरचे राजचिन्हांकित शिरोभूषण काढून कुमाराच्या मस्तकावर ठेवावयास ते सिंहासनाखालीं उतरून कुमाराजवळ आले; परंतु कुमारानें विनयशीलपणानें तें शिरोभूषण आपल्या हातांत घेऊन जमिनीवर गुडघे टेकून अत्यंत नम्रपणें आपल्या पित्याला वंदन केलें. नंतर उठून त्यांनीं एका सेवकाला कुमार मुकुलला राजदरबारांत आणावयास ताबडतोब पाठविला.

राणाजीकडे वळून कुमार म्हणाला, " पिताजी ही पाघडी मस्तकावर धारण करण्याचा माझा अधिकार नाहीं. ज्या वेळीं मी माझ्या हट्टवादीपणामुळं आप ल्याला अत्यंत क्लेश दिले, त्याच वेळीं हा अधिकार मी झुगारून दिला. पिताजी, कुमार मुकुलची व त्याच्या मातेची आपण मुळींच काळजी करूं नका. कारण हें सिंहासन मुकुलजीचें आहे व तोच याचा अधिकारी होणार. त्याला आपण आपल्या समक्षच सिंहासनाधिष्ठित करावं. मीहि एका सरदाराप्रमाणं चितोडच्या या पवित्र सिंहासनाची मनोभावें सेवा करीन. " कुमाराच्या भाषणानें सर्व तटस्थ झाले व कुमाराच्या गंभीर पण तेजस्वी मुखाकडे आश्चर्यानें क्षणभर पहातच राहिले ! इतक्यांत चार वर्षांचा कुमार मुकुलजी दरबारात येऊन आपल्या भ्रात्याजवळ उभा राहिला आणि म्हणाला, " मोटाभाई, मला का बोलावलं ? "

चंद्रसिंहानें मुकुलजीकडे पाहून हास्यमुद्रेनें हातांतली पाघडी चटकन् त्याच्या मस्तकावर ठेवली व त्याला उचलून चितोडच्या वैभवशाली राजसिंहासनावर बसविलें. हें त्यानें इतक्या त्वरेनें केलें कीं, राणाजींना विचार करण्याचा सुद्धां अवकाश मिळाला नाहीं ! मुकुलजीला सिंहासनावर बसवून तो सर्वांच्याकडे वळून म्हणाला " पिताजी, सर्व सामंतसरदार हो ! आजपासून चितोडच्या सिंहासनाचे अधिकारी मुकुलजी झाले आहेत, आपणां सर्व सरदारासारखाच मी पण एक सरदारच असून मेवाडभूमीची होईल ती सेवा करण्यांत मला भूषण वाटेल; या नूतन राणाजींना सर्वांच्या पूर्वी मी प्रणाम करीत आहे व इतर सर्वांनींहि यांना राजसन्मान

द्यावा असें म्हणून खरोखरींच कुमारानें मुकुलजीला लवून वंदन केलें.राणाजीसह सर्वजण आश्चर्याच्या परमावधीला पोहाचले होते ! आपल्या ज्येष्ठ पुत्राचा हा अलौकिक स्वार्थत्याग पाहून वृद्ध राणाजींच्या नेत्रांत अश्रु आले, पण ते कोणाला न दिसूं देतां त्यांनीं चटकन् पुसून टाकले. क्षणभर त्यांच्या मुखांतून शब्दोच्चारहि होईना ! कुमारचंद्रसिंहाच्या सूचनेप्रमाणें सर्वांनीं मुकुलजीस राजसन्मान दिला.

राणाजी म्हणाले " कुमार, उत्तराधिकारी तूं असतां, मुकुलजीला सिंहासनावर बसविलंस हें योग्य केलं नाहींस. "

" नाहीं. पिताजी, मी केलं हें योग्य केलं. कारण सहा वर्षांपूर्वी आपल्या चरणाला स्पर्श करून प्रतिज्ञा केली ती आपल्या समक्ष पूर्ण झाली, याचं मला समाधान वाटत आहे. "

राणाजी कांहींच बोलले नाहींत. पण त्यांनीं एक दीर्घ सुस्कारा मात्र सोडला ! चंद्रसिंहाच्या अतुल स्वार्थत्यागामुळें सर्वांना त्याच्याविषयीं अभिमान व कौतुक वाटूं लागलें. कुमारानें आपल्या धीरोदात्त वागणुकीनें मेवाडच्या सिंहासनाचा हक्क सोडून आपली प्रतिज्ञा खरी केली. खऱ्या क्षत्रियाचें कर्तव्य काय हें सर्वांच्या निदर्शनाला आणून दिलें ! खरा रजपूत वचनाचा सच्चा कसा असतो याची खात्री पटवून दिली ! कुमाराला राणाजी इतकेंच म्हणाले, " कुमार, तूं हा स्वार्थत्याग केलास हें तुझ्यासारख्या खऱ्या रजपूताला शोभण्यासारखंच केलंस. शिसोदिया वंश किती उज्वल आहे हें सर्व जगाला दाखवून दिलंस, माझा पुत्र म्हणून तुझा मला केवढा अभिमान वाटतो हें मला मुखानं सांगता येत नाहीं, पण माझी एकच इच्छा अगर आज्ञा म्हण तूं पूर्ण केली पाहिजे. "

" कोणती ? पिताजी, सांगा. आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे. "

" होय ना ! बरं, मी तर आतां रणक्षेत्रावर जात आहे, परंतु एखाद्या चांगल्या क्षत्रिय कन्येशीं तूं विवाह करावा ही माझी शेवटची इच्छा तूं पूर्ण करणार नाहींस कां ? " महाराण्याचा कंठ भरून आला होता.

थोडा वेळ विचार करून व खालीं पाहून कुमार म्हणाला, " पिताजी, आपल्या इच्छेप्रमाणं मी विवाह करीन पण योग्य सबंध पाहूनच करीन. "

" बरं आहे, तुझ्या इच्छेप्रमाणं कर. तूं विवाह केलेला मी जरी जिवंत णा " पाहिला नाहीं, तरी माझ्या आत्म्याला समाधान वाटेल. राणाजींनीं

निःश्वास सोडला. आपल्या उदारचरित पुत्राविषयीं त्यांचा जीव फार तळमळत होता आपल्यामुळेंच त्याला राज्यत्याग करावा लागला म्हणून अंतःकरणांत अनुताप उत्पन्न झाला होता.

दुसरे दिवशीं कुमार मुकुलजीला सिंहासनावर विधिपूर्वक बसवावयाचें होतें म्हणून रामसिंगाला महाराणाजींनीं तशी आज्ञा दिली व सर्व व्यवस्था ठेवण्यास सांगितलें.

## प्रकरण ६ वें

# राज्यारोहण

महाराणाजींच्या आज्ञेप्रमाणें दुसरे दिवशीं कुमार मुकुलजीला विधिपूर्वक सिंहासनावर बसविण्यात आलें. लढाईवर जाण्यापूर्वीच राज्यारोहणाचा समारंभ उरकून घ्यावा, असें चंद्रसिंहानें आग्रहपूर्वक सांगितल्यामुळें घाईघाईनेंच हा समारंभ उरकण्यांत आला. कारण, आतां कांहीं जरी झालें तरी चंद्रसिंह कधींहि राज्यावर बसणार नाहीं ही त्यांना पक्की खात्री होती, मग आपल्या समक्षच मकुलजीला सिंहासनावर बसविणें चांगलें असें जाणून त्यांनीं संमति दिली. प्रतिज्ञा घेतेवेळीं चंद्रसिंहानें चटकन् घेतली, परंतु तो ती पाळील व त्याने पाळावी असें त्यांना वाटत नव्हतें, परंतु कुमारास त्याच्या प्रतिज्ञेचें विस्मरण झाले नव्हतें उलट राणाजींच्या देखतच आपली प्रतिज्ञापूर्ति करण्यास संधि मिळाल्याबद्दल त्याला मनापासून समाधानच वाटलें.

राणाजींनीं दरबारांत सर्व दरबारी मंडळीस सांगितलें कीं, " मुकुलजी वयांत येईपर्यंत सर्व राज्यकारभार चंद्रसिंहानेंच करावा. तसेंच सालुंब्रा प्रांत हा वंशपरंपरा चंद्रसिंहाला देण्यांत आला आहे. मेवाडच्या इतर सर्व सरदारांत सालुंब्राधिपतीचें स्थान सर्वांत श्रेष्ठ मानले जावें. तसेंच राज्यकारभाराच्या महत्त्वाच्या कागदपत्रावर मेवाडच्या राण्याच्या सहीवर सालुंब्राधिपतीच्या खड्गाचें चिन्ह असावें, असा निर्बंध मी आजपासून घालून देतों. त्याला सर्वांनीं मान्यता द्यावी. " पुढें अनेक वर्षें तो निर्बंध चालू होता व मेवाडच्या सरदारांत सालुंब्राधिपतीचा मान सर्वांत श्रेष्ठ प्रतीचा मानला जात असे.

दरबाराचें कार्य संपलें व ठरल्याप्रमाणें दुसरेच दिवशीं राणाजी माधोसिंगादि मंडळींसह रणक्षेत्रावर रवाना झाले ! आपल्या पित्यानें वृद्धापकालीं लढाईच्या दगदगींत न पडतां आपणांस जाऊं द्यावें अशी चंद्रसिंहास फार इच्छा होती. परंतु आपल्या देहसार्थक्याचें कारण राणाजीनें पुढें करतां त्याला अधिक बोलतां येईना व स्वस्थ बसणें भाग पडलें. धारातीर्थाहून राणाजी परत येण्याची आशा नव्हतीच व त्यांची इच्छाहि नव्हती. त्यामुळें सर्वांनाच अतोनात दुःख झालें; राणीसहि वाईट वाटलें, पण पुत्राच्या राज्यारोहणाच्या आनंदांत तें तितकें तीव्र भासलें नाहीं.

मुकुलजींच्या मातेला आपल्या पुत्राला राज्याभिषेक झाल्यामुळें हर्ष झाला. चंद्रसिंहाच्या सत्यवादीपणामुळें तिला अधिक खटपटी कराव्या न लागतां सहज कार्यभाग साधला गेला. चंद्रसिंहानें राज्याधिकार सोडल्याबद्दल सर्वांना जरी त्याच्या विषयीं आदर व अभिमान वाटूं लागला तरी राणीस त्याचें कांहींच वाटलें नाहीं, उलट मुकुल वयांत येईपर्यंत चंद्रसिंहाच्या हातीं सर्व कारभार सोंपविल्यामुळे तिला विषादच वाटला. चंद्रसिंहाकडे राज्यकारभार न देतां आपल्या हातीं राज्यसूत्रें असावींत अशी तिला जबर इच्छा होती. परंतु राणाजींपुढें तिचें कांहीं चाललें नाहीं.

राणाजींच्या प्रयाणानंतर चंद्रसिंहानें सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं व दूरदर्शीपणानें राज्यकारभार चालवूं लागला. राणाजी गेल्यानंतर महिना झाला असेल तोंच रणक्षेत्राकडून अशुभ वार्ता आली कीं, राणाजीनीं रणक्षेत्रांत देहाचें विसर्जन केलें ! समस्त मेवाडदेशाला अतिशय दुःख झालें ! सर्व प्रजाजनांचें राणाजींवर पितृवत् प्रेम होतें व त्यांनींही प्रजेला पुत्रवत् पाळून सर्वांचें प्रेम संपादन केलें होतें. राणीला दुःख झालें व चंद्रसिंहाला पितृनिधनाचा मोठाच धक्का बसला !

कालाच्या ओघाबरोबर राणाजींच्या मृत्यूचें दुःख हळूहळू कमी होऊं लागलें. राणाजींच्या निधनाला आतां सहा महिन्यांवर दिवस लोटले होते. कुमार चंद्रसिंह दिवसेंदिवस गंभीरवृत्तीचा बनत चालला होता. अद्याप सर्व त्याला कुमारच म्हणत असत. कर्तव्यांत उणें पडूं नये म्हणून तो राज्यकारभार कसोशीनें करी, पण अलीकडे अलीकडे त्याला राज्यकारभाराचें ओझें जड वाटूं लागलें. आपण या भानगडींतून केव्हां मुक्त होऊं असें त्यास होऊन गेलें होतें.

चंद्रमहालांत कुमार एकटाच लोडाला टेकून बसला होता. दाराच्या बाहेर वृद्ध मेरामण हुक्क्याची नळी हातांत घेऊन बसला होता. इतक्यांत संग्रामसिंह आला. "मेराकाका, कुमार कांहीं महत्त्वाच्या कामांत गुंतले नाहींत ना?" तो म्हणाला.

"संग्रामसिंह,तुम्ही आलांत, बरं झालं," निःश्वास सोडून मेरामण म्हणाला. "जा, आंत जा. कुमार कांही महत्त्वाच्या कामात गुंतले तर मला बरं वाटतं पण ते कांहीं तरी उगाच विचार करीत बसले म्हणजे मला वाईट वाटतं. आताशा त्याना काय होतंय ते एकलिंगजीला माहीत!" म्हाताऱ्याच्या डोळ्यात पाणी आलें.

"मेराकाका, हे काय असं? अहो, राज्यकारभाराचं केवढं ओझं त्यांच्या डोक्यावर आहे हें तुम्हाला माहीत नाहीं काय? त्यातल्या कांहीं तरी भानगडीबद्दल विचार करीत असतील."

"नाही. संग्रामसिंह, माझे सिंहबापु या मेवाडच्या राज्यकारभाराचं ओझं वहायला समर्थ नाहींत असं का वाटतं तुम्हाला? अहो, हा मेवाडदेशच काय, पण सर्व पृथ्वीचा राज्यकारभार वहायला ते समर्थ आहेत, पण त्याच्या उदासीनतेचं कारण निराळंच आहे असं मला वाटतं."

"काय बरं?"

"तुम्ही जरा शहाणपणानं काढून घ्या. माझ्या सारख्या नोकराला ते सांगणार का आहेत?"

"छे, छे, मेराकाका, ते तुम्हाला तसं मुळींच मानीत नाहींत. उलट तुमच्यावर त्याचं केवढं प्रेम आहे!"

म्हाताऱ्याच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावर स्मित झळकलें. "संग्रामसिंह माझे बापू आहेतच तसें. त्यांचं कोणावर प्रेम नाहीं तें सांगा!"

कुमाराला आंतल्या बाजूला या दोघाच्या संवादापैकीं कांहीं शब्द ऐकूं येत होते. संग्रामसिंह अद्याप इतकं काय बोलतो आहे म्हणून तो ऊठून दाराजवळ आला व मेराचे शब्द त्याला ऐकूं आले. "मेरामण, तोंड भरून माझी स्तुति केल्याशिवाय तुला रहावतच नाहीं कां? अन् संग्राम, कसला व्यूव्ह रचतां अहांत, आंत ये ना मी तुझी वाट पहात आहे?"

"कुमार, आपल्या विरुद्ध मेराकाकांची तक्रार चालली होती." किंचित् हंसून संग्राम म्हणाला.

" माझ्या विरुद्ध त्याची नेहमींच कांहीं तरी तक्रार असते. " कुमार स्मित करून म्हणाला. मेरामण कांहींच बोलला नाहीं. नंतर आंत जाऊन दोघेहि बैठकीवर बसले. " खरंच कुमार, मेराकाका म्हणतात, त्याप्रमाणें आपण उदासच असतां व कसल्यातरी गहन चिंतत असल्यासारखें दिसतां; आपल्या या संग्रामला नाहीं कां कारण कळणार ? "

" हं ! " लाब सुस्कारा सोडून कुमार म्हणाला. " या चितोडांत माझं अंतःकरण जर मी कोणाला उघडं करून दाखवीन तर तो फक्त तूंच आहेस. संग्राम, अलीकडे ज्या गोष्टी माझ्या कानावर येत आहेत त्या खरोखरींच चिंताजनकच आहेत. "

" काय बरं ? "

" पूज्य पिताजी स्वर्गस्थ होऊन अद्याप सहा महिने झाले नाहींत, तोंच माझ्या हातून राज्यकारभार काढून आपल्या हातीं घ्यावयाची राणीसाहेबांची इच्छा आहे. "

" थोडीशी तशी कुणकुण माझ्या कानीं आली आहे खरी, पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं असं मला वाटलं, पण ज्या अर्थी आपल्यालाहि ही गोष्ट कळली आहे, तेव्हां काहींतरी तथ्य असावं असंहि वाटतं. "

" संग्राम, मी तितका मूर्ख नाहीं. राणीसाहेबांची इच्छा तशी असून ही गोष्ट निर्विवाद आहे. राज्याच्या हितासाठीं मी तिकडे दुर्लक्ष करीत होतो, परंतु दिवसेंदिवस परिस्थिति अवघड होत चालली आहे. जिथं अविश्वास उत्पन्न झाला, माझ्या प्रत्येक कृत्याला विकृत स्वरूपच येऊं लागलं तिथं मी काय करावं ? " कुमार कांहींशा उद्वेगानें म्हणाला. " खरंच सांग, संग्राम, अशा अपमानित स्थितींत इथं राहणं मला शक्य आहे कां ? "

" मग आपला विचार काय आहे ? "

" दुसरं काय ? चितोड सोडून जावं असं वाटतं ? "

" खरंच; आपण चितोडचा त्याग करणार ? "

" चितोडचाच काय पण मेवाडदेशाचाच त्याग करून जायचं माझ्या मनांत आहे. "

" छे, छे कुमार, आपण इथून गेल्यावर मेवाडवर कांहींतरी संकट येईल. कारण राणाजी अगदीं बाल; राणीसाहेब एक स्त्री आणि तरुण."

" राणा मुकुल लहान आहे, पण राणीसाहेब कारभार वहायला खंबीर आहेत. त्यांच्या इच्छेप्रमाणं त्या करतील. माझा कशाला अडथळा पाहिजे ? "

" नाहीं, नाहीं, कुमार, आपण जर अशी उदास वृत्ति स्वीकारली तर मेवाडभूमीवर कांहीं तरी अकल्पित प्राणसंकट येईल. राणाजी अज्ञान व एका तरुण स्त्रीच्या हातांत राज्यसूत्रं गेलेलीं पाहातांच शत्रूंना ऐतंच फावेल. "

" मग मी अशा अपमानकारक स्थितींत रहावं काय? नाहीं. मला अपमान सहन होणार नाहीं. चितोडच्या राजघराण्यात पवित्र अशा शिसोदिया कुलांत माझा जन्म झाला आहे. संग्राम, मला अपमान कधींहि सहन होणार नाहीं. माझ्या प्रिय मेवाडभूमीसाठीं, माझ्या या देशासाठीं, माझ्या देशबांधवांसाठीं वाटेल ते कष्ट करायला, वाटेल तो स्वार्थत्याग करायला अथवा वाटेल तें दिव्य करायला मी सज्ज आहे. माझ्या प्राणदंडानं मेवाडचं हित साधत असल्यास मी आनंदानें माझा प्राण द्यायला सिद्ध आहे; मेवाडची सेवा करण्यात मला भूषण वाटेल, परंतु राज्यकर्त्याला जिथं माझ्या सेवेची जरूर नाहीं, माझी निष्कपटी सेवा स्वार्थी ठरूं लागली तर मेवाडचा त्याग करणंच शहाणपणाचं आहे ! "

" कुमार, राणीसाहेबांना तितकं ज्ञान नाहीं. त्यांची दृष्टि स्वार्थी बनली आहे व त्याना आपल्या माहेरच्या मंडळींचा पाठिंबा आहे ही गोष्ट खरी आहे. वास्तविक खरे अधिकारी आपणच होता. आपण आपला अधिकार स्वखुषीनं सोडून दिला त्याबद्दल त्याना थोडं तरी वाइट वाटायला पाहिजे होतं. उलट, आपल्याबद्दल गैरविश्वास ! आपल्याला जर राज्य पाहिजेच असतं तर आपण आपला अधिकार कां सोडला असता ? हें कळायला पाहिजे. "

" जाऊं दे, उगाच अधिक कलह वाढवाच कशाला ? मी देशच सोडून गेलों म्हणजे सगळी भानगड मिटली. संग्राम, मेवाड सोडून जायला मला अवकाश लागणार नाहीं; कारण मी खरा क्षत्रियाचा बच्चा आहे, मी मर्द आहे, माझ्या अंगांत असंख्य शत्रूंला पाणी दाखविण्याची ताकद आहे, कुठेंहि जाऊन मी माझ्या देहाला जगवूं शकेन, पण मला इतकंच वाईट वाटतं कीं, पिताजींला दिलेलं वचन मला पाळतां येत नाही ! मुकुलजी वयांत येईपर्यंत चितोडची सेवा तनमनानें करीन. चितोडचें रक्षण करीन. हें पिताजींना वचन दिलं होतं. पण मला यापुढं तें पूर्ण करतां येणार नाहीं, पण उपाय नाहीं. भगवान्

एकलिंगजीच चितोडचं रक्षण करील ? " इतकें बोलून कुमारानें दीर्घ-श्वास सोडला.

" कुमार, आपला तर निश्चयच झाल्यासारखा दिसतो. "

" होय. संग्राम, मला गेलंच पाहिजे. पुढंमागं मीच राज्य बळकावीन अशी राणीसाहेबांना शंका आहे. त्यांनीं जा सागण्याची वाट पहाण्यात शहाणपणा नाहीं. आपण पूर्वीच सावधागिरी ठेवावी तें बरं नव्हे का? एक दोन दिवसात सर्व कारभार राणीसाहेबांना सोंपवून मी मेवाडभूमीला अखेरचें वंदन करून जाणार आहे. राज्याच्या हितासाठीं मी राणीसाहेबाच्या तेढीच्या वर्तनाकडे दुर्लक्ष करीत होतों व मुकुलजी मोठा होईपर्यंत राहिलों असतों, पण दिवसोंदिवस अपमानकारक प्रसंग वारंवार येऊं लागले व माझ्या सहनशीलतेच्या बाहेर गोष्टी जाऊं लागल्या. आतां इथं राहण्यात अर्थ नाहीं अशी खात्री झाली तेव्हाच मी जाण्याचा विचार निश्चित केला. " कुमार निश्चयानें म्हणाला. संग्रामचीही खात्री झाली कीं, यापुढें कुमार चितोडांत रहाणें अशक्य आहे.

" कुमार, आपण जाणार असं म्हणतां तर निदान या आपल्या सेवकाला तरी बरोबर घेऊन जा. कुमार, जिथं आपण तिथं मी असं आजपर्यंत होतं व पुढेंहि तसाच लोभ माझ्यावर आपण ठेवाल अशी आशा आहे. " बोलताबोलता संग्रामसिंहाचा कंठ रुद्ध झाला !

कुमारानें त्याचा हात आपल्या हातांत घेतला. " संग्राम, भविष्यकाळीं संकटांतही माझ्याबरोबर रहावं ही तुझी इच्छा पाहून काय बोलावं हेंच मला सुचत नाहीं ! संकटकाळींहि जो आपल्या धन्याला-मित्राला सोडून जाऊं इच्छित नाहीं त्याच्या थोरपणाला कसली उपमा द्यावी ? " कुमारच्या आवाजांत कंप उत्पन्न झाला ! " बरं आहे तूं माझ्याबरोबर चल. " संग्रामसिंहाच्या मुखावर आनंद झळकला !

## प्रकरण ७ वें.

# अपमान.

दोनचार दिवसांतच चितोड सोडून जाण्याचा चंद्रसिंहानें निश्चय केला होता, परंतु असा योगायोग बनला कीं त्याला दुसरेच दिवशीं आपली मायभूमि सोडून जाण्याचा प्रसंग आला !

चंद्रसिंह दरबारचें काम आटोपून नुकताच आपल्या महालांत आला होता. अद्याप त्यानें आपले कपडेमुद्धां उतरले नव्हते. इतक्यात राणीकडून एक दूत आला व कुमाराला मुजरा करून म्हणाला, " कुमारसाहेब, महाराणीसाहेबांची अशी आज्ञा आहे कीं, भोलानाथच्या भूमिदानाचं आजच्या आज दानपत्र झालं पाहिजे.

" इतकंच ना ? " कुमार शांतपणें म्हणाला. " परंतु मनांत विलक्षण क्षोभ झाला होता. जा. राणीसाहेबांना म्हणावं मी स्वतःच येऊन काय सांगायचं तें सांगतों. " दूत निघून गेला व चंद्रसिंहहि पोषक न उतरता राणीमहालांत जावयास निघाला. जातेवेळीं संग्रामसिंहास बोलावून आणावयास भेरामणाला सागून गेला व त्याच्या मुखावर काहींतरी दृढ निश्चय केल्यासारखा दिसत होता.

कुमार राणीमहालांत आला तेव्हां राणी लोडावर रेलून पडली होती व एक दासी तिचे पाय चेपीत होती. आपण आल्याची वर्दी चंद्रसिंहानें दिली व राणीनें त्याला आत बोलावलें. आंत जाऊन तो काहीं अंतरावर खालीं पहात उभा राहिला. राणी पडल्या जागेवरून उठली नाहीं. ती त्याची सावत्र आई होती तरी त्याच्यापेक्षा वयानें लहान होती. राणाजीच्या हयातींत राणीला सुद्धां चंद्रसिंहाला योग्य मान द्यावा लागत असे. कारणाशिवाय पित्यानें बोलावल्याशिवाय तो कधींच राणीमहालात जात नसे. परंतु आतां राज्यकारभारासंबंधीं कांहीं ना काहीं कारणास्तव त्याला वरचेवर राणी-महालांत जावें लागे. राणीच्या वर्तनांतील फरक त्याच्या लक्षात यावयास अवधि लागला नाहीं. तो आपला सेवक आहे व आपण राज्यकर्ते आहोंत अशा कल्पनेनें राणी त्याच्याशीं मुद्दाम आढ्यतेनें वागूं लागली. आपल्या कर्तव्यांत न्यून पडूं नये म्हणून तो तिकडे फारसें लक्षच देत नसे. चंद्रसिंह येऊन घटका झाली परंतु त्याला बसावयासही राणीनें सांगितलें नाहीं. भुंवया चढवून किंचित् रागानेंच ती म्हणाली. "चंद्रसिंह, भोलानाथाला दान दिलेल्या भूमीचं अद्याप दानपत्र झालं नाहीं ? ते आजच्या आज झालं पाहिजे. "

" राणीसाहेब, भोलानाथाला आपण जी भूमि दान दिली ती पूर्वींच पिताजींनीं एका ब्राह्मणाला दिली आहे. तो ब्राह्मण स्वतः हयात नाहीं, पण ती त्याच्या वंशजाकडे आहे व ती भोलानाथला देतां येणार नाहीं. त्याला दुसरी वाटेल ती द्या. "

" तो ब्राह्मण स्वतः हयात नाहीं, मग त्याच्या वंशजास दुसरी जमीन द्या व ती भोलानाथाला द्या. "

"नाहीं एकदां दिलेलं दान पुनः परत घेणं शक्य नाहीं." चंद्रसिंह ठासून म्हणाला.

" त्या ब्राह्मणाचं नुकसान झालं नाहीं म्हणजे झालं. मी सांगते ती भूमि भोलानाथाला द्या व तिच्या बदलांत त्या ब्राम्हणाला दुसरी द्या. "

" राणीसाहेब, चितोडच्या कुलांतला कोणीहि दिलेलं दान परत घेत नसतो. "

" भोलानाथ माझ्या माहेरचा आहे, तेव्हां माझं म्हणणं तुम्हाला ऐकायचं नाहीं असंच म्हणाना ? " राणा टोंचून म्हणाली.

" आपल्या माहेरचा म्हणून त्याला देऊं नये असं माझं मुळींच म्हणणं नाहीं. या चारपांच महिन्यात आपण किती जणांना तरी जमिनी दान दिल्या आहेत, आपण मुक्त्यार अहात. मला बोलण्याची जरूर नाहीं, परंतु एकदा दिलेली भूमि मी परत घेणार नाहीं. " चंद्रसिंहहि काहींसा गरम होऊन म्हणाला.

" आमच्या हातात कांहींच सत्ता नाहीं असंच म्हटलं पाहिजे ? मुकुलजी नांवाचाच राजा, तेव्हा मी राजमाता पण नांवाचीच " राणीसाहेब संतापून म्हणाल्या.

" आपणास तसं वाटतं याला माझा इलाज नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें आपण वाटेल तें करा.मुकुलजी नांवाचाच राजा असं आपण म्हणता त्याचा अर्थ मला कळतो. आपण राज्यकारभार पहात जा. मला त्यांत लक्ष घालण्याचं कारण नाहीं." राणी नुसती हेटाळणीनें हंसली. "मुकुलजी लहान आहे, त्याला आपल्यावरची जबाबदारी कळत नाहीं. "

राणी मध्येंच म्हणाली " कळून तरी काय करायचं आहे ? जन्मभर त्याला असंच दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी प्यायला हवं ! आम्हालाहि परतंत्रतेनंच वागलं पाहिजे. आम्हाला जर काडीचीहि सत्ता नाहीं तर महाराणा अन् राजमाता म्हणून कोरडं म्हणवून घेण्यांत तरी काय अर्थ आहे ? " चंद्रसिंहाचा अपमान करावा या हेतूनेंच राणी मुद्दाम उपरोधित बोलत होती. चंद्रसिंहानें आत्मसंयमन करून राणीचें भाषण प्रथम ऐकून घेतलें, परंतु शेवटले शब्द-ण त्याच्या अगदीं वर्मी लागले. रागानें त्याचें मुखमंडळ लाल झालें; शक्य

तितका शांतपणा स्वीकारून तो म्हणाला, " महाराणीसाहेब, आपल्या भाषणाचा उद्देश मला स्पष्टच कळला आहे. जास्त सांगण्याची जरूर नाहीं. चितोडच्या सिंहासनाचा जो मी त्याग केला, तो अशा दुष्टपणानें बळकावण्यासाठीं नव्हे. मला जर राज्यतृष्णा असती तर माझा हक्क मी माझ्या हातानें घालविला नसता. पूज्य पिताजींची आज्ञा अन् मेवाडभूमीच्या प्रेमाखातर मी राज्यकारभाराचं ओझं आपल्या मस्तकावर लादून घेतलं. मुकुलजी अज्ञान असल्यामुळें दुष्ट यवनांचा मोर्चा मेवाडकडे वळूं नये व मेवाडवर परकीयाची धाड येऊं नये म्हणून मी राज्यकारभार पहात होतों, परंतु आपणांस त्यांत विपरीत भाव दिसूं लागला असं मला वाटूं लागलं व दोनचार दिवसांत राज्यकारभाराचीं सूत्रं मी आपल्या स्वाधीन करणार होतोंच. परंतु ईश्वरकृपेनं तो प्रसंग आजच येऊन माझ्या डोक्यावरचा भार हलका झाला. राणीसाहेब, चितोडचा स्वाभिमान, चितोडचा कुलगौरव आपल्या हातीं सोंपवून जायला मला मुळींच वाईट वाटत नाहीं. मी आज मेवाडच्या बाहेर कुठं तरी निघून जातों; मी कुठंहि असलों तरी मेवाडच्या सेवेला बोलवाल तेव्हा क्षणाचा विलंब न लावता धांवून येईन. मी एक शिसोदिया कुलांतला आहे ही जाणीव रात्रंदिवस माझ्या हृदयांत राहील. न जाणों यवनांची धाड चितोडवर आली व माझी जरूर लागली तर मला पाचारण करा. मेवाडच्या रक्षणासाठीं मी माझ्या पंचप्राणाची आहुति आनंदानें देईन. मी आतां जातों, आजपासून मेवाडचा राज्यकारभार व कुलमुखत्यारी आपल्याकडे आली. मुकुलजी महाराणा आहे. महाराण्याला योग्य असं त्याला शिक्षण द्या. भगवान एकलिंगजी आपल्या हस्तें मेवाडभूमीचा उत्कर्ष करो, " अंतःकरणाच्या कळवळ्यानें इतकें लांब भाषण करून राणीच्या उत्तराची अपेक्षा न करता चंद्रसिंह राणीमहालातून निघून गेला.

चंद्रसिंहाच्या भाषणानें प्रथम कांहीं क्षण राणी अगदीं स्तब्ध झाली! चंद्रसिंह स्वतःच देशांतराला जातो आहे व राज्य आपल्या हातीं आलें याचा नंतर तिला हर्षच झाला! राज्यकारभार पहातां पहातां स्वतःच कुमार राज्य बळकावून बसेल अशी भीति तिला वाटत होती व तिच्या माहेरहून व तिच्या पित्याकडूनही वरचेवर तशी सूचना येत होती. शक्य तितक्या लवकर कुमाराचा कांटा दूर करावा असें रणमल्लाकडून वेळोवेळीं तिला कळविण्यांत येत होतें. राणीच्या अपमानकारक भाषणानें यापुढें क्षणभरही चितोडांत रहावयाचें

नाहीं असा कुमारानें निश्चय केला व तो बोलूनही दाखविला. कुमार देशांतराला जाणार ही गोष्ट क्षणार्धांत महालभर झाली व ज्यांचें कुमारावर बाळपणापासून प्रेम होतें त्यांना अत्यंत वाईट वाटलें.

कुमार चंद्रमहालांत आला, आज कांहींतरी अधिकउणा प्रसंग झाल्यास एकदम देशांतराला जावयाचें, हा मनांत बेत ठरवूनच त्यानें पूर्वींच संग्रामसिंहाला आपल्या महालांत बोलावून आणलें होतें. संग्रामसिंहाला पहातांच कुमार मुखावर बळेंच हास्य आणून म्हणाला, " संग्राम, माझ्याबरोबर यायची तुझी तयारी आहे ना ? "

आश्चर्यानें कुमाराकडे पाहून संग्राम म्हणाला, " होय कुमार, मी केव्हांहि तयारच आहे. "

" मग चला, आतांच निघायचं. " हंसत हंसत कुमार म्हणाला.

" काय ? आत्तांच ! " संग्रामाच्या मुखांतन एकदम आश्चर्योद्गार निघाले. कुमार, थट्टा तर करीत नाहींत असेंहि त्याला वाटलें. " होय संग्राम, यापुढं क्षणभरहि चितोडांत रहाण्याची मला जरूर नाहीं व इच्छाहि नाहीं. " कुमाराच्या मुखावरचें स्मित मावळून गंभीरपणा दिसूं लागला. नंतर घडलेला वृत्तांत त्यानें संग्रामसिंहास सांगितला.

" संग्राम भूमिदानाच्या निमित्तानं राणीसाहेब जर माझा वाटेल तसा अपमान करूं लागल्या तर तो मला सहन होणं शक्यच नाहीं. अशा रीतीनं माझा कांटा त्यांना दूर करायचा आहे, हा औटघटकेचा राज्यपदाचा मान मला कशाला पाहिजे ? मी राज्य बळकावून बसेन ! किती चमत्कारिक कल्पना ?" कुमार खिन्नपणें हंसून म्हणाला.

" अशा संधीचा फायदा घेऊन मेवाडवर एखादं संकट येईल अशी मला भीति वाटते. "

" त्याची काळजी भगवान् एकलिंगजीला ! " दीर्घश्वास सोडून कुमार म्हणाला. " राणीसाहेब कारभार पहायला समर्थ आहेत व इतर सरदारसामंत काय थोडे आहेत ? " इतक्यांत मेरामण तेथें धापा टाकीतच आला.

" बापू, बापू. आपण मेवाडच्या बाहेर जाणार ? बापू, मलाहि आपल्या बरोबर न्या. "

चंद्रसिंह क्षणभर गप्प राहिला. मेरामणची कशी समजूत करावी हेंच त्याला कळेना. " मेरामण, तूं आजच माझ्याबरोबर येऊं नको. "

" कां ? नाहीं मी तुमच्या बरोबर येणार. बापू, या म्हाताऱ्याचा अव्हेर करूं नका, मी फार दिवस जगत नाहीं व आपला वियोग मला मुळींच सहन होणार नाहीं. "

त्याच्या खांद्यावर प्रेमभराने हात ठेवून कुमार गहिंवरून म्हणाला " मेरामण, मेरामण, तुझं माझ्यावर किती प्रेम आहे हें मी जाणतों. अन् म्हणून तुला सध्यां इथंच ठेवून जाणार. मेरामण, आम्ही कठं रानावनांत भटकणार ! तुझ्या या उतारवयात तुला ती दगदग सोसणार नाहीं.मेरा, तूं इतक्यांत मरावंस असं मला वाटत नाहीं. ऐक, माझीं कचीवचीं तुला अद्याप पाह्यचीं आहेत ना ? मग तुला जगलच पाहिजे. माझी व्यवस्था लागली कीं, मी तुला बोलावून घेईन. अन् हें बघ, मेरा, दुसरंहि एक महत्त्वाचं काम तुझ्यावर मीं सोंपवून जाणार आहे. " मेरामण आपले डोळे पुसून कुमाराकडे पाहूं लागला. " मेरा, तूं इथं राहून राज्यांत जर कांहीं अधिकउणा प्रसंग झाला तर आम्हाला ताबडतोब कळविला पाहिजे. कारण राठोडचे लोक अलीकडे भराभर आपल्या राज्यांत येऊन राहिले आहेत, तेव्हां बाहेरच्या शत्रूंपेक्षां मला या स्वकीय शत्रूंचंच अधिक भय वाटतं. राणीसाहेबाना आपल्या माहेरच्या मंडळींचा विश्वास वाटून आपला गैरविश्वास वाटतो पण कोणी सांगावं? "

कुमाराच्या युक्तिवादापुढें अखेरीस मेरामणनें मागें रहाण्याचें कबूल केलें व बरोबर संग्रामसिंह आणि एक नोकर मानसिंग यांनीं जावें असें ठरलें.

## प्रकरण ८ वें.

# देशत्याग.

चितोडच्या हितकर्त्या राज्यकारभारांतील रामसिंग, करणसिंग वगैरे दोन चार मंडळीस कुमारानें तांतडीनें बोलावणीं पाठविलीं. फारसा लवाजमा अगर अधिक मंडळी बरोबर न्यावयाची नसल्यामुळें तयारीला वेळ लागला नाहीं. संग्रामसिंहाला त्याच्या मातापित्यांच्या भेटीला पाठवून कुमार अस्वस्थपणें महालांत बसला होता. इतक्यांत घाईनेंच सरदार मंडळी आली.

रामसिंगाला उद्देशून कुमार म्हणाला, " रामसिंग, राणाजी बालक आहेत म्हणून यापुढं ते समजूतदार होईपर्यंत चितोडच्या राज्यलक्ष्मीचं तुम्ही सर्वांनी जतन केलं पाहिजे. माझ्या हातून यापुढं चितोडची सेवा करून घेण्याचं ईश्वराच्या मनांत नाहीं ! "

" कुमार, मी ऐकलेली गोष्ट खरीच एकूण !" रामसिंग आश्चर्यानें म्हणाला. " मला आतांच कळलं कीं, कुमारसाहेब चितोड नगरीचा त्याग करून–"

" होय. रामसिंग, यापुढं मी चितोडांत राहणं योग्य नाहीं असं भगवंताला वाटत असलं तर आपण काय करणार ? मला गेलंच पाहिजे; परंतु माझं कर्तव्य म्हणून हीं सर्व राज्यसूत्रं तुम्हावर सोंपविलीं आहेत. राणासाहेबांच्या मर्जीनं राज्यकारभार चालवा व मुकुलजीला महाराण्याच्या पदाला योग्य असं सर्व शिक्षण मिळूं द्या. "

" कुमार, आपण गेल्यावर चितोडांत बेजबाबदारी माजून राहील. मेवाडच्या भविष्याकडे पाहून तरी आपण जाऊं नका. " हात जोडून रामसिंग म्हणाला.

" नाहीं. नाहीं. रामसिंगजी, माझ्या जन्मभूमीचा त्याग करून जायला मलाहि सुख वाटत नाहीं, पण मला इथं राहतांहि येत नाहीं. खरं पाहिलं असतां आतां मेवाडच्या भूमीवर माझा काडीमात्र हक्क नाहीं. पण मेवाडविषयीं वाटणारं प्रेम, मेवाडाविषयीं वाटणारा आत्मीयभाव जिवंतपणीं तरी या हृदयांतून जाणार नाहीं ! तुम्हां सर्व स्वकीयांना सोडून जावं लागत आहे व पूज्य पिताजींना दिलेलं वचन पूर्ण करता येत नाहीं याचंच मला वाईट वाटतं. बाकी चितोडचा पाश तोडून जायला माझी केव्हांहि तयारीच होती. बरं आहे, मुकुलजीचं रक्षण करा म्हणजे झालं ! "

" कुमारसाहेब, आपणाला आमचा कंटाळा आला असं दिसतं. प्रभूची मर्जी ! " वृद्ध करणसिंग म्हणाले. " पण आपण जाणार तरी कुठं ? "

" हा मेवाड सोडून कुठं तरी जाणार. "

" माझं म्हाताऱ्याचं ऐका, आपल्या पिताजींनीं आपल्याला सालुंब्रा प्रांत दिला आहे तिकडेच चला. मीहि आपली सेवा करायला आपल्या बरोबर येतों. "

" छे, छे ! मेवाडांत मला मुळींच राह्यचं नाहीं. "

" सालुंब्र्यांत रहायला काय हरकत आहे ? तो प्रांत आपलाच आहे. "

" मेवाडच्या हद्दींतच मला राह्यचं नाहीं. " कुमार निश्चयानें म्हणाला.

" आपली मर्जी ! " करणसिंग निःश्वास सोडून म्हणाले. " बरं, मला आपल्याबरोबर घेऊन जा. "

" नको. नको. ठाकूरसाहेब, या वयांत आपण माझ्याबरोबर कुठं भटकणार ? आपला माझ्यावर एवढा लोभ आहे हेंच माझं भाग्य असं मी समजतों. मी चितोडचा कोणी नसूनहि आपण मला इतका सन्मान देतां त्याबद्दल मी खरोखरीच सर्वांचा ऋणी आहे. "

" कुमारसाहेब, ठाकूरसाहेब म्हणतात त्याप्रमाणें आपण आपल्याबरोबर कांहीं मंडळींना घेऊन जावं असं मलाहि वाटतं. " रामसिंग म्हणाला.

" माझ्याबरोबर संग्रामसिंग व मानसिंग इतकेच पुरे; जास्त मंडळींची जरूर नाहीं. "

" निदान कांहीं सैनिक तरी बरोबर असूं द्या. " रामसिंग पुनः म्हणाला.

" कशाला ? " खिन्नपणें हंसून कुमार म्हणाला. " रामसिंगजी, मी कुठं लढाईवर जात नसून माझ्या नशीबाची परीक्षा पहायला जातों; तिथं सैनिकाची काय जरूर ? भगवान् एकलिंगजीच्या कृपेनें सर्व ठीक होईल. "

घोडा तयार असल्याचें मानसिंग सांगावयास आला. सर्वांचा अखेरचा निरोप घेऊन कुमार बाहेर आला. वृद्ध मेरामण डोळे पुसत उभा होता. त्याच्या जवळ जाऊन व त्याचा हात हातांत घेऊन कुमार म्हणाला, " मेरामण, मी लवकरच तुला बोलावून घेईन. " त्याच्या मुखांतून शब्दोच्चारच होईना.

" बापू-बापू-" असें कसें तरी बोलला व त्याला हुंदका येऊन लहान मुलासारखा तो रडूं लागला. कुमाराचेंहि अंतःकरण भरून आलें, डोळे अश्रूंनीं तरळले, कंठ सद्गदित झाला ! सर्वांचीच तशी स्थिति झाली होती. इतक्यांत संग्रामसिंह आपल्या मातापित्यांचा निरोप घेऊन आला. पुनः एकदां सर्वांचा निरोप घेऊन कुमारानें आपल्या पुष्करावर चटकन् उडी टाकली. त्यानें मुद्दामच मागें वळून पाहिलें नाहीं ! "

चितोडच्या महाद्वाराशीं रामपोल दरवाज्याशीं कुमारानें खालीं उतरून चितोडपुरीला अखेरचें वंदन केलें ! " भगवान् एकलिंगजी, माझ्या देशावर कोणतेंहि संकट आलें तरी तुझ्या कृपेनें तें दूर होऊं दे व बाल मुकुलजीचें रक्षण तूं कर ! "

सर्व अंतःकरण ओतून त्यानें तितके शब्द उच्चारले. नंतर मागें न पहातां घोडा भरधाव फेंकला ! स्वदेशावर व स्वदेशबांधवांवर त्याचें प्राणापेक्षां अधिक प्रेम होतें.

मुकुलजीला चंद्रसिंह मुद्दामच भेटला नाहीं. बाल राण्याचें आपल्या मोटाभाईवर फार प्रेम होतें. त्याच्या मनाला वाईट वाटूं नये म्हणूनच कुमारानें त्याची भेट घेतली नाहीं.

चंद्रसिंह चितोड सोडून गेल्याचें राणीला कळलें. तिला मनापासून आनंदच झाला !

भोलानाथाला मंदोरहून रणमल्लानेंच पाठविला होता व त्यानें उलटेंसुलटें सांगून राणीच्या मनांत असें भरवून दिलें कीं, तुमच्या हातीं कांहीं सत्ता नाहीं. खरा राजा चंद्रसिंहच आहे. तुम्ही नामधारीच आहांत. लोकांत अवडंबर माजविण्यासाठीं चंद्रसिंहानें राज्यत्यागाचें ढोंग केलें आहे, पण पुढें मागें तोच सिंहासन बळकावून बसेल. तेव्हां त्याचा कांटा शक्य तितक्या लवकर काढून टाकला पाहिजे. नंतर राणीच्या सहाय्यानें त्यानें भूमिदानाचें प्रकरण उपस्थित करून आपला मूळ हेतु साधून घेतला. राणींत तितकें दूरदर्शित्व नसल्यामुळें चंद्रसिंह आपला शत्रू आहे असेंच तिला वाटूं लागलें.

## प्रकरण ९ वें

# राठोड रणमल.

मंदोरच्या राजमहालांत आपल्या बैठकीच्या दालनांत राठोड रणमल्ल गादीवर पडून ऐषआराम घेत होता व मनाशींच कांहीं तरी सुखदायक कल्पनेंत चूर झाल्यासारखा दिसत होता. " एकंदरींत भोलानाथानं कामगिरी पार पाडली खरी ! " आपल्या तुरळक रुपेरी मिशांना पीळ भरीत तो स्वतःशींच पुटपुटला, " वृद्ध राण्याला मी माझी मुलगी दिली तेव्हांच हा बेत योजूनच दिली ना ! नाहीं तर त्या म्हाताऱ्याला मी माझी पद्मकुमारी दिली असती कां ? लाक्षराणा मोठा चमत्कारिक होता. माझ्या नातवाला सिंहासनावर बसविला, पण सर्व कारभार त्या चंद्रसिंहाच्या हातीं ! काय म्हणून तर राणा लहान, बरं झालं चंद्रसिंह एकदाचा मेवाडदेश सोडून गेला, सुंठीवांचून खोकला गेला, आतां हळूंहळू

आपल्याला चितोडांत चंचूप्रवेश करून फार दिवसांची मनीषा तृप्त करून घेतली पाहिजे. त्या चंद्रसिंहापुढें आमच्या शक्तीचा अगर युक्तीचा कांहीं उपयोग झाला नसता. आतां माझ्याच मुलीच्या हातीं राजसत्ता आहे, पाहूं कसकसा घाट घालायचा तो ? कोण आहे रे तिकडे ? " मोठ्यानें रणमल्ल म्हणाला. एक नोकर पुढें येऊन उभा राहिला.

" अन्नदाता, काय आज्ञा आहे ? " हात जोडून तो म्हणाला.

" जा, जोधरावला बोलावून आण. "

" जी हुकूम. " म्हणून नोकर गेला व रणमल्ल पुनः आपल्या विचारांत तरंगूं लागला. रणमल्लाचें शरीर वृद्धावस्थेला पोचलें होतें, परंतु त्याचें अंतःकरण अद्याप तरुण होतें. आपण अद्याप तरुण आहोंत असेंच त्याला वाटत होतें. थोड्या वेळानें जोधराव तेथें आला व आपल्या पित्याला वंदन करून म्हणाला, " बाप्पाजी, मला कशाला बोलावलं ? "

" जोधा, चितोडहून आतांच आपला एक मनुष्य आला आहे त्याच्या सांगण्यावरून कुमार चंद्रसिंह मेवाडचा त्याग करून गेला असं कळतं. "

" खरंच ? " आश्चर्यानें जोधराव म्हणाला.

" होय. "

" कारण काय बरं झालं ? तशाच कारणाखेरीज कुमार चंद्रसिंह आपला देश सोडून जाणार नाहीं. "

" कारण कशाला पाहिजे ? चंद्रसिंह मूळचाच हेकेखोर अन् हट्टी आहे. ज्यानं आपल्या बापाचंहि ऐकलं नाहीं तो आपल्या पद्मकुमारीचं ऐकणार होता का ?"

" बाप्पाजी, चंद्रसिंह हट्टी अन् हेकेखोर असले तरी असे एकदम आपला प्रियदेश सोडून जायचे नाहींत. तसंच कांहीं तरी कारण झालं पाहिजे. चितोडच्या शिसोदिया कुळांतील पुरुषांत दुसरे कोणतेहि दुर्गुण असले तरी त्यांच्या रोमरोमांत स्वदेशप्रेम भरलेलं आहे. ते आपला सर्वस्वाचा त्याग करतील, प्राणत्याग करायलाहि मागंपुढं पाह्यचे नाहींत, पण आपल्या देशाचा कधींच त्याग करणार नाहींत. मला वाटतं आपल्या पद्मकुमारीकडून त्याचा कांहीं तरी अपमान झाला असला पाहिजे. त्याशिवाय कुमार असे एकदम जाणार नाहींत." जोधरावला आपल्या पित्याचा स्वभाव माहीत होता. तसेंच आपली भगिनी व आपला पिता मनांतून कुमाराचा द्वेष करीत आहेत हेहि तो जाणून होता. चितोडच्य

सिंहासनाचा खरा हक्कदार कुमार आहे, त्यानें आपल्या प्रतिज्ञेसाठीं सिंहासनाचा त्याग केला त्यामुळें जोधराव कुमाराला मनांत धन्यवाद देई व त्याच्याबद्दल त्याला एकप्रकारचा पूज्यभाव वाटत असे.

जोधा, आपल्या पद्मकुमारीविषयीं तुझा भलताच ग्रह झालेला दिसतो. ती अविचारानं कांहीं तरी भलतंच करील असं मला तरी वाटत नाहीं. आपल्याला अद्याप पुरं कांहींच कळलं नाहीं म्हणून आपण तिच्याविषयीं आपली कांहीं तरी समजूत करून घेणं ठीक नाहीं."

"हो. तेंहि खरं आहे." विचार करून जोधराव म्हणाला.

"चंद्रसिंह निघून गेला,यामुळं राज्यकारभाराचं ओझं माथीं पडल्यामुळं पद्मकुमारी काळजींत असेल. कारण मेवाडचीं राज्यसूत्रं चालविणं तितकं सोपं नाहीं. तिला तरी काय अनुभव असणार? मला वाटतं खरी स्थिति काय आहे हें पाहायला आपण गेलं पाहिजे. चंद्रसिंह कां गेले हें कळून येईल व पद्मकुमारीला सल्लामसलत पण देतां येईल. चंद्रसिंह गेल्यामुळं कदाचित् इतर सरदार पद्मकुमारीलाच दोष देण्याचा संभव आहे. सर्वांचें प्रेम चंद्रसिंहावर आहे, या कारणावरून तिच्या विरुद्ध कांहीं खटपटी चालायच्या. आतां आपल्याला तिचं हित पाहिलं पाहिजे." कावेबाजपणानें रणमल्ल म्हणाला. आपल्या पित्याच्या पोटांत काय कपट आहे याची कल्पना जोधरावला नव्हती. पित्याचें भाषण संपल्यावर तो म्हणाला, " बाप्पाजी,यावेळीं चितोडला गेलं पाहिजे खरं! राणाजी नुकतेच स्वर्गवासी झालेले व चंद्रसिंह असे निघून गेले. पद्मकुमारीवर कांहीं संकटहि यायचा संभव खरा; मला वाटतं आपण स्वतःच जाल तर बरं होईल."

रणमल्लाच्या मनांत तोच विचार होता. जोधराव काय म्हणतो हें कळावें म्हणूनच तो तसें बोलला. "बरं आहे. जोधा, मीच जातों, तूं इथली व्यवस्था पाहाशीलच. जरूर लागली तर तुलासुद्धां बोलावीन. तूं आपला तयारींत रहा. न जाणों कांहीं तंटाबखेडा असला तर आपण पुढं होऊन त्याचा मोड केला पाहिजे. आपली कांहीं मंडळी पद्मकुमारीच्या मदतीला तिथंच ठेवायची असा माझा विचार आहे. आपल्या पद्मकुमारीसाठीं मेवाडची काळजी आपल्याला आतां घेतली पाहिजे." काळजीच्या स्वरानें रणमल्ल म्हणाला. परंतु जोधरावला तें रुचलें नाहीं असें त्याच्या चर्येवरून दिसलें.

"बाप्पाजी, मेवाडची काळजी आपणांस तितकी वाटायला नको. कारण मेवाडचा प्रत्येक रजपुत स्वदेशासाठीं जीव देणारा आहे. त्यांचें आपल्या

राजावर व देशावर स्वतःच्या प्राणापेक्षां अधिक प्रेम आहे. त्यांचा राजा अज्ञान असला तरी ते त्याची सेवा करण्यांत कसूर करणार नाहींत. आपल्या-सारख्या तिऱ्हाइताला ते आपल्या राज्यकारभारांत हात घालूं देणार नाहींत. आपण त्या भानगडींत पडूंच नये असं मला वाटतं. ''

'' तसं नव्हे रे ! माझा उद्देश तुला कळला नाहीं. '' ओठ चावून रणमल्ल म्हणाला, ''मुकुल अज्ञान आहे तोंपर्यंत आपली मंडळी त्याच्याजवळ पाहिजेत. तितकं पद्मकुमारीला बरं वाटेल. कुणी सांगावं; मुकुलच्या अज्ञानपणाचा फायदा घेऊन एखादा चितोडचाच सरदार उठावला तर? हा मुद्दा विचार करायला पाहिजे.'' जोधराव कांहींच बोलला नाहीं.

'' मी आजच जातों चितोडला. ''

'' हो. आपण तिथली व्यवस्था पाहून निघून यावं. ''

'' हो, नीट व्यवस्था लागल्यावर मला काय करायचं आहे राहून. जरा पद्मकुमारीला बरं वाटेल माझ्या भेटीनं. ''

नंतर जोधराव पित्याचा निरोप घेऊन निघून गेला. तो गेल्यावर रणमल्ल स्वतःशींच हंसून म्हणाला. '' जोधराव मला मुलगा शोभण्यासारखा नाहीं. त्याला स्वतःचा मतलब मुळींच कळत नाहीं. एकूण माझी इच्छा आतां लवकरच पूर्ण होणार. जोधा म्हणतो तसें हे चितोडे फार स्वामिनिष्ठ व करारी असतात खरे ! पण ते तितकेच निष्कपटी पण असतात. म्हणावं तुमच्या डोक्यावरून कसा हात फिरवावा हें आम्हां मारवाड्यांनांच माहीत ! पण हा जोधाच मध्यें कांहीं विघ्न न आणो म्हणजे झालं, नाहींतर कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ व्हायचा ! त्याला सुद्धां सध्यां कांहीं मागमूस लागूं देतां कामा नये. चितोडांत जाऊन पोंचलों कीं, कसा घाट जमवून आणायचा तें पाहूं. या कामांत आमच्या चुलतभावाची राठोड जयमल्लाची चांगली मदत होईल त्यालाच बरोबर न्यावा. असें म्हणून रणमल्लानें एका नोकरास जय-मल्लाला बोलावून आणावयास पाठविलें.

## प्रकरण १० वें.

# आकस्मिक भेट

दोन प्रहरची वेळ होती. दाट झाडी असल्यामुळें उन्हाचा प्रखर ताप तितका त्रासदायक वाटत नव्हता. चंद्रसिंह, संग्रामसिंह व मानसिंग त्या दाट

जंगलांतून मार्ग काढीत होते. रस्ता कांट्याकुट्यांचा व वांकडातिकडा असल्यामुळें घोडे हळुहळु चालत व स्वारांनाहि त्यांना जपून चालवावें लागत होतें. " संग्राम, मला वाटतं आपण माळव्याच्या सीमेंत आलों आहोंत." कुमार चंद्रसिंह म्हणाला.

" होय. पण कुमार, हें जंगल संपल्यावर आपण कुठं पोंचूं याचा कांहींच अदमास होत नाहीं."

" अरे, कुठं तरी जायचं. अमुकच ठिकाणीं जायचं असं आपलं कुठं ठरलेलं आहे ? मेवाडची सीमा सोडून जायचं म्हणून आपण निघालों, आतां कुठं तरी आश्रय मिळेल तिथं रहायचं आहे." हे शब्द उच्चारतांच कुमाराच्या मनाला अतोनात विषाद वाटला. असंख्य लोकांना ज्यानें आश्रय दिला असता, त्यालाच आतां दुसऱ्या कोणाच्या आश्रयाची जरूर लागली. कुमाराच्या चेहऱ्यावरील विषाद संग्रामसिंहाच्याहि लक्षांत आला. त्यानें एक दीर्घ श्वास सोडला.

" कुमार, आपण आपल्या नांवानंच कुठंतरी रहाणार कां ? " मनांत शंका येऊन तो म्हणाला.

" नाहीं. संग्राम आपल्याला नांव बदलूनच राहिलं पाहिजे असं मला वाटतं. तूं बरी आठवण केलीस, माझं नांव मी विजयसिंह ठेवणार अन् तुझं? "

" जयसिंह. " संग्राम एकदम म्हणाला.

" वाः ! छान नांवं जुळलीं. पण विसरायचं नाहीं हं ? नाहीं तर मला कुमार–कुमार म्हणशील, पहा, मी एक सामान्य रजपुत आहे असंच सांगायचं बरं कां ? चितोडच्या राजपुत्राचा यापुढं लोप झाला."

" नाहीं. कुमार, आपण एक सरदारपुत्र आहांत असं मी सांगणार."

" कां ? नुसता रजपुत असलों तर काय बिघडलं ? एक रजपुत म्हणवून घेण्यांत मला अभिमान वाटतो तितका सरदार म्हणवून घेण्यांत वाटणार नाहीं."

" परंतु आपला दर्जा त्यापेक्षांहि मोठा आहे. कुमार, आपण शिसोदिया कुलांतले राजपुत्र आहांत हें विसरून चालणार नाहीं."

" अरे, माझ्या कुलाचा मला पुष्कळ अभिमान आहे, म्हणून मी अमुक अमुक असं सर्वांना सांगत सुटायचं कीं काय ? " कुमार किंचित् स्मित करून म्हणाला, " संग्राम, रात्रीला तरी आपण पोंचू का रे एखाद्या निवांत स्थळीं ? "



कुमारानें भाला तसाच त्याच्या पोटांत जोरानें दाबून धरला.

[ पान ४१.

" शक्य तों पोचलंच पाहिजे. हें रान केवढं मोठं आहे कोण जाणे ? " नंतर कांहीं वेळ तिघेहि गप्पच होते. इतका वेळ शांतपणें चाललेलीं जनावरें एकदम भेदरून जागच्याजागीं खिळल्यासारखीं उभीं राहिलीं व फुर-फुरूं लागलीं !

" बेटा पुष्कर, काय झालं ? इतका कां भ्यालास ?" म्हणत कुमारानें आपल्या घोड्याच्या मानेला ममतेनें कुरवाळलें. त्या मुक्या जनावराला आपल्या धन्याचे शब्द कळूनच कीं काय, त्यानें पुढें जावयाला एक पाय उचलला पण पुनः तो जागेवरच खिळून उभा राहिला.

" कुमार, जनावरं बिचकतात. कांहीं तरी शिकार आहे नजीकच असं वाटतं ! " संग्राम म्हणाला.

" मलाहि तसंच वाटतं सावधपणानंच पुढं सरलं पाहिजे." आपला भाला सरसावून चंद्रसिंह म्हणाला " पुष्कर, चल पुढं." परंतु इतक्यांत एक वाघाची आरोळी ऐकूं आली व तिन्ही घोडे मागच्या पायावर उभे राहून मागेंमागें सरकूं लागले.

" हट ! नामर्द ! पुष्कर, असा शेळीसारखा मागं मागं जायला पाहतोस ? हो पुढं नाहीं तर हा भाला तुझ्याच मानेंत घुसेल बघ, बेवकूब, नामर्द ! " मांड जोरानें दाबून पुष्कराला पुढें दामटीत चंद्रसिंह रागानें म्हणाला. आपल्या घोड्याचा नामर्दपणा त्याला आवडला नाहीं. पुष्कर आपल्या धन्याला चांगला ओळखीत असल्यामुळें ज्या दिशेनें वाघाची आरोळी आली होती, त्या दिशेला धैर्यानें निघाला. संग्रामसिंह व मानसिंह त्यांचे पाठोपाठ निघाले. कुमार फारसा पुढें गेला नसेल इतक्यांत समोरच असलेल्या घनदाट जाळींतून एक महाभयंकर वाघ त्वेषानें कुमाराच्या अंगावर झेंप टाकून आला. कुमार सावधच होता, त्यानें आपला भाला जोरानें अचुक त्या वाघाच्या पोटांत खुपसला. वाघाच्या पोटांत चारसहा बोटें आंत भाला शिरला त्या वेदनेनें एक भयंकर गर्जना करून तो जमिनीवर उताणा पडला; कुमारानें भाला तसाच त्याच्या पोटांत जोरानें दाबून धरला; कारण वाघ अद्याप ठार झाला नव्हता.

" मला वाटतं आतां तो मेला असावा ! " संग्राम अश्वावरून वांकून वाघाकडे पहात म्हणाला.

" नाहीं, अद्याप तो ठार झाला नाहीं. तो घायाळ आहे हें खरं असलं तरी तितक्यांत पटकन अंगावर येईल सुद्धां. "

मानसिंगानें घोड्यावरून उडी टाकून तो वाघाजवळ जाऊं लागला. "थांब मानसिंग, तो जिवंत आहे. मी भाला सैल करून पहातों. पाहूं बरं ठार झाला कां नाहीं ? " म्हणत कुमारानें भाला खेंचला तोंच तो गुरगुरला. या वेळीं तो अगदीं दुर्बल झाला होता; इतक्यांत जाळीच्या बाजूनें तीनचार रजपुत वीर पुढें आले. कुमारानें आपल्या बाहुबलानें त्या अजस्र जनावराला दाबून धरलेला पाहून, त्यांच्यापैकीं एक उतारवयाचा व अधिकारी दिसणारा रजपुत पुढें होऊन म्हणाला. " खरोखरींच तुमचं शौर्य अलौकिक आहे ! हा जबर वाघ तुम्ही दाबून ठेवलांत यावरून तुमच्या बाहूंतली शक्ति कळून येते. या वाघानं आमच्या एका मांणसाला ठार मारून तो या जाळींत दबून बसला होता. आम्ही त्याच्या शोधांत इकडे आलों, पण आम्ही येण्यापूर्वींच तुम्ही त्याला यमसदन दाखविलंत. "

" खरंच याची शक्ति फार अचाट होती. इतका दाबून धरला तरी तो उठण्यासाठीं धडपड करीत होता. आताच जरा मंद पडला आहे. " इतकें म्हणून निःसमर्थ झालेल्या त्या सामर्थ्यवान प्राण्याच्या पोटांतील भाला त्यानें खेंचून बाहेर काढला व घोड्याखालीं उडी टाकून त्या रजपुत वीराला नमस्कार करून म्हणाला " आपण शिकारीला आला होतात वाटतं ?"

" हो. आपण कुठून आलांत ? आपण परदेशस्थ दिसतां म्हणून विचारतों. "

" होय, आम्ही परदेशचेंच आहोंत व इकडे माळव्यांत आमचं नशीब काढायला आलों आहोत. "

" आपण सुलतानाकडे जाणार आहांत काय ? "

" सुलतानाकडेच जायचं असं आमचं अद्याप ठरलं नाहीं."

" मग माझ्या बरोबरच चला.आमचं राज्य येथून जवळच आहे व आपल्यासारख्या परदेशस्थांचा परामर्ष घेणं आमचं कर्तव्य आहे."

कुमार जरा विचारांत पडल्यासारखा दिसला. " वीरांनो, तुमचीं नांवं मला कळतील काय ! "

" होय, माझं नांव विजयसिंह व हा जयसिंह. " कुमार म्हणाला.

" विजयसिंह, माझं पण नांव मी सांगतों. माझं नांव हरपालदेव, राजदुर्गाचा अधिपती. "

" महाराज, आपला दर्जा आम्हाला कळला नव्हता त्यामुळं आमच्याकडून आपला कांहीं. "—

" छे छे! विजयसिंह, तुमच्या हातून कोणतंच गैरवाजवी वर्तन घडलं नाहीं. उलट तुमचं शौर्य पाहून मला फार आनंद झाला. तुमच्या मारख्या तरुणांची ओळख झाली याचा मला खरोखरीच हर्ष झाला आहे. चला, माझ्या बरोबर चला. दुसऱ्या कुठं न जातां तुम्ही माझ्याच जवळ रहा अशी माझी इच्छा आहे. " कुमारालाहि कोठें तरी आश्रय पाहिजेच होता. हरपालदेवाचें आमंत्रण स्वीकारून त्याच्या राजदुर्गांत जावयाचें त्यानें ठरविलें.

" वरं आहे, महाराज, आम्ही आपल्या बरोबर येतों. " चंद्रसिंह म्हणाला व हरपालदेवाला आनंद झाला. त्यानें कुमाराचा हात हातांत घेऊन म्हटलें, " विजयसिंह, माझा महाल हा आपलाच समजा अन् आपण वाटेल तितक्या दिवस माझ्या इथं रहा. "

" छे छे, महाराज, आपण आम्हाला आपले पाहुणे न मानतां आपली कांहीं तरी सेवा सांगाल तरच आम्ही राहूं. नाहींतर आम्ही रहाणार नाहीं."

" तसं का होईना. राजधानींत गेल्यावर कांहीं कामगिरी तुमच्याकडे देऊं म्हणजे झालं ना ? "

मोठमोठे राजेरजवाडे ज्यांची सेवा करण्यांत स्वतःला धन्य मानीत, त्या वीरपुरुषांस आज दुसऱ्याची सेवा करण्याचा प्रसंग यावा ही दैवाची विचित्र घटना म्हटली पाहिजे!

असो. कुमार, संग्राम व मानसिंग हरपालदेवाबरोबर त्यांच्या दुर्गाकडे निघाले.

## प्रकरण ११ वें.

# रणमल्लाचें चितोडास आगमन.

" बाप्पाजी आले कां ? " राणीनें उत्सुकतेनें भोलानाथास विचारलें. चंद्रसिंह निघून जातांच आपल्या माहेरच्या एका मनुष्याला राणीनें मारवाडला आपल्या पित्याकडे पाठविला होता व आज आपला पिता आला पाहिजे असें

तिला वाटत होतें. राणाजी वारल्यापासून रणमल्लानें कांहींना कांहीं निमित्तानें आपले बरेच लोक हळुहळु चितोडला पाठविण्याचा उपक्रम सुरू केला होता. राणीच्या जोरावर यांपैकीं कांहीं मंडळींनीं दरबारांतहि शिरकाव करून घेतला होता. सर्वांचें प्रेम चंद्रसिंहावर आहे व ही मंडळी आपल्याला वेळेस दगा देतील अशा समजुतीनें राणीचा ओढा तिच्या माहेरच्या मंडळीवर अधिक होता त्यांच्याच हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें असावीं म्हणजे आपल्याला तितकी काळजी नाहीं असें राणीला वाटत होतें. चंद्रसिंह जातांच रणमल्लास बोलावून आपल्या मनाप्रमाणें राज्यव्यवस्था करावी असेंहि तिला वाटत होतें. रणमल्ल आपल्या बरोबर जयमल्लादि बरीच मंडळी घेऊन आला होता.

भोलानाथ घाईघाईनें राणीला सांगावयासच आला. राणीनें त्याचा उद्देश ओळखूनच वरील वाक्य उच्चारलें.

“ बासाहेब, बाप्पाजींची स्वारी इकडेच येत आहे. ” तो म्हणाला. राणीला आनंद झाला, माहेरचें मनुष्य आलें म्हणजे कोणत्या स्त्रीला हर्ष होणार नाहीं ? मग ती कोणत्याहि स्थितींत व कोणत्याहि वयाची असो; तिला मनापासून आनंद वाटूं लागतो. आपला पिता आल्याचें ऐकून राणीला हर्ष झाल्यास काय नवल ?

राणी स्वतः उठून दरवाज्याजवळ आली. इतक्यांत रणमल्ल व जयमल्लहि तेथें येऊन पोंचले. आपल्या मुलीकडे मोठ्या ममताळूपणानें पाहून रणमल्ल म्हणाला, “ पद्मा. तुझी प्रकृति तर ठीक आहे ना ? ”

“ होय बाप्पाजी, माझी प्रकृति चांगली आहे. ”

“ कसली चांगली ! मला तर तूं अगदीं आजाऱ्यासारखी दिसतेस. या राजखटपटीमुळं जीवाला कुठलं चैन पडायला ? ” काळजीच्या स्वरानें रणमल्ल म्हणाला व आपण खरोखरीच आजारी दिसूं लागलों कीं काय असें राणीलाहि वाटूं लागलें. कारण या खटपटीमुळें आपल्याला फार त्रास झाला व त्याचा परिणाम आपल्या नाजूक प्रकृतीवर झालेला आपल्या समजण्यांत आला नाहीं पण आपल्या ममतेच्या पित्याला कळला, अशी तिला शंका येऊं लागली.

“ महाराज, त्यांना थोडा का त्रास होत होता ? ” मध्येंच भोलानाथ म्हणाला. “ चितोडचं राज्य त्यांचं असून एका काडीवरहि त्यांची सत्ता नव्हती. अशा परिस्थितींत कोणाला चैन पडणार होतं ? ”

" खरंच, पद्मकुमारी, तुला भारीच त्रास झालेला दिसतो. आतां तूं मुळींच काळजी करूं नकोस. पाहशील थोड्याच दिवसांत सर्व व्यवस्था कशी सुरळीत करून टाकीन ती ! " रणमल्ल म्हणाला

" बाप्पाजी, तुम्ही असल्यावर मला कसली काळजी म्हणा," निर्धास्तपणानें राणी म्हणाली. नंतर आंतल्या बाजूला सर्व बैठकीवर बसले. राणी तरुण मानकुंवरला म्हणाली. "मानकुंवर, मुकुलजीला इकडे घेऊन ये." मानकुंवर गेली व रणमल्ल क्षणभर तिच्याकडे पहातच उभा राहिला. जयमल्ल इतका वेळ गप्प बसला होता. बसल्याबसल्या त्या दालनाचें निरीक्षण करीत होता. चितोडचें वैभव व ऐश्वर्य पाहून त्याची मति गुंग झाली होती. राणीचा महाल म्हणजे उत्कृष्ट कोरीव कामाचा नमूना होता. आपल्या ओबडधोबड घराची व महालाची मनांत तो तुलना करीत होता. "हें सर्व वैभव आपल्याला भोगायला मिळेल कां ?" असाहि एक विचार त्याच्या मनांत येऊन गेला. आतां तो राणीच्या दासी कुणबिणींकडे निर्लज्जपणें पाहूं लागला. त्याच्या विचित्र वर्तनाचा त्या कुणबिणींना राग आला पण आपल्या धनिणीपुढें त्या कांहीं बोलूं शकल्या नाहींत. नाहीं तर चितोडच्या नाजुक स्त्रियांच्या जिव्हेचा कठोरपणाहि त्याला अनुभवावयास मिळाला असता.

मुकुलजी, दाई जसु व मानकुंवर आल्या. जयमल्ल एकदम उठला व लगबगीनें मुकुलजीला घ्यावयास पुढें गेला. त्याला घेतांना मुद्दामच त्यानें मानकुंवरला धक्का दिला. त्याच्या या बेशरमपणाचा तिला अतिशय राग आला. तिचें तोंड संतापानें लाल झालें. तिच्याकडे पाहून निर्लज्जपणें हंसून तो म्हणाला, " मानकुंवर, माझा धक्का तुला लागला खरा, पण तूं रागावूं नकोस. राणाजीला भेटण्याचे धांदलींत माझा हात लागला खरा." मानकुंवर कांहीं न बोलतां दूर उभी राहिली. रणमल्लानें पुढें होऊन मुकुलजीला उचलून आपल्या मांडीवर बसविलें. त्याला खेळवीत व त्याचे लाड करीत रणमल्ल आपल्या मुलीला म्हणाला, "राणाजीसारख्या वृद्धानं तुझ्याशीं लग्न करून तुझ्या मुलाला चितोडचं सिंहासन दिलं हें ठीक केलं. नाहीं तर अशा वयांत लग्न करणं म्हणजे निव्वळ मूर्खपणा. राणाजीची मागणी आम्हाला नाकारतां आली नाहीं. एकंदरींत झालं हें ठीक झालं." राणी कांहींच बोलली नाहीं.

" महाराज, कांहीं म्हणा आपल्या पद्मकुमारी भाग्यशाली खऱ्याच. चितोडची महाराणी होणं सर्वांच्या नशिबीं कुठलं असायला ? अन् राजमाता होणं तर

त्याहून कठीण. कारण या महाराणांच्या शेंकडों राण्या असणार व राणाजींच्या मर्जीच्याच राणीच्या मुलाला राज्य मिळणार. चंद्रसिंहाला बाजूला करून मुकुलजीला गादीवर बसविला हा राणाजींनीं शहाणपणाच केला म्हणायचा. पद्मकुमारीच्या वांट्याला हा मान आला हें खरोखरींच भाग्यच म्हटलं पाहिजे." जयमल्ल बोलत होता व वांकड्या नजरेनें मानकुंवरकडे पहात होता. राणीला त्याचें बोलणें रुचतें नव्हतें, असें तिच्या कपाळावरील बारीक आठ्यांवरून दिसत होतें, परंतु ती कांहीं न बोलतां गप्प बसली होती.

रणमल्ल म्हणाला, "पद्मकुमारी, चंद्रसिंह कां चालते झाले ?" त्याला जसें कांहींच ठाऊक नव्हतें !

"बाप्पाजी, कारण नसतां उगाचच रागानें गेले त्याला मी काय करणार? शिवाय त्यांनां वाटे खरा सत्ताधिश मीच. आम्ही म्हणजे कोणीच नव्हत. हें मला तरी कसं सहन व्हावं. सहज तसें म्हटलं तर गेले रागारागानं."

"बासाहेब म्हणजे एक बाहुलं. चंद्रसिंहच राणा होते म्हणाना !" मध्येंच भोलानाथनें तोंड घातलें.

"तुम्ही यापूर्वींच त्यांचा प्रतिकार करायला पाहिजे होतं. इतके दिवस तरी त्यांचं कसं चालूं दिलंस ?" जयमल्ल मिशीला पीळ भरीत म्हणाला. "मुकुलजी राणा असतां त्यांना इतकं महत्त्व देण्याचं कारण काय?"

"अहो, सर्वांचं त्यांच्यावर प्रेम. माझाच दोष सर्वांना दिसत होता, पण अखेरीस सर्वांची खात्री झाली." राणी म्हणाली.

इतका वेळ आजोबाच्या मांडीवर गप्प बसलेला मुकुलजी चटकन उठून आपल्या आईजवळ आला. "बासाहेब, मोठा भाई कुठं आहे, मला मोठाभाईकडं जायचंय." म्हणून विचारूं लागला. मुकुलजीचें आपल्या वडील बंधुवर अत्यंत प्रेम होतें. चंद्रसिंह त्याला या दहाबारा दिवसांत न दिसल्यामुळें त्याला चुकल्या चुकल्यासारखें वाटे व तो त्याला भेटण्यासाठीं एकादे वेळेस हट्टून बसे व त्याचा हट्ट पुरा करतांकरतां सर्वांच्या नाकीं नऊ येत. आपल्या मोटाभाईला पहावयास मुकुलजी त्याच्या जुन्या चंद्रमहालांत दिवसांतून एकदां तरी जाऊन येत असे. त्याला वाटे आपला भाई तेथेंच असेल. चंद्रसिंहाचा विषय निघतांच त्याला त्याची आठवण झाली. आपला भाई कां दिसत नाहीं हें त्या अज्ञान बालकास काय माहीत ?

" बाळ, मोटाभाई तुझ्यावर रागावून गेला ना? " राणी त्याला समजावण्यास म्हणाली.

" अंहं, खोटं, मला मोटाभाईकडे जायचं. " त्यानें अगदीं छंदच घेतला. पुष्कळ समजूत घातली पण त्याची समजूत न पडून तो आतां तर रडूं लागला.

" पाहिलंत बाप्पाजी, चंद्रसिंहासाठीं हा कसं तुफान करतो तें," याचं त्यांच्यावर इतकं प्रेम, पण त्याना काय त्यांचं!"अग, त्याला हा दुष्मनासारखाच वाटत असेल. "छद्मिपणानें रणमल्ल म्हणाला. मुकुलजी अखेर दमून झोंपीं गेल्यावर राणीनें त्याला तेथून नेण्यास जमुला सांगितलें व भोलानाथल ती म्हणाली, " चंद्रसिंहाचा चंद्रमहाल रिकामाच आहे तिथं बाप्पाजींच्या रहाण्याची व्यवस्था करायला सांगा. "

नंतर रणमल्ल जयमल्लाची जोडी चंद्रमहालांत गेली.आरामानें एका आसनावर बसून जयमल्ल म्हणाला, " काही म्हणा महाराज, ही चितोडपुरी म्हणजे प्रत्यक्ष इंद्रपुरीच आहे. "

" कशी बुवा ? "

" अहो कशी म्हणून काय विचारतां. इकडे एकएक महाल पहा, नाहीं तर आपलं भिकार मारवाड ! तशाच एकएक दासी, कुणबिणी तर पहा, जशा काय अप्सराच ? ती मानकुंवरच पहाना ? तिचं स्वरूप तर वेड लावण्यासारखं आहे बुवा ! आपण तर तिला आपल्या सेवेसाठीं पद्मकुमारीजवळून मागून घेणार, " आपल्या भरदार मिशांना पीळ भरीत जयमल्ल म्हणाला.

त्यावर रणमल्ल हसून म्हणाला. " अहो जयमल्लजी, चितोडांत आजच तुम्ही पाय दिला आहे, संभाळून रहा बर कां ? "

" होय. अन् मला म्हणूनच वाटायला लागलं, कीं मी इंद्रपुरींत तर येऊन पडलों नाहीं. आपल्या तिकडल्या त्या मारवाडी कुणबिणी पाहिल्या कीं ओकारीच येईल. छी छी ! महिन्यामहिन्यांत स्नान सुद्धां करायच्या नाहींत अन् त्यांचा तो सोळा हातांचा घागरा म्हणजे घामटपणाचं आगरच म्हणायला हवं. इथल्या दासी कुणबिणी जर इतक्या सुंदर, तर इतर रजपुत स्त्रिया कशा असतील याची कल्पनाच करावी ! "

" अरे, आतां आपण इथं आलों आहोंत तेव्हां इथली सर्व मजा पाहल्याशिवाय मारवाडला परत जाणार आहोंत कां ? आस्ते आस्ते सर्व कांहीं जमवून

आणूं." रणमल्ल स्मित करीत म्हणाला. रणमल्ल व जयमल्ल पन्नाशिच्या वर होते, परंतु आपण ऐन पंचविशींत आहों असें त्यांना वाटत होतें. त्यांचा एकंदर थाटहि तसाच होता. केसांची चापचोप, मिशावरचा पीळ, बोलण्या-चालण्याची ऐटदार ढब पाहून कोणालाहि त्यांच्या रंगेलपणाची कल्पना आली असती.

## प्रकरण १२ वें.

# राजकुंवर.

इ. स. १५३५ त सुलतान अल्तमश् यानें माळव्यावर स्वारी करून उज्जयिनी व भेलसा व ग्वालेर वगैरे शहरें घेऊन माळवा प्रांत दिल्लीच्या अंमलाखालीं आणला. माळव्यावर दिल्लीच्या सुलतानाचे वेळोवेळीं हल्ले हात होतेच. इ. स. १२९१ त जलालुद्दीन खिलजी यानें पुनः माळव्यावर स्वारी करून देवळें लुटून बरीच लूट नेली व पुनः दोन वर्षांनीं देवगिरीच्या याद-वावर चाल करून जातांना अल्लाउद्दीनानें माळव्या प्रांतांत धुमाकूळ घालून बरीच लूट नेली. या रीतीनें वारंवार मुसलमानांच्या हल्ल्यामुळें माळव्यांत त्यांची सत्ता वाढत चालली.

माळव्याचे मूळचे परमारवंशी रजपुत हिंदुराजांचे वंशज कोठें तरी जीव धरून राहात असत. त्यांपैकींच राजा हरपाल देव हा राजदुर्गांत रहात होता. माळव्याचा सुलतान दिलावरखान घोरी याला त्यांना खंडणी द्यावी लागत असे. मुंजभोजासारखे महाबलवान् कीर्तिमान् राजे ज्या वंशांत होऊन गेले त्याच कुलांत आपला जन्म असून आपणास मुसलमानाचे अंकित बनावें लागलें, याचा राजाला मनांतून फार खेद होई, परंतु ज्याला दिल्लीच्या शहाचें सहाय्य आहे अशा माळव्याच्या सुलतानाविरुद्ध ब्र काढण्याचीही हरपालदेवाची ताकद नव्हती. शिवाय राजा स्वतः तितका करारी स्वभावाचा नव्हता. म्हणून सुलतानाशीं नमतें घेऊनच तो आपला राज्यकारभार चालवीत होता.

हरपालदेवाचे वंशज शिवशक्तीचे भक्त होते. राजानें आपल्या राजमहाला-मागें एक सुंदर शिवसमंद सरोवर खोदविलें होतें व सरोवरावरच एक रमणीय शिवालय बांधविलें होतें. समोर विंध्याद्रीची रांग व दोहो बाजूंला हिरव्यागार

वृक्षवेलींमुळें सरोवराला फारच रमणयित्व आलें होतें. हरपालदेवाची कै. वृद्ध माता शंकराच्या त्रिकाल दर्शनाला नित्य येत असे. राजकुटुंबाखेरीज या देवालयांत इतर कोणी जात नसत. राजपरिवारांतील स्त्रिया वाटेल तेव्हां शंकराच्या व देवीच्या दर्शनाला येत असत.

सायंकाळ होऊन सूर्यनारायणाचा अस्त झाला होता, परंतु पश्चिम दिशेला लाल लाल गुलाल उधळल्यासारखा दिसत होता व सरोवरांतहि लालच लाल रंग दिसून आसपासच्या हिरव्या वृक्षलतांना अतिशय शोभा आल्यासारखें वाटत होतें. सरोवराच्या संगमरवरी कांठावर हरपालदेवाची कन्या राजकुंवर बसून समोरचा रमणीय देखावा पहात होती. नंतर गाभाऱ्याकडे शंकराच्या पिंडीकडे पाहून तिनें एक लांब सुस्कारा सोडला व मनाशींच ती हळुहळु गाऊं लागली. उत्तरोत्तर तिचा आवाज उंच होऊं लागला.

( [1]राग पिलु )

**" हम सब बाला निपटबिहाला पतिविन परम दुःखारी ॥**
**वेग चिताधीक भस्म करो प्रभु, हम सब सखातिहारी ॥**
**अगन ॥ १ ॥**
**सुन रे यवन अधम चंडाला, हृदय दियो तुमजारी ॥**
**साखी सुर प्रति फल पाओगे, भोगोगे दुःख भारी , ॥**
**अगन ॥ २ ॥"**

राजकुंवर पुनःपुनः घोळूनघोळून तेंच गाणें आपल्या मंजुळ स्वरानें म्हणत होती. इतक्यांत तिच्या मागें तिच्याच वयाची दुसरी तरुण मुलगी हळुहळूं येऊन उभी राहिली. थोडावेळ थांबून ती मनाशींच हंसली, ती म्हणत असलेलें गाणें तिला स्पष्ट ऐकूं आलें तेव्हां तिनें भुंवया चढविल्या.

" कुंवरबा, हेंच गाणं म्हणायची आज तुम्हाला कां लहर लागली ? असं कोणतं दुःख तुमच्यावर येऊन पडलंय ? "

---

१ " हमलेय चित्तौर " नामक नाटकांत असें हृदयस्पर्शी वर्णन केलेलें आहे कीं, चितोडच्या रजपूत रमणी चितेंत भस्म होतेसमयीं असें गीत गात गात आनंदानें चिताप्रवेश करीत.

क. टॉड कृत राजस्थानचा इतिहास.

" कोण चंदा ? " राजकुंवर दचकून म्हणाली. " चंद्रा अशी चोरट्यासारखी केव्हां आलीस ग ? ये, बैस इथं. " म्हणून राजकुंवरनें तिला आपल्याजवळ बसविली.

" खरंच; कुंवरबा, तुम्ही म्हणत होतात तेंच गाणं तुम्हाला आज कां आठवलं ? " चंदा खालीं बसून मैत्रिणीकडे पहात म्हणाली.

" उगाच आपलं सहज आठवलं तें म्हणत होतें झालं ? " उडवाउडवी करण्याच्या उद्देशानें राजकुंवर म्हणाली. पण चंदा तितकी भोळी नव्हती.

" कुंवरबा, संकटाच्या वेळीं हें गाणं रजपुत स्त्रिया म्हणतात खरं ना ? तुम्हाला कसलं संकट पडलं आहे एवढं ? अन् पतिविन दुःखारी, असं म्हणाल तर तुमचं अद्याप लग्न झालं नाहीं व तुम्ही त्या बाटग्यासी लग्न कराल कां ? "

" चंदा, तुला काय वाटतं ? असल्या नामर्दाशीं मी लग्न करीन होय ? मोठेपणासाठीं बाटलेल्या नामर्दाशीं कधीं तरी लग्न करीन काय ? "

" तसं वाटत नाहीं म्हणून तर विचारते ? "

" मग झालं तर ! त्याच्याशीं लग्न करण्यापेक्षां हें शिवसमंद सरोवर काय वाईट. " सरोवराकडे बोट दाखवून ती म्हणाली.

" अस्सं, अस्सं. आतां आलं माझ्या लक्षांत, तुम्ही गाणं कां म्हणतां तें ! " चंदा खोडसाळपणानें हंसून म्हणाली.

" काय लक्षांत आलं ? "

" त्या गाण्याचा अर्थ. कुंवरबा, तुम्हाला कांहीं तसंच मोठं संकट पडलं आहे, म्हणून तें गाणं तुम्हाला आठवलं वाटतं ? " थट्टेच्या स्वरानें चंदा म्हणाली.

" चंदा, ही थट्टेची वेळ नव्हे. " तिच्या सुंदर मुखावर गंभीरपणा दिसूं लागला. " खरंच माझ्यावर मोठंच संकट आलं आहे हें तुला ठाऊक नाहीं कां ? माझ्या मनाची स्थिति काय होत असेल तूंच विचार कर बरं. " राजकुंवर चंदाच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली.

" कुंवरबा, त्यांत एवढं बिघडलं कुठं मी म्हणते. पूर्वीचा जोरावरसिंगाचा आतां जोरावरखां झाला एवढंच ना ! " हंसत चंदा म्हणाली. पण राजकुंवरच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलेलें पाहून तिला आपल्या थट्टेबद्दल वाईट वाटलें. " कुंवरबा, तो मेला सुलतानाचा उमराव झाला आहे म्हणे ? "

" उमराव होवो, नाहीं तर सुलतान होवो मला काय करायचं त्याच्याशीं?" निःश्वास सोडून ती म्हणाली.

" मग काय करणार तुम्ही, तुमचं सगपण[1] तर लहानपणींच झालेलं आहे, आतां नाहीं म्हणणं शक्य तरी आहे कां ? "

" अन् म्हणूनच मी इतक्या संकटांत पडलें आहे ? भगवान् महाकालेश्वरच या संकटांतून मुक्त करील ! " दीर्घ श्वास सोडून ती म्हणाली. " चंदा, प्राण गेला तरी त्या बाडग्याशीं लग्न करणार नाहीं. तशीच वेळ आली तर रजपुत मुली आपलं जीवित किती कस्पटासमान लेखतात हें सांगायला नको. मी भोजमुंज्यासारख्यांच्या वंशाची आहे. " निश्चयानें ती म्हणाली. तिच्या सुंदर मुखाकडे क्षणभर चंदा कौतुकानें पहातच राहिली.

" अहो, एवढं जिवावर उदार व्हायला नको बरं. मी तुम्हाला सांगतें, तुमचं लग्न या बाटग्याशीं खात्रीनें होणार नाहीं. कुळवान रजपुताशींच होणार."

" कशावरून ग ? "

" तुम्ही लहान होतात, मला आठवतंय थोडं थोडं. आपण दोघी पिताजीजवळ बसलों होतों. पिताजी एका साधूशीं बोलत होते.साधूला ज्योतिष चांगलं कळत होतं. ते तुमचा हात पाहून म्हणाले ही मुलगी भाग्यवान् आहे. थोडसं चुकलं नाहीं तर महाराणीच झाली असती, पण ती महाराणी झाली नाहीं तरी हिला महाप्रतापी असा वर मिळेल व हिची संतति मोठी कीर्तिमान होईल । साधूचं वचन खोटं कसं होईल ? "

"चल, चंदा, दुष्ट आहेस तूं. कांहीं तरी मनचंच जोडून सांगते आहेस झालं." तिच्या खांद्यावर एक चापट मारून ती म्हणाली.

" काय सांगावं तुम्हाला ? खरोखरींच सांगतें मी, पाहिजे तर पिताजींना विचारा. "

" पुरें, पुरें. फाजिल नाहीं तर. "

" बरं, आपण आतां शकुन पाहूं या. तो बघा, तो सरोवराच्या कांठीं बगळा बसला आहे ना ? तो पाहा, तो बुडी मारतो आहे. त्याला जर या खेपेला मासा मिळाला नाहीं तर माझं म्हणण खरं, नाहीं तर खोटं. " चंदानें दाख-

---

[1] रजपुतांत लहानपणापासून लग्नें जमतात व त्याला सगपण ( वाङ्निश्चय ) म्हणतात. मग पुढें सोईप्रमाणें केव्हांहि लग्न झालें तरी चालतें.

विल्याप्रमाणें एक बगळा खरोखरींच तेथें मासे धरण्यांत गुंतला होता व त्यानें पाण्यांत चोंच घातली. चंदा ही निव्वळ थट्टा करीत आहे असें माहीत असूनहि राजकुंवर त्या बगळ्याकडे पाहूं लागली.आणि खरोखरींच त्या वेळेस बगळ्याला मासा मिळाला नाहीं व तो उडून दुसरीकडे निघून गेला.

" खरंच, कुंवरबा, माझंच खरं होणार." चंदा हंसून व मोठ्यानें टाळी वाजवून म्हणाली. " त्या बाडग्याशीं तुमचं लग्न होत नाहीं हें निश्चित."

" निश्चितच आहे. कांहीं झालं तरी बाटून मुसलमान झालेल्या त्या अधमाशीं मी कधींहि लग्न करणार नाहीं. मी रजपुत आहे, वैभवानं माझे डोळे दिपणार नाहींत. शौर्याची किंमत बादशाहींत नाहीं म्हणावं ?"

" बरी आठवण झाली, कुंवरबा, तीन महिन्यांपूर्वी पिताजीबरोबर ते दोन शूर सरदारपुत्र कीं कोण कोणास ठाऊक आले आहेत, त्यांना तुम्ही पाह्यलंत कां ?"

" नाहीं. नुसत्या त्यांच्या शौर्याच्या गोष्टी ऐकल्यांत, काय बरं त्यांचं नांव ?"

" विजयसिंह, अन् दुसऱ्याचं जयसिंह. पण कुंवरबा, ते दिसतात तसे नाहींत बरं कां ?"

" कशावरून ग ?"

" तो जयसिंह एकांतांत विजयसिंहाला कुमार म्हणतो व त्याचा फार मान ठेवतो. मला वाटतं तो विजयसिंह कोणा थोरामोठ्याचा पुत्र असावा."

" लागलीस भलतेच तर्क करायला." हंसून राजकुंवर म्हणाली. " ते कुठून आले कळलं कां तुला ?"

" नाहीं बाई. तो त्यांचा नोकर मानसिंगहि फार ठक आहे. कांहीं दाद लागूं देईल तर शपथ. तुम्ही त्यांना पाहिलेंत कां ?"

" मी कुठून पाहणार ?"

" हो, खरंच. बरं पण परवां अहेरियाला सर्व वाड्यांत जमून एकत्रच जातील व रात्रीं भोजनास सर्वच वाड्यांत येतील तेव्हां पहाल तुम्ही. विजयसिंह अगदीं राजबिंडे दिसतात हं."

" चंदा." हंसून राजकुंवर म्हणाली. " अग, तूं अविवाहित आहेस हें विसरतेस वाटतं. दुसऱ्या तरुण पुरुषासंबंधी बोलूं नाहीं असं."

" खरं कां, मग तुम्हाला हो कशाला एवढी चौकशी ? " लटक्या रागानें ती म्हणाली, " बरं, विजयसिंह कुठला हें मी तुम्हांला सांगणारच नाहीं आतां. पाहूं तुम्ही कशा ओळखतात तें ! "

" चंदा, चंदा, अग मी सहज थट्टा केली बरं. चंदा, आज सकाळीं पिताजींचं व आईचं बोलणं चाललं होतं तें मी ओझरतं ऐकलं, तेव्हांपासून माझी ही अशी स्थिति झाली आहे. बघ, अन् तूं ऐकून न घेतां रागावून बसतेस. "

" नाहीं रागावणार हं " चटकन् चंदा म्हणाली. " काय झालं तें तर तुम्ही सांगितलं नाहीं. "

" लवकर लग्न करून घ्यावं असा त्या मेल्याचा निरोप आला आहे व पिताजी मोठ्या फिकिरीत पडले आहेत. ते म्हणतात रजपुताचं जमलेलं लग्न मोडायचं नाहीं, अन् याला मुलगी द्यावी तरी कशी ? बरं नाहीं म्हणावं तर त्याला सुलतानाचा जोर आहे. एकदम लढाईला येईल व सुलतानाशीं टक्कर देणं पिताजींना शक्य नाहीं. खरंच सांग, चंदा, माझ्यामुळं पिताजींवर संकट आलं आहे, म्हणून वाटतं आपणच जगांतून नाहींसं झालेलं काय वाईट ? "

" कुंवरबा, अद्याप तशीच वेळ आली नाहीं. भलताच विचार मनांत आणूं नका. भगवान् महाकालेश्वर सुचवील कांहीं तरी मार्ग. "

" हं ! " दीर्घश्वास सोडून ती म्हणाली.

" कुंवरबा, श्रीशंकर विजयसिंहाच्या हातूनहि तुमचं संकट टाळील कोणी सांगावं ? "

" भलतीच कशाला आशा लावतेस ? " मानेला हिसका देऊन राजकुंवर म्हणाली. "ते कोण कुठले ह्याचा मुळींच आपल्याला थांग नाहीं.."

" तुम्ही काळजी करूं नका. मी त्यांची सर्व माहिती मिळवून आणीन व तशीच वेळ आली तर पाहूं पुढं काय करायचं ते." चंदा आश्वासन देत म्हणाली.

" तुला कशी माहिती मिळेल ? " शंकित हृदयानें राजकुंवर म्हणाली, त्यावर चंदा हंसून म्हणाली. " त्याची तुम्हाला पंचाईत ? पण तुम्ही एकदां त्यांना पाहा मग आपण काय तें ठरवूं. " चंदानें डोळे मिचकावून राजकुंवरकडे पाहिलें.

" चल, बहाटळ कुठली. " ती म्हणाली व दोघी उठून वाड्यांत गेल्या.

## प्रकरण १३ वें

# जसूची शंका.

“ मान, काय झालं तुला ? कां बरं रडतेस ? ” मुकुलजीची वृद्ध दाई जसु स्फुंदून स्फुंदून रडत असलेल्या मानकुंवरला विचारूं लागली. मानकुंवर सोळासतरा वर्षांची होती. ती कुणबीण असून स्वरूपवान होती. दोनतीन पिढ्यांपासून चितोडच्या राजघराण्याशीं तिचा संबंध होता. चंद्रसिंहाच्या मातेची तिची आई विश्वासू दासी होती, मानकुंवर लहान होती तेंव्हांच तिची आई वारली, व मरतेसमयीं तिनें आपल्या मुलीला सांगितलें होतें कीं, बासाहेबांच्या मर्जीनं वाग. आपलं पिढीजाद नांव घालवूं नको. पुढें चंद्रसिंहाची आईहि वारली व पद्मकुमारी आल्यावर तिच्या तैनातीकडे तिची नेमणूक झाली. तिला जवळचे कोणीच आप्त नव्हते. जसूचे ममतेचे शब्द ऐकतांच ती अधिकच रडूं लागली. तिच्या पाठीवरून स्नेहानें हात फिरवीत जसु म्हणाली, “ बेटा, उगी रहा. कां बरं रडतेस ? ” जसु जों जों तिची समजूत करूं लागे तों तों मानकुंवरला अधिकच रडण्याचे कड येत. जसु सर्वांशींच प्रेमळपणानें वागे; त्यांत मानकुंवरवर तिचें पोटच्या मुलीसारखें प्रेम होतें. तशाच कारणाशिवाय मानकुंवर अशी रडणार नाहीं हें ती जाणत होती. मानकुंवरला क्षणभर मनसोक्त रडूं द्यावें म्हणून ती थोडा वेळ गप्प राहिली. तिच्या पाठीवरून ती नुसताच हलुवारपणें हात फिरवीत होती.

“ बेटा, मान, काय झालं तुला ? ”

“ जसुबा, जसुबा. काय करूं मी, ” तिच्या खांद्यावर आपलें मस्तक टेकून दुःखभरानें मानकुंवर म्हणाली. “ मला इथं राहूं नये असं वाटूं लागलं आहे. ”

“ पण काय झालं तें कारण तर सांगशील ? ” तिचे केंस सारीत जसु म्हणाली.

“ काय सांगूं ” ती निराशेनें म्हणाली. “ जसुबा, हा मेला चांडाळ जयमल्ल दैत्यासारखा माझ्या मागं लागला आहे. निसंतान होवो मेल्याचं. ” रागानें बोटें मोडून ती म्हणाली. “ मी कुणबीण झालें म्हणून मला

कांहींच नाहीं वाटतं ? मेला बाप शोभतोय. खरंच सांग जसुबा, मी काय करूं आतां ?"

" मान, त्याची नजर पापी आहे हें मला केव्हांच कळलं आहे. बेटा, काय केलं त्यानं ?"

" पाहिलंत ना ? पहिल्याच दिवशीं सर्वांसमक्ष मला कसा धक्का दिला त्यानं. बासाहेब समोर होत्या पण कांहीं बोलल्या नाहींत." श्वास सोडून ती म्हणाली.

" नसेल तितकं त्यांच्या लक्षांत."

" नाहीं कसं ? तें राहूं द्या, पण परवांच त्यांना सांगितलं तो माझ्याशीं कसं वर्तन करतो तें; त्या उलट मलाच रागावून म्हणाल्या. तुम्हा चितोडच्या लोकांना माझ्या भाहेरची मंडळी सहन होत नाहींत, मग काय बोलणार मी ?"

" बरं, तें असूं दे. पण आज काय केलं त्यानं ?"

" त्या पलीकडल्या दालनांत बासाहेबांसाठीं मी विडे लावीत बसलें होतें. तो मेला दुष्ट आंत केव्हां आला हें मला कळलंच नाहीं. अन् माझ्याजवळ येऊन बसला अगदीं. मी काय पण घाबरलें, उठते तों माझा हातच धरून ठेवला मेल्यानं. अन् सारीं दारं बंद करून घेतलीं होतीं. मला त्याच्या या लोचटपणाचा असा संताप आला अन् मी जोरानें माझा हात हिसकून घेतला, त्यामुळं त्याचा हात गळूनच पडला असेल असं मला वाटलं; विवळतच राहिला क्षणभर. तशीच मुस्कटांत मारून पळालें. तो मला धरायला धावला; पण त्यापूर्वीच मी दार उघडून बाहेर आलें. त्यामुळं तो फार चिडला व मला कांहींतरीच बोलूं लागला. म्हणतो कसा, तुझ्या बासाहेबांना भिणार नाहीं तर तुला गुलामडीला भितोय मी. पाहून घेईन पुनः" असें म्हणून मानकुंवर जोरानें येणारे अश्रु पुसूं लागली.

" गप्प रहा. पुनः ही हकीगत बासाहेबांच्या कानावर घाल एकदां ?"

" काय सांगूं कपाळ ? त्यांना खरं वाटेल तेव्हां ना ? त्याचंच त्यांना खरं वाटणार !"

" पण सांगून तर पहा. त्यांच्या वडलांच्या कानावर गेलं पाहिजे म्हणजे ते कांहीं तरी बंदोबस्त करतील."

मानकुंवर खिन्नपणें हंसली. "जसुबा, ते दोघेहि मेले दुष्ट चांडाळ आहेत." तिचा संतापाग्नि भडकून गेला.

" पोरी, हळू बोल. बासाहेबांचे पिताजी ना ते ? "

" म्हणून काय झालं ? तुम्ही बहुतेक बालराणाजीजवळ असतां. तुम्हाला काय ठाऊक, हे दोघं पापी चांडाळ आम्हाला कसा त्रास देतात ते ! मेल्यांनो, प्रसंग आला तर ही चितोडची दासी तुमचे प्राण घेईल ! " तिचा श्वासोच्छ्वास जोरानें होऊं लागला.

" बासाहेबांना कसं हें कळत नाहीं ? "

" तेंच तर नवल आहे ? म्हणून तर हे मेले असले चाळे करतात ना ? मेल्या थेरड्यांना शोभतं कां हें ? नाहीं तर आपले कुमार, कधीं वर मान करून पाह्यचे नाहींत कुणाकडे. मी लहानपणीं त्यांच्याशीं किती खेळत असें, अन् धिंगामस्ती करी, पण आतां ते कधीं तरी वर पाहात होते कां ? ज्यांनीं त्यांना अंगाखांद्यावर खेळवलं, त्यांच्याकडे सुद्धां कधीं पाह्यचे नाहींत. कैकयी-सारखं केलं. बासाहेबांनीं रामचंद्राला देशोधडीं लावले, अन् हे दोन रावण-कुंभकर्ण आगले आपल्या अयोध्येंत, मेले उपटसुंभ. " मानकुंवर संतापून बोलत होती.

" हं हं, वेडे मानकुंवर, अशी मोठ्यानं बोलूं नकोस. "

" माझा संताप झाला आहे नुसता. "

" नुसता होऊन उपयोग काय ? कुमाराची गोष्ट कशाला पाहिजे ? तें शिसोदिया कुळाचं रक्त, त्याची सर कोणाला यायला ! पण एकंदरीनं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं ! आपण काय नोकरमाणसं !" दीर्घ निःश्वास सोडून जसु म्हणाली. "या थोड्या दिवसांत चितोडांत मारवाड्यांचा केवढा भरणा झाला आहे ! बाल राण्याला मांडीवर घेऊन स्वतः रणमल्लजीच सिंहासनावर बसतात, तेव्हां त्यांच्या मनांत कांहीं नाहीं ना अशी आपली मला शंका येते. शिसोदिया कुळाशिवाय ज्या सिंहासनावर कुणी बसूं शकणार नाही, त्या पवित्र सिंहासनावर हे परके लोक बसतांना पाहिलं म्हणजे असं कांहीं पित्त खवळतं, पण आपण काय करणार ? "

" खरंच जसुबा, आपले सारेच सरदार-सामंत मूर्ख बनलेत कां ? त्यांना कसं हें सहन होतं ? "

" तसं नाहीं ग ? चितोडचं शौर्य आजच नष्ट झालेलं नाहीं. पण राणा-साहेबापुढं ते तरी काय करतील ? "

" काय म्हणजे ? त्यांनीं नको कां बोलायला ? कुमार कुठं सिंहासनावर बसत होते ? "

" त्यांची तशी प्रतिज्ञाच होती ! "

" पण मग यांनीं तरी कां बसावं ? "

" मला तरी तसंच वाटतं. मी याबद्दल बासाहेबांजवळ बोलणार आहे. बाल राणाजीला कांहीं दगा न होवो म्हणजे झालं. " इकडेतिकडे नजर फिरवून हळूंच ती म्हणाली.

" खरंच ! तसा कांहीं बेत आहे काय ? " उतावेळपणानें मानकुंवर म्हणाली. आपल्यावरचें भावी संकट व नुकताच झालेला अपमान क्षणभर ती विसरली. रणमल्लानें हळूहळूं बरेच मारवाडी लोक चितोडांत आणले होते. इकडे बरीच अव्यवस्था माजली आहे म्हणून मला आणखी थोडे दिवस इथंच राहिलं पाहिजे. असें खोटेंच रणमल्ल जोधरावला कळवी व आपल्या मुलीच्या हस्तें मारवाड्यांना सरदाऱ्या व सामंतगिऱ्या देवविण्याचा त्यानें सपाटा लावला होता. राणीमुळें चितोडचे लोक बोलूं शकत नव्हते, परंतु मनांतून ते राणीवर बरेच नाखुष होऊं लागले.

रणमल्लाच्या पुढच्या धोरणाची अंधुक कल्पना जसूच्या मनांत उद्भवली. राणीला सावध करून ठेवणें आपलें कर्तव्य आहे असेंहि तिला वाटूं लागलें. मानकुंवराच्या प्रश्नाला तिनें उत्तर दिलें. " तसं कांहीं अद्याप मला कळलं नाहीं. पण लोभानं मनुष्य काय करील हें कुणी सांगावं ? "

फार वेळ झाला म्हणून जसु मुकुलजीकडे जावयास निघाली. जातां जातां ती मानकुंवरला म्हणाली, " मान, एकदां बासाहेबांच्या कानावर ही गोष्ट घालच. मीहि त्यांना सांगेन. " मानकुंवर दासी होती तरी तिला आपल्या शीलाची किंमत होती. आल्या दिवसापासून रणमल्ल व जयमल्ल तिच्याशीं पांचटपणाचें वर्तन करीत पण ती शक्य तों त्यांच्या वाटेस जात नसे. राणीच्या हुकुमावरून मनांत नसतांहि केव्हां केव्हां तिला रणमल्लाचे पाय चेपणें वगैरे सेवा करावी लागे.

## प्रकरण १४ वें

# खटपट

" काका, आम्हाला गोष्ट सांगतां कां ? " म्हणून कांहीं मुलें मेरामणच्या भोंवतीं जमा झालीं. कित्येक दिवसांपासून मेराकाकाची गोष्ट त्यांना ऐकावयाला मिळाली नव्हती. चंद्रसिंह गेल्यापासून म्हाताऱ्याचें कशांतच मन रमत नव्हतें. मेरामणचें प्रेम आपल्या सिंहबापूवर अतिशय होतें. लहानपणीं चंद्रसिंह फार हट्टी व दुराग्रही होता, तोच गुण म्हणा–दोष म्हणा मोठेपणींहि त्याच्या अंगांत पुष्कळ प्रमाणांत होता. त्यामुळेंच त्यानें आपला राज्याधिकारहि सोडून दिला होता. मेरामणनें चंद्रसिंहाला बालपणापासून आपल्या अंगाखांद्यावर खेळविलें होतें. अलीकडे त्याचें काम म्हणजे चंद्रमहालाच्या देवडीवर बसून गुडगुडी ओढावी व छोट्याछोट्या बालगोपाळांना रसिक गोष्टी सांगाव्यात. त्याच्या गोष्टी इतक्या रसाळ असत कीं मोठ्या मंडळींचाहि गराडा त्याच्या भोंवतीं पडे. चंद्रसिंह गेल्यापासून त्याला उदासवाणें झालें व त्यानें गोष्टी सांगणेंहि सोडून दिलें. कुमाराची आठवण झाली कीं, त्याच्या डोळ्यांतून झरझर अश्रु येत. तो आतांशा आपल्या देवडीवरून उठतच नसे. रणमल्लाचा करडा अम्मल सुरू झाल्यापासून बिचारीं मुलें त्याच्याजवळ देवडीवर जावयाला भीत. आज मेरामण देवडीच्या बाहेर पडलेला पाहतांच ' गोष्ट सांगा ' म्हणून लहान मुलें त्याच्या पाठीस लागलीं.

" बेटा, आज मी तुम्हाला सांगत नाहीं. मग केव्हां तरी सांगेन हं ? " असें मेराकाका बोलतांच मुलें बिचारी खट्टू झालीं. त्यांची कशी तरी समजूत करून काठी टेकीत टेकीत तो रामसिंगाच्या वाड्यांत गेला. मेरामण रामसिंगाच्या वाड्यांत गेल्यावर एका नोकरानें त्याला सरदारसाहेबांच्या खोलीजवळ पोंचविलें. रामसिंगजी हुक्का ओढीत डोळे मिटून कसल्या तरी विचारांत निमग्न झालेले दिसत होते.

" सरदारसाहेब, रामसिंगजी. " मेरामणाच्या कणखर आवाजानें सरदारसाहेब चपापून त्याच्याकडे पाहूं लागले. क्षणभर ते मेरामणकडे पहातच राहिले.

" मेराकाका, इकडे कोणीकडे ? "

" रामसिंगजी, राजेसाहेबांचा निरोप सांगायला आला आहे. चितोडचे नवे धनी बरं कां ? "

धनी ? मेरामण, राजेसाहेब चितोडचे धनी ? शिसोदिया वंश आजच नामशेष झाला नाहीं ! चितोडचा राजमुकुट असा सहजासहजीं चोरापोरांच्या हातीं जाणार नाहीं ! "

" खरं ना ? मग हे उपटसुंभ चितोड बळकावयाला बसले आहेत त्यांचा तुम्ही काय प्रतिकार करूं शकतां ? "

" खरंच; मेरामण, काळ मोठा कठिण आला आहे, " दीर्घ श्वास सोडून रामसिंग म्हणाले.

" रामसिंगजी, कांहीं म्हणा, पण मला पुढचं भविष्य ठीक दिसत नाहीं ! माझ्या मनांतली गोष्ट सांगतों. पहा बरं, आपण सर्व वेळींच सावध राहिला नाहींत तर चितोड गुमावून बसाल. "

" काय करावं म्हणतां ?

" काय करावं ? रामसिंगजी, आजच चितोडचं शूरत्व नष्ट झालं काय ? हा काळसर्प आयत्या बिळांत घुसायला पाहतो आहे, मुख्य गारोडीच निघून गेल्यावर यांच्या सारख्यांच फावायचंच. " निराशपूर्ण स्वरानें तो म्हणाला. पण सरदारसाहेब, आतां चितोडचं रक्षण करणं तुमच्या हातीं आहे. स्वदेशाभिमानाला उजळा दिला पाहिजे, गेलेली घडी पुनः येणार नाहीं ! "

" मेराकाका, सर्व गोष्टी खऱ्या आहेत, आम्हाला कळत नाहीं असं नाहीं, पण आम्ही तरी काय करणार ? राणीसाहेबांच्या पुढं कोणाचंच चालत नाहीं. त्यांना आपल्या माहेरच्या मंडळींचा फार लोभ आहे. हळूहळू मारवाड्यांचा भरणा चितोडांत किती झाला आहे पहा ! दरबारच्या कारभारांतहि हीं तीन शेंड्यांचीं शेंडेनक्षत्रं सर्वत्र भरलीं आहेत, आमचं म्हणणं कोण ऐकतोय ? आज काल तेच सत्ताधीश होऊन बसले आहेत. "

" मग काय ? बिनायासें हें चितोडचं वैभव मारवाड्यांच्या घरांत जाऊं देणार ? " मेरामण एक सामान्य रजपुत होता तरी त्याला सर्वत्र मान असे. मेरामणचें स्वदेशप्रेम जाज्वल्य होतें. राजव्यवस्थेच्या ढोंगाखालीं, राजपद पटकावण्याचा रणमल्लाचा दुष्ट हेतु त्याला कळला होता. तो चंद्रमहालाच्या देवडीवरच बसलेला असल्यामुळें त्याला रणमल्ल व जयमल्ल यांचें कारस्थान कसकसें

चाललें आहे याचा थोडा थाडा अंदाज करतां येई. गुडगुडी ओढत, अफूच्या तारेंत पडलेल्या या म्हाताऱ्याला कांहीं कळत नसेल अशी रणमल्ल जयमल्लाची समजूत होती. चितोडचे शूर सरदार रणमल्लाची इतकी आज्ञा कां मानतात हें त्याला कळेना व तो मनांतून त्यांच्यावर फार संतापला होता. प्रसंग येतांच त्यानें रामसिंगासारख्या सरदारास बोलावयास कमी केलें नाहीं. 'विनाश-कालीं विपरीत बुद्धि' होऊन हे लोक मूढ बनले नाहीं ना ? असेंहि त्याला वाटे. हें मारवाडी परदेशी लोक आपल्या देशांत घुसले आहेत; पण ते कायम-चाच देश बळकावून वसतील,याचा विचार केला पाहिजे.रणमल्ल वरून सर्वांशीं गोड गोड बोलत असे, परंतु अंतर्यामीं विष आहे हें कळायला पाहिजे. "मधु तिष्ठति जिव्हाग्रे, हृदये तु हलाहलम्," अशा वृत्तीचा रणमल्ल होता. आपल्या गोड वाणीच्या भुलथापांनीं सर्वांना झुकत ठेवून चितोड आपल्या घशांत उतर-विण्याचा त्याचा घाट होता. आपले लोक जर असेंच गैरसावधपणानें वागले तर चितोडवर या परक्यांचा अम्मल पुरूं होईल अशी चिंता त्याला वाटत होती; व त्यानें तसें रामसिंगाला बोलूनहि दाखविलें. भेरामणचे शब्द रामसिंगाच्या काळजाला भिडले. खरोखरींच आपण जर असेंच स्वस्थ वसलों तर आपला प्रिय देश-आपलें स्वातंत्र्य-आपला स्वाभिमान गुमावून वसूं व पारतंत्र्याच्या शृंखला आपण होऊन आपल्या पायांत अडकवून घेऊं.

"भेराकाका, तुम्ही म्हणतां तें खरं, हे परदेशचे मारवाडी दोन दिवसां-साठीं पाहुणे म्हणून आले, ते आमचे यजमान व्हायला पहात आहेत. ही घरांत घुसलेली घूस बाहेर कशी काढावी याच्या विचारांत मी कित्येक दिवस आहे. अलीकडे अशी स्थिति झालेली आहे कीं महत्त्वाचीं राज्यसूत्रें बहुतेक त्यांच्याच सल्ल्यानें चाललीं आहेत. आम्ही नुसते नामधारी आहोंत. त्याच्या हो-ला-हो म्हटलं पाहिजे. राणाजी बालक व राणीसाहेब राज्याच्या मुखत्यार ! चितोडची स्थिति पोरक्या पोरासारखी झाली आहे."

"रामसिंगजी, नाहीं नाहीं. माझं चितोड पोरकं नाहीं. अन् ते कधीं होणार नाहीं. तुमच्यासारखे आधारस्तंभच जर असे हतबद्ध झाल्यावर चितोडनं कोणाची आशा करावी ? तुम्ही दंड थोपटून उभे रहा, माझ्यासारखे वृद्धहि तुमच्या साह्याला धावून येतील." बोलणाऱ्या व्यक्तीकडे रामसिंग व भेरामण आश्चर्यानें पाहूं लागले. वृद्ध करणसिंग दारांतूनच बोलत होते. संतापानें त्यांचें अंग कांपत होतें. "रामसिंगजी, आतां हा अपमान सहन होत नाहीं ! आपण चोर अन् परके धनी-सावकार बनूं पहातात ?"

" या, करणसिंगजी,या." रामसिंगानें त्यांना आपल्या जवळ गादीवर बसविलें व मेरामणहि गालीच्याच्या कोंपऱ्यावर बसला.करणसिंहाला आपला राग सहन होत नव्हता. क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं " आमचं भाषण आपण ऐकलं वाटतं ? " रामसिंग म्हणाले.

" हो. रामसिंग, मी आज तेवढ्यासाठींच मुद्दाम तुमच्याकडे आलों आहे, मेरामणची सुद्धां इथ गांठ पडली."

" सरदारसाहेब, आपल्याला दोघांना, आज राजे रणमल्ल यांनीं चंद्रमहालांत दोन प्रहरीं बोलावलं आहे." मेरामण म्हणाला.

" अस्सं. असा राजेसाहेबांचा हुकूम आहे हं ? " उपरोधिक स्वरानें करणसिंग म्हणाले.

" हं, आपला कोणता सरदार खालीं उतरवून त्यांचा मारवाडी वर येणार आहे ? " निःश्वास सोडून रामसिंग म्हणाला.

" कळेलच तिथं गेल्यावर " मेरामण म्हणाला.

" मी तर साफ येणार नाहीं. रामसिंगजी, मी आजपासून बंड पुकारलं आहे. रणमल्लाची कोणतीच आज्ञा मानायची नाहीं असं ठरविलं आहे. हे आम्हाला हुकूम करणारे कोण ? "

" ते आज सत्ताधीश आहेत, सरदारसाहेब ! " मेरामण म्हणाला.

" खरंच. सर्वांनींच असं बंड पुकारलं तर या बाहेरच्या उपटसुंभाची किती डाळ शिजणार आहे ? पण तसं होऊं शकत नाहीं ना ? आपल्यापैकीं कित्येक मतलबी सरदार–सामंत रणमल्लाच्या लालुचीला भुलून आपलाच घात करीत आहेत त्याला काय करणार ? सरदारसाहेब, कांहीं तरी केलं पाहिजे खरं, पण घाईनं अन् उतावेळपणानं करून उपयोग नाहीं." रामसिंग गंभीरपणानें म्हणाले.

" रामसिंगजी, आग पायाशीं भिडली. किती वाट पाहायची अद्याप ? हा मारवाडी आपल्या महाराणाजींच्या पवित्र सिंहासनावर सुद्धां बसूं लागला ! परक्याचा पाय चितोडच्या सिंहासनावर लागलेला पाहून कोणत्या चितोड्याचं रक्त खवळणार नाहीं ! " म्हातारा दांतओठ चावून म्हणाला.

" रामसिंगजी, कसंहि करून शक्य तितक्या लवकर या परक्यांच्या गुलामगिरींतून चितोडला सोडवा. माझे सिंहबापू आज जर चितोडांत असते

तर शिसोदिया कुळाच्या सिंहांच्या सिंहासनाला पाय लावायाला या राठोड जंबूकाची काय मगदूर होती ? " कुमारचें स्मरण होतांच मेरामणच्या नेत्रांत पाणी आलें. त्यानें आपल्या पछेडीनें ( उपरणें ) डोळे पुसून काढले. चंद्रसिंहाचें नांव घेतांच रामसिंग म्हणाले. " मेरामण, कुमार कुठं आहेत हें तुम्हांला माहीत आहे कां ? त्यांना इकडील हकीकत कळवूं म्हणजे चितोडच्या रक्षणाला ते खात्रीनें येतील. "

" नाहीं. नाहीं. रामसिंग, कुमार दृढनिश्चयी आहेत. " करणसिंग मान हलवीत म्हणाले. " आपण होऊन ते कधींच येणार नाहींत."

" आपण त्यांना बोलावूं. चितोडसाठीं तरी येतील. "

" नाहीं. राणीसाहेबांनीं स्वतः बोलावल्याशिवाय ते येणार नाहींत, अशी माझी खात्री आहे." करणसिंग म्हणाले.

" इथली परिस्थिति त्यांच्या कानावर तर घालून ठेवावी. " रामसिंग आशेनें म्हणाले.

" पण ते कुठं गेले आहेत हें कोणाला ठाऊक ? " मेरामण म्हणाला. " माझे बापू कुठं असतील ते भगवान् एकलिंगजीलाच माहीत. " त्याचा कंठ भरून आला.

" आपण त्यांच्या तपासाला माणसं तर पाठवून पाहूं. " रामसिंग म्हणाले.

" हं ! पाठवा !" करणसिंग श्वास सोडून म्हणाला.

" माझ्या बापूला केव्हां डोळे भरून पाहून मी माझे डोळे अखेरचे मिटीन असं झालं आहे मला. " मेरामणच्या या वाक्यांत त्याचें अंतःकरण सांठलेलें होतें. नंतर दोन प्रहरीं रणमल्लाकडे जाऊन काय काय होतें तें पाहूं व पुढें कसें वागावयाचें तेंहि ठरवूं. असें रामसिंगानें करणसिंगाला सांगून रणमल्लाकडे येण्याचें त्यांचेजवळून कबूल करविलें.

## प्रकरण १५ वें

# राजदुर्गांत

राजदुर्गांत कुमार चंद्रसिंह येऊन राहिल्याला आतां तीन महिने झाले होते. इतक्या अवधींत कुमाराविषयीं हरपालदेवाचा ग्रह चांगला

झाला होता. तो कोणी उच्चकुलोत्पन्न क्षत्रिय वीर असावा अशीहि त्याला शंका आली होती. सध्यां कोठल्याहि लढाईंत कुमाराच्या अंगच्या शौर्यधैर्याची परीक्षा करतां आली नव्हती, तरी त्याच्या वीरत्वाची हरपालदेवाला शिकारींत अनेक प्रसंगीं खात्री झाली होती. कुमारासारखाच हरपालदेवाला शिकारीचा अत्यंत नाद होता. हरपालदेव प्रत्येक खेपेस कुमाराला अवश्य बरोबर घेऊन जात असे. भयंकर अशा दऱ्याखोऱ्यांतून वाघ, चित्ते शोधून काढणें, बलाढ्य अस्वलाला सहज चीत करणें, रेड्यासारख्या वनवराहाला भाल्याच्या एकाच फेंकींत जमीनदोस्त करणें, यांत कुमार पटाईत होता. कुमाराच्या पराक्रमावर हरपालदेव खुष होता. त्याच्यासारखें अचुक शरसंधान राजदुर्गांत कोणाचेंच नव्हतें व त्याच्या बाहूंत रेड्याचें बळ होतें. तो निधड्या छातीचा असल्यामुळें गेंड्याच्या पाठीच्या ढालीची त्याला कधींच जरूर लागत नसे. कुमार आपलें सावज आपणच हुडकून काढी. एके प्रसंगीं तो एका भयंकर गुहेंत शिरला व आंतल्या निद्रिस्त वाघाला भाल्याच्या टोकानें जागा करून त्याला त्यानें गुहेबाहेर काढला नंतर त्याला आपल्या तलवारीचें पाणी दाखविलें. घायाळ होऊन मरतां मरतां त्यानें मोठ्यानें गर्जना केली, तोंच तेथें जवळच कोठें तरी विश्रांति घेत असलेली वाघीण आपल्या जोडीदारानें सूड घ्यावयाला आपल्याला बोलावलें, असें समजून क्रुद्ध होऊन विलक्षण त्वेषानें कुमारावर चाल करून गेली. पुढ्यांत तिचा जोडीदार आपला विशाल जबडा पसरून क्षणांत कुमाराचा घास करावयाची संधि पहात होता, तर मागें आपलीं तीक्ष्ण नखें वाघिणीनें कुमाराच्या स्कंधावर रोविलीं होतीं. प्रसंग भयंकर होता, पण कुमाराला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. क्षणार्धांत तरवारीच्या एका फटकाऱ्यानें पुढ्यांतल्या वाघाचें जाभाड बंद करून, डाव्या हातानें आपली सर्व शक्ति खर्चून त्यानें त्या वाघिणीला मागच्या मागें लोटून दिली व चटकन् कमरेचा जंबिया काढून तिच्या नाजूक पोटखळींत खुपसून स्वर्गांत तिची वाट पहात असलेल्या तिच्या जोडीदाराकडे सतीचें वाण देऊन तिची रवानगी केली!

हा प्रसंग अगदीं अल्पावकाशांत घडला. वाघाची व नंतर वाघिणीची अशा आरोळ्या ऐकून हरपालदेव वगैरे मंडळी त्या दिशेला त्वरेनें आली. त्या वेळेस कुमार आपल्या उजव्या स्कंधाला झालेल्या व्रणांतून निथळणारें रक्त पुसून टाकीत होता. "विजयसिंह, असं एकाकी गुहेंत शिरणं बरोबर नाहीं. मृत्यूशीं गांठ ही?" हरपालदेव म्हणाला. "अं! राजेसाहेब, निवांत स्थळींहि मृत्यु

आपल्याला हुडकीत येतो, मग अशा प्रत्यक्ष मृत्यूच्या तोंडांत शिरल्यावर भिण्यांत काय पुरुषार्थ ?" हंसून कुमार म्हणाला. परंतु त्या दिवसापासून कुमारावर हरपालदेवाचें विलक्षण प्रेम जडलें !

राजमहालाजवळच कुमाराला एक वाडा हरपालदेवानें रहावयास दिला होता. आज कुमाराच्या मनाची विलक्षण धडपड चालली होती. त्याला कोठेंच चैन पडत नाहीं असें दिसत होतें. बराच वेळ कुमाराची चळवळ पाहून संग्रामसिंह म्हणाला. " कुमार, आज आपलं चित्त स्थिर नाहीं. काय होतंय आपल्याला ?"

" काय होतंय,संग्राम,काय सांगूं ?" कुमार जड स्वरानें म्हणाला."म्हणशील तर कांहीं होत नाहीं अन् म्हणशील तर कांहीं तरी होत आहे. काय होतंय तें माझं मलाच कळत नाहीं. सर्व सुखाचीं साधनं आहेत, पण सुख कशांतच वाटत नाहीं. आपण परतंत्र आहोंत, दास्यांत आहोंत असं क्षणोक्षणी मनाला वाटतंय. हरपालदेव माझ्यावर ममता करतात पण माझा जीव तितका ओढत नाहीं. हा मुलुख मला सवतीच्या मुलासारखा वाटतो ! " दीर्घ श्वास सोडून तो म्हणाला.

" कुमार, मग चला आपण आपल्या चितोडांत जाऊं. " संग्राम एकदम म्हणाला.

" नाहीं. " खिन्नपणें स्मित करून कुमार म्हणाला. " संग्राम, चितोड माझं आहे, पण मी चितोडचा नाहीं, हें तूं विसरतोस. या तीन महिन्यांत चितोडचा समाचार कळला नाहीं म्हणून मला एकसारखी तळमळ लागून राहिली आहे, परंतु माझ्यासाठीं तळमळणारं चितोडांत कोण आहे ? मुकुलजी-साठीं जीव ओढतो.कां ओढतो कळत नाहीं. त्याच्या मायेचीं माणसें त्याच्या जवळ आहेत. तो मला विसरला असेलहि ! " असें म्हणून कुमारानें अत्यंत खोल श्वास सोडला.

" कुमार, चितोडला जाऊन आपण एकदां मित्रमंडळींना भेटून आलों म्हणून काय झालं ? आपल्याला वाटतं, पण आपल्यावर प्राणापेक्षां जास्त प्रेम करणारे किती तरी जीव चितोडांत आहेत. बिचारा मेरामण, आपल्या आठ-वणीनं त्याच्या डोळ्यातलं पाणी खळत नसेल. "

" गरीब बिचारा, त्यानं माझ्यावर इतकं प्रेम कां करावं ? " कुमार खिन्नपणें म्हणाला.

" कुमार, प्रेम करावें अन् करूं नये असं कोणाला सांगावं कां लागतं ? "

" खरंच संग्राम, म्हणूनच तूं आपल्या सर्व कुटुंबाचा त्याग करून माझ्याबरोबर आलास नाहीं कां ? " त्याच्या खांद्यावर प्रेमळपणानें हात ठेवून पुढें तो म्हणाला, " संग्राम, तूं एकदां चितोडला जातोस कां ? जा, अन् तुझ्या घरच्या मंडळींना भेटून ये. "

" कुमार, मी माझ्यासाठीं म्हणत नाहीं. आपल्याला इथं सोडून मी कधीं जाणार नाहीं. " संग्राम निश्चयानें म्हणाला.

" तसं नव्हे, तूं एकदां जाऊन चितोडचा समाचार घेऊन ये. "

" आपण आलांत तरच मी जाईन. नाहीं तर नाहीं. "

" मी येणं शक्यच नाहीं " दृढ स्वरानें कुमार म्हणाला, " संग्राम, माझा स्वभाव तुला माहीत आहे. मग कशाला आग्रह करतोस ? मी हद्दपार होऊन आलेला आहे, यापुढं चितोडांत पाय कसा देईन ! राजा हरपाल देवाचे माझ्यावर केवढे थोरले उपकार झाले आहेत. त्यांच्या कृपेनें आज मला कांहीं उणं नाहीं; यापेक्षां रानावनांत भटकून भिल्लकोळ्यासारखा शिकारीवर उदरनिर्वाह करण्याचा प्रसंग आला तरी मला वाईट वाटणार नाहीं. पण मी पुनः चितोडांत पाय घालणार नाहीं. माझ्या मनाला इतकंच शल्य टोचतं कीं, मी एक शिसोदिया कुलाचा असून मला दुसऱ्याची ताबेदारी करण्याचा प्रसंग यावा काय ? बाप्पारावळच्या वंशजांनीं स्वपराक्रमानें कीर्ति मिळवायची सोडून दुसऱ्याच्या आश्रयावर दिवस कंठावे काय ? या चैनीचा उपभोग घ्यावा काय ? माझ्या अंगांत जोर आहे, बाहूंत पराक्रम आहे, मेंदूंत विचार करण्याची शक्ति आहे, असं असतां इथं ऐदीपणानं राहून मी परक्याची सेवा करावी ! त्यापेक्षां भिल्लकोळ्यांत त्यांचा सहचर बनून राहणं सहस्रपट बरं नव्हे कां ? " चंद्रसिंहाच्या हृदयाच्या खोल भागांतून वरील शब्द बाहेर पडत होते. उत्तरोत्तर त्याचा चेहरा गंभीर बनत चालला.

" कुमार, असले विचार करून कां बरं संताप करून घ्यावा ? "

" मग काय करूं, पिंजऱ्यांत कोंडलेला वाघ आपल्याशीच दांतओंठ खाण्यापलीकडे काय करणार ? इथं नुसतं बसून राहण्याचा मला कंटाळा आला आहे. आपला कांहीं तरी उपयोग हरपालदेवास झाला तरी ठीक, पण असं

नुसतं त्यांच्या जीवावर बसून राहण्याचं माझ्या जीवावर येतं. कुठं तरी लढाई-वर जावं असं फार वाटतं. माझं तूं ऐक, तूं एकदा चितोडला जाऊन सर्वांना भेटून ये, नंतर आपण दुसऱ्या कुठं तरी जाऊं चल. माझ्यानं फार दिवस इथं राहवणार नाहीं."

अखेरीस एकदां संग्रामसिंहानें चितोडांत आऊन सर्वांना भेटून यावें व नंतर कुमारानें हरपालदेवाचा आश्रय सोडून दुसऱ्या कोठें तरी आपला पराक्रम करून दाखवावयास जावें असें ठरलें. इतक्यांत राजमहालांतून एक सेवक आल्याची वर्दी घेऊन मानसिंग आला. त्याला कुमारानें आंत बोलावलें. सेवक म्हणाला.

"उद्यां अहेरियाला राजेसाहेब जाणार आहेत, त्यांनीं आपल्याला दोघांना बरोबर वनांत यायला सांगितलं आहे व रात्रीं भोजनासहि खास मंडळींत आपल्याला आमंत्रण दिलं आहे." कुमारानें दोन्ही आमंत्रणांचा स्वीकार केला व नोकर निघून गेला.

"संग्राम, हा अहेरिया उरकला म्हणजे तूं चितोडला जा."

"बरं आहे. कुमार, हरपालदेवाला एक अत्यंत रूपवती कन्या आहे. तिच्या संबंधींची गोष्ट आपणाला कळली आहे कां ?"

"संग्राम, अविवाहित कुमारिकांची माहिती मिळविणें माझ्यासारख्या रजपुताला शोभतं कां ? आपला संबंध नाहीं अशा चौकशा करूं नयेत. हरपालदेवाला एक मुलगी आहे इतकं मला माहीत आहे."

"मी एक गोष्ट ऐकली म्हणून म्हणतों."

"कसली ?"

"राजकन्या राजकुंवर फारच स्वरूपवान आहे असं मी ऐकलंय. पण तिच्या विवाहासंबंधीं कांहींतरी भानगड उपस्थित झालेली आहे असं माझ्या कानावर आलं आहे."

"मला या भानगडी कांहीं ठाऊक नाहींत."

"राजकुंवरचे लहानपणींच वीरपुरच्या ठाकुराचा मुलगा जोरावसिंग याच्याशीं सगपण झालें आहे. परंतु अधिकारतृष्णेनं अन् मोठें होण्याच्या हावेनं त्यानं मुसलमानी धर्म स्वीकारला आहे व तो माळव्याच्या सुलतानाचा उमराव झाला आहे. अशा बाटग्याला आपली मुलगी कशी द्यावी हा हरपालदेवाला पेंच पडला आहे. बरं देऊं नये म्हटलं तर सुलतानाच्या साह्यानं तो राजकन्येचें जबरदस्तीनं हरण केल्याशिवाय रहाणार नाहीं."

" तुला ही गोष्ट कशी कळली ? "

" माझ्या एका मित्रानें मला ही गोष्ट सांगितली. त्याची बहीण चंद्रा राजकुंवरची जीवाभावाची मैत्रीण आहे. "

" एकंदरीत राजवाड्यांतल्या गुप्त गोष्टींना असे पाय फुटतात खरे ! " कुमार विचारांत मग्न झाला. " काय रे, संग्राम, या गोष्टीला राजकन्या कबूल आहे कां ? सगपण झालेला मनुष्य मुसलमान झाला तरी त्याच्याशींच विवाह व्हावा अशी तिची इच्छा आहे कां ? "

" नाहीं. जीव देईन पण जोरावरशीं लग्न करणार नाहीं असा तिचा निश्चय आहे. "

" शाबास ! याला म्हणावें रजपुत रक्त ! " मान डोलवून कुमार म्हणाला. " हरपालदेवाचा काय निश्चय होतो तें लवकरच कळेल म्हणा. कारण ही गोष्ट कांहीं गुप्त राहणार नाहीं. परंतु सुलतानाच्या जोरावर जोरावरसिंग राजकुंवरला मागणी घालून वेळीं जबरदस्तीनेंहि नेऊं पाहील. हरपालदेवालाहि सुलतानापुढें मान लववावी लागेल, पण हरपालदेवाची इच्छा नसल्यास आपण राजकन्येला एका मुसलमानाच्या घरांत जाऊं देणार नाहीं. संग्राम, प्रसंग पडला तर मी माझ्या देहदंडाचें मोल देऊन एका रजपुत रमणीची अब्रू रक्षण करीन. " निश्चयानें कुमार म्हणाला व त्यानें आपला ओठ जोरानें चावला. अभय तटाला सुरुंगाचें तोंड लागलें असें संग्रामसिंहास वाटूं लागलें.

## प्रकरण १६ वें

# मृगया

अहेरियाच्या दिवशीं राजा हरपालदेवाबरोबर शेंदीडशें लोक निघाले. अहेरिया म्हणजे रजपुत लोकांनां आनंदाचा दिवस वाटे. वनवराहाला मारून कोण विजय मिळविणार याबद्दल तरुण रजपुत वीरांत अहमहमिका लागून राही व वृद्धसुद्धां त्यांत उत्साहानें भाग घेत. हरपालदेवाच्या अश्वाजवळच चंद्रसिंह आपल्या पुष्करावर आरूढ होऊन सज्ज झालेला दिसत होता. परंतु कसल्यातरी गहन विचारांत त्याचें मन व्यग्र झालेलें दिसत होतें. कारण

आसपास चाललेल्या कोलाहलाकडे त्याचें तितकें लक्ष नव्हतें असें दिसत होतें. हरपालदेवाची आज्ञा होतांच सर्वजण वनविहाराला निघाले.

वनांत पोंचतांच सर्वांनीं मिळून कल्लोळ माजवून वनचर प्राण्यांना आपल्या निवासस्थानांतून बाहेर काढलें. दुपारपर्यंत मृगयेच्या मागें धांवून सर्वच अगदीं दमून गेले होते. पण आज वराह कोणाच्याच हातीं लागला नाहीं. एक-दोन दिसले पण केव्हांच गडद झाडींत अदृश्य झाले. आजचा अहेरिया निर्फळ होणार असेंच सर्वांस वाटूं लागलें. दुसरे हिंस्र प्राणी मारले तरी पण आज वराह मारणेंच अवश्य होतें. अहेरियाच्या दिवशीं वराहवध झाला नाहीं तर सर्व वर्ष अशुभदायक होतें अशी रजपुत लोकांची समजूत असे.

सूर्य अस्तास गेला होता. वराह न सांपडल्यामुळें सर्वांची बहुतेक निराशाच झाली होती. आतां परतावें अशा विचारांत हरपालदेव होता, इतक्यांत पलीकडच्या दाट झाडींत एक भला मोठा वराह आहे असें एका सेवकानें हरपालदेवास सांगितलें व त्या दिशेनें त्वरेनें हरपालदेव गेले. वराहाला पहातांच त्यांना आनंद झाला. मोठ्या ईर्षेनें ते त्याच्या अंगावर चाल करून गेले. आपणावर आलेल्या प्राणसंकटाची त्या वराहस्वरूपास कल्पना येतांच त्यानें नारसिंहस्वरूप धारण केलें. आपल्या तीक्ष्ण डोळ्याची खुनशी नजर हरपालदेवावर रोखून तो वेगानें मुसंडी मारण्यास धांवला. हरपालदेवानें आपला भाला अचुक त्याच्या कुशींत खुपसला. भाल्याचें फाळ वराहाच्या कुशींत रुतून भाला कटकन् मोडला. झालेल्या जखमेची पर्वा न करतां वराह मोठ्या त्वेषानें हरपालदेवाच्या अंगावर धावून आला. हरपालदेवानें चटकन् आपली तलवार काढून जोरानें त्याच्या मानेवर प्रहार केला. त्याच्या रांठ कातडीला चाटून जखम होऊन तलवार त्यांच्या हातांतून मुठीसह निसटून चार हात दूर पडली! आतां प्रसंग कठीण होता. हरपालदेव निःशस्त्र असून वराह भयंकर चवताळला होता! झालेल्या दोन जखमांमुळें त्याचा क्रोध द्विगुणित वाढला होता. त्याची मुसंडी चुकवावी म्हणून हरपालदेव दोन पावलें मागें झाले तोंच एका दगडाची ठेंच लागून ते खालीं पडले. आतां आपली शंभर वर्षें भरलीं म्हणून त्यांनीं घट्ट डोळे मिटून घेतले. त्यांच्या शरीराच्या चिंधड्या उडवावयाच्या या हेतूनें वराह जोरानें धांवून आला. परंतु तितक्यांत चंद्रसिंहाचा भाला विलक्षण वेगानें त्याच्या मानेंत रुतून बसला. चंद्रसिंहानें आपली सर्वशक्ति

एकवटून त्या भजस्र प्राण्याला दोन हात मागें रेटीत नेला. तो रागानें चीत्कार करूं लागला. वराह अत्यंत शक्तिमान होता; त्याला आपल्या जखमांचें कांहीं वाटत नव्हतें असें दिसत होतें.

मृत्युरूपी वराह आपल्यावर अजून कसा आला नाहीं म्हणून हरपालदेवानें आश्चर्यानेंच डोळे उघडून पाहिलें, तों चंद्रसिंह व वराहाची प्राणांतिक चाललेली झुंज त्यांच्या दृष्टीस पडली. ते चटकन् उठून उभे राहिले. चंद्रसिंहाचाही भाला त्या दांडगेश्वराच्या मानेंत मोडला. चंद्रसिंहानें नंतर आपली तरवार चटकन् काढली व त्यानें आपली सर्व शक्ति खर्च करून जोरानें प्रहार केला. दोनतीन जखमांनीं तो अर्धमृत झालेलाच होता, परंतु आतां त्याची सर्व शक्ति नष्ट होऊन तो जमिनिवर पडला. चंद्रसिंहाला जय मिळाला होता. या झटापटींत चंद्रसिंह बराच दमला होता. हरपालदेवाला दुखापत झाली कीं काय हें पहावयास तो मागें वळला, परंतु हरपालदेव स्वतःच एकदम त्याच्या पुढें होऊन त्यांनीं प्रेमभरानें त्याचा हात धरून दाबला.

" विजयसिंह, आज तुमच्यामुळं माझ्यावरचं प्राणसंकट टळलं. " तो गद्गदवाणीनें म्हणाला.

" महाराज, त्यांत मी मोठेसं कांहींच केलं नाहीं. " कपाळावरचा घाम पुशीत चंद्रसिंह विनयानें म्हणाला.

" वा! नाहीं कसं? तुम्हाला एक क्षण अधिक लागला असता तर तितक्या अवधींत या प्राण्यानं मला यमसदन दाखविलं असतं. मी पुष्कळ वराह पाहिले व कित्येक शक्तिमान् वराहांना ठार केलें, पण याची शक्ति असाधारण होती यांत शंका नाहीं. विजयसिंह, तुम्ही खरोखरीच आज जीवदान दिलें व माझ्यावर तुमचे हे उपकार झाले आहेत. " कुमाराचा हात प्रेमभावानें आपल्या हातीं घेऊन हरपालदेव म्हणाले.

" नाहीं, नाहीं, आपण मला असं लाजवूं नये. त्यांत उपकार कसले? उलट माझ्यावरच आपले अगणित उपकार झालेले आहेत. त्यांतून मला उतराई होतां येणं शक्य नाहीं. आज माझी सेवा आपल्या कामास आली हें माझं भाग्य असं मी समजतों. आपण उपकार म्हणूं नये. "

" बरं, बरं! तुम्ही म्हणतां तर मीच आज वराह मारून विजय मिळविला असं म्हटलं पाहिजे. " हरपालदेव हसून म्हणाले.

"खरं पाहिलं तर तसं खरंहि आहे. आपण पूर्वींच दोन जखमा केल्या होत्या म्हणून हा वराह मला मारता आला" कुमार निरभिमानपणानें म्हणाला. इतक्या वेळांत इतर सरदार वगैरे तेथें येऊन पोंहचले. हरपालदेवानें चंद्रसिंहाच्या शौर्याची व शक्तीची पुनः सर्वांसमक्ष स्तुति केली.

" एकंदरींत आजचा अहेरिया फुकट गेला नाहीं. याचं श्रेय विजयसिंहालाच दिलं पाहिजे. चला, आतां दुर्गाकडे जाऊं. " सर्वजण परतले. चंद्रसिंहाच्या शौर्याबद्दल पुष्कळांना अभिमान वाटून कौतुक वाटलें व कांहीं तरुण रजपुतांना वैषम्यहि वाटलें कीं, या परक्या पाहुण्यानें जय मिळविला. आपल्या कुमाराच्या विजयानें संग्रामसिंहाला मनापासून हर्ष झाला. रस्त्यानें हरपालदेव चंद्रसिंहाशीं मोकळ्या मनानें भाषण करीत होते.

राजवाड्याच्या भव्य दरवाज्यासमोर हरपालदेव व इतर सर्व सरदार अद्याप अश्वारूढच होते. कांहीं बालकुमारिका दरवाज्यांत उभ्या राहून गीत गात गात या वीरांवर फुलें उधळीत होत्या. दरवाज्यावरच्या माडीवरील गवाक्षाला एक जाळीचा पडदा लावला होता. चंद्रसिंहानें सहज गवाक्षाकडे पाहिलें. कोणाच्या तरी गौर कोमल करानें पडदा किंचित् बाजूला झाला. दोन तेजस्वी नेत्रांचें दर्शन होऊन पडदा चटकन् जसा होता तसा सरकला. क्षणमात्रांत दोन स्निग्ध तारकांचें दर्शन होऊन पडदारूपी ढग आड आले असें चंद्रसिंहास वाटलें. पुनः त्यानें वर पाहिलें, परंतु तारका दिसल्या नाहींत.

" विजयसिंहच आज विजयी झालेले आहेत, तेव्हां पहिली त्यांच्याच गळ्यांत आज विजयमाळा पडली पाहिजे. " हे हरपालदेवाचे शब्द ऐकतांच कुमार भानावर आला. पाहतो तर अश्वापुढें एक सात आठ वर्षांची बालिका हातांत पुष्पमाला घेऊन हास्यमुखानें उभी होती. कुमारानें मान खालीं वांकविली, परंतु तिचे हात पोंचणें शक्य नव्हतें. एका वृद्ध सैनिकानें तिला उंच केली, कुमारानें मधुर स्मित करून तिच्या हातांतली माला आपल्या कंठांत घालून घेतली. तिनें हंसत हंसत कुमाराच्या भाळीं कुंकवाचा टिळा लावला. पुष्पमालेच्या ऐवजीं आपल्या बोटांतील एक बहुमोल आंगठी काढून कुमारानें त्या बालिकेस दिली. ती आनंदानें हंसत आपल्या इतर सख्यांकडे धांवत गेली. हरपालदेवाकडे वळून कुमार म्हणाला, " महाराज, आजच्या गौरवाला मी खरोखरीच योग्य नाहीं. हा मान आपला असून आपण मला विनाकारण मोठेपणा देतां."

" विजयसिंह, एका पुष्पमालेच्या बद्दल तुम्ही बहुमोल आंगठी गमावून बसलांत याचं तर तुम्हाला वाईट वाटत नाहीं ना ? " त्यावर सर्वच हंसूं लागले. कुमाराला नंतर कांहींच बोलतां येईना. रात्रीं सर्वांनीं राजवाड्यांत भोजनाला यावें म्हणून पुनः एकदां सांगून हरपालदेव वाड्यांत गेले व इतर आपआपल्या निवासस्थानाकडे गेले.

हरपालदेवाचा मृत्यु विजयसिंहामुळें टळला ही गोष्ट सर्व राजवाड्याभर पसरली. राणीला व राजकुंवरला स्वतः हरपालदेवानेंच ती गोष्ट सांगून म्हटलें, " खरोखरी, विजयसिंहाचें शौर्य, धैर्य वाखाणण्यासारखें आहे. इतकं असून त्याला स्वतःला त्याचा मुळींच गर्व वाटत नाहीं. "

" खरंच, त्या विजयसिंहांना एकदां पाहिलं पाहिजे. " राणी म्हणाली. राजकुंवर कांहींच बोलली नाहीं. परंतु चंद्रसिंहाला गवाक्षांच्या जाळीआडून ओझरता पाहिल्यापासून तिच्या मनाची विलक्षण चलबिचल झाली होती.

रात्रीं राजवाड्यांत भोजनसमारंभाचा थाट होता. राजा हरपालदेवाजवळच चंद्रसिंह बसला होता. भोजनास सुरुवात होण्यापूर्वीं हरपालदेवानें आपल्या पानांतले कांहीं पदार्थ स्वतः उचलून चंद्रसिंहाच्या पानांवर घातले. इतर सरदारांनीं चंद्रसिंहाचें अभिनंदन केलें.

" महाराज, आजच्या* दुनाचा मान विजयसिंहाचाच आहे. " वीरसिंहजी म्हणाले.

" अन् म्हणूनच आज प्रथम दुना विजयसिंहाला देत आहे. आजपासून विजयसिंह आमच्या मानकऱ्यांत आले. "

" महाराज, मला आपण इतका मान देतां पण त्या मानाला मी खरोखरीच लायक नाहीं. " दुना मिळाल्यामुळें त्याला हर्ष न होतां विषादच वाटत होता. चितोडच्या राण्याच्या हातून आपल्याला दुना मिळावा, यासाठीं सरदारलोकांत चढाओढ लागत असे, त्यालाच आज दुसऱ्याचा दुना स्वीकारतांना किती विषाद वाटत असेल याची कल्पनाच करावी.

---

* रजपुत लोकांत अशी एक चाल आहे कीं एखाद्या उत्सव प्रसंगीं किंवा तशाच कांहीं प्रसंगीं राजानें आपल्या पानांतले पदार्थ उचलून ज्याच्या पानांत टाकले त्याचा अत्यंत गौरव झाला असें ते मानितात. त्या विधीला दुना म्हणतात.

" नाहवा, विजयसिंह, महाराजांनीं तुमचा आज जो गौरव केला त्याबद्दल तुम्हाला अभिमान वाटायला पाहिजे." दौलतसिंग म्हणाला. मनांतून त्याला चंद्रसिंहाविषयीं वैषम्य वाटत होतें.

" होय, मला अभिमान वाटतो, पण ज्याचा खरा मान असेल त्याला दूर करून मी मध्येंच आगंतुक शिरलों नाहींना असं मला वाटायला लागलं आहे. महाराजांनीं माझा गौरव केला तो अपात्रीं तर नाहीं ? अशी मला शंका येते." संग्रामसिंहानें चंद्रसिंहाच्या मुखाकडे पाहिलें. त्याच्या मुखावर उद्वेग दिसत होता.

" छे छे ! विजयसिंह, तुम्ही आज माझा जीव वांचविला आहे, तेव्हां तुमचा गौरव या प्रसंगीं करायचा नाहीं तर केव्हां करावा ?" हरपालदेव म्हणाला.

" आपलं आयुष्य बळकट होतं, त्यांत मी अधिक तें काय केलं." चंद्रसिंह म्हणाला.

" नाहीं कसं ? तुम्ही नाहीं म्हणालांत तरी मी ही गोष्ट कसा विसरेन?" हरपालदेव म्हणाला व नंतर या विषयावर संभाषण सुरूं झालें. त्या दिवसापासून हरपालदेव आपल्या खासगी अगर दरबारी कार्यांत चंद्रसिंहाची सल्ला घेऊं लागला व हरपालदेवाच्या संगतींत त्याचा बहुतेक वेळ जाऊं लागला. दिवसेंदिवस राजाचा त्याच्यावर विश्वास बसत चालला.

## प्रकरण १७ वें

# संकट

हरपालदेव आपल्या कांहीं खास मंडळीसह एका दालनांत बसले होते. जोरावरकडून पुनः निकराचा निरोप आला होता. पंधरा दिवसांची मुदत कधींच संपून गेली होती व त्यामुळें जोरावर बराच चिडला होता. आतां जर उशीर झाला तर सुलतानचें सैन्य घेऊन येईन व बळानें राजकुंवरला नेईन अशी त्यानें आपल्या पत्रांत धमकी दिली होती. त्यामुळें हरपालदेव मोठ्या पेंचांत पडले होते. बाडग्याला मुलगी देऊं नये असें वाटे तर त्याच्याशीं दोन

हात करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें काय करावें हें त्यांना सुचेना. म्हणूनच आज खास मंडळींना जमवून कांहीं तरी निर्णय करावा असें त्यांना वाटलें. या मंडळींत कुमार चंद्रसिंहहि होता. संग्रामसिंह चितोडास गेला होता.

वीरपुरच्या जमिनदाराचा व हरपालदेवाच्या पित्याचा स्नेह होता. एके प्रसंगीं नौकाविहार करीत असतां अकस्मात् नौका उलटली व त्यावेळीं जोरावरच्या पित्यानें हरपालदेवाच्या पित्यास सुरक्षित पाण्याबाहेर काढलें. आपल्यावर वीरपुरच्या ठाकुराचे अतिशय उपकार झाले, असें जाणून राजा-जगदेवानें 'काय वाटेल तें मागा' म्हणून जोरावरच्या पित्याला विचारलें असतां ' प्रसंग येईल तेव्हां मागून घेईन ' असें तो म्हणाला व जगदेवानें ती गोष्ट कबूल केली. पुढें हरपालदेवास राजकुंवर झाल्यानंतर आपल्या आठ वर्षांच्या जोरावरला आपली नात द्यावी, अशी वीरपुरच्या जमीनदारानें जगदेवास भीड घातली. वचन दिल्यामुळें जगदेवास ती मागणी कबूल करावी लागली. "परंतु राजकुंवर लग्नाला योग्य होईपर्यंत मी जगलों तर ठीक, नाहीं तर माझ्या मरणानंतर मी तुमच्या वचनांत अडकलेला नाहीं." असें स्पष्टच जगदेवानें त्याला सांगून ठेवलें होतें. वीरपुरच्या जमिनदाराला मोठेपणाची फार हाव होती व राजदुर्गाच्या राजाची मुलगी आपल्या मुलाला मिळाली म्हणजे आपला हेतू साध्य होईल असें त्याला वाटत होतें. राजकुंवर सातआठ वर्षांची असतांच जगदेव कालवश झाले व मरतेसमयीं वीरपुरच्या ठाकुराच्या मुलाला राजकुंवर देण्याचें मी वचन दिलें आहे, तेव्हां शक्य तों माझें वचन पूर्ण करावें. तशीच अडचण उत्पन्न झाल्यास जसें योग्य वाटेल तसें करावें " असें जगदेवानें आपल्या मुलांस सांगून ठेवलें होतें. पित्याच्या इच्छेप्रमाणें राजकुंवर जोरावरला द्यावी असें हरपालदेवास वाटत होतें. कारण जोरावर एक साधारण जमिनदाराचा मुलगा होता तरी देखणा व चलाख बुद्धीचा होता. तो चांगलें नांव काढील असें हरपालदेवास वाटत होतें.

हरपालदेव आपल्या पित्याचें वचन पूर्ण करील कीं नाहीं, असें आतां जोरावरच्या पित्याला वाटूं लागलें व म्हणून लवकर लग्न करून घ्यावें असा निरोप त्यानें हरपालास पाठविला. " कन्या लहान आहे इतक्यांत घाई करावयाची नाहीं योग्य वेळीं पाहूं. " असा उलट निरोप हरपालदेवानें पाठविल्यामुळें जोरावरच्या पित्याला फार राग आला. त्यानें पुनः निरोप पाठविला कीं, " आपल्या वडिलांनीं वचन दिलें होतें. त्याप्रमाणें तुम्हांला मुलगी द्यावी

लागेल व हीच मुलगी मी माझ्या मुलाला करून घेणार. " या उद्दामपणाचा हरपालदेवालाहि राग आला. " माझी व तुमची बरोबरी नाहीं, मी राजकुंवर देत नाहीं. माझ्याएवढें सामर्थ्य मिळवा. नंतर माझ्या मुलीला मागणी घालावयाला या. " असा हरपालदेवानें निरोप पाठविला. या शब्दानें जोरावर व त्याच्या पित्याला वाटलें कीं आपला भयंकर अपमान झाला आहे. वाटेल तें करून राजकुंवरशीं जोरावरचें लग्न करून हरपालदेवाचा नक्षा उतरावयाचा असा या पितापुत्रांनीं निश्चय केला.

वीरपुरच्या ठाकुराच्या मुलानें राजकुंवरला मागणी घातलेली आहे व जगदेवानें वचन दिलेलें असून अर्धवट वाङ्निश्चय झालेला आहे तेव्हां आसपासच्या रजपूत कुमाराकडून अर्थात् मागणी घातली जाणार नाहीं हें जाणून हरपालदेव इतके दिवस स्वस्थ होते, राजकन्या उपवर झाल्यावर पाहूं, सध्यांच घाई कशाला, असा विचार त्यांनीं केला. तसेंच जोरावरला मुलगी द्यावयाचीच नाहीं असाहि पक्का निश्चय झाला नव्हता.

राजकुंवर दुसरीकडे जाऊं द्यावयाची नाहीं या ' ईर्षेला पेटून जोरावरनें मुसलमानी धर्म स्वीकारून हरपालदेवाएवढें सामर्थ्य मिळविलें. आतां जर हरपालदेवानें नाहीं म्हटलें तर सुलतानाच्या जोरावर राजकुंवरला आपण सहज आपली करूं अशी त्याला खात्री वाटूं लागली. तो मुसलमान झाल्यामुळें सुलतानानें त्याला आपल्या उमरावांत स्थान दिलें व त्याच्यावर सुलतानाची मर्जीहि चांगली बसली. राजकुंवर आतां सतरा आठरा वर्षांची झाली असल्यामुळें ती लहान आहे असें हरपालदेवास म्हणतां येणार नाहीं. असें जाणून त्यानें तसा निरोप हरपालदेवास पाठविला. " पंधरा दिवसांनीं कळवूं. " असें प्रथम हरपालदेवानें त्याला कळविलें, परंतु ती मुदत होऊन गेली तरी हरपालदेवाकडून कांहींच जबाब न आल्यामुळें त्यानें पुनः दुसरें पत्र पाठविलें होतें.

" वीरसिंह, या उद्दाम जोरावरचं पत्र वाचा. " म्हणून हरपालदेवानें पत्र वीरसिंहापुढें टाकलें. वीरसिंहानें पत्र वाचून पाहिलें व त्यांनीं कपाळाला आंठ्या चढविल्या.

" महाराज, या बाटग्या जोरावरला चक्क नाहीं म्हणून सांगावं झालं असं मला वाटतं." वीरसिंह म्हणाले.

" खरं, पण उद्यां लढाईचा प्रसंग येऊन उभा राहील ना ? "

" महाराज, आमच्या अब्रूसाठीं आम्ही आमचं रक्त अर्पण करावयाला तयार आहोंत. " वीरसिंह आवेशानें म्हणाले.

" वीरसिंहजी, सर्व गोष्टींचा नीट विचार करायला पाहिजे. आपलं बळ काय अन् आपण सुलतानाच्या सैन्यापुढं काय करूं शकणार ? " दोलतसिंग म्हणाला. सुलतानाशीं लढाई करूं नये असें त्याला वाटत होतें.

चंद्रसिंहानें भुंवया वर चढवून दोलतसिंगाकडे पाहिलें. त्याच्या मुखमंडलावर लाली चढली होती. " तुमचा सर्वांचा विचार सांगा. माझ्या मुलीसाठीं सर्व राज्याचा नाश व्हावा असं मला वाटणार नाहीं. जोरावर जर लढाईला उभा राहिला तर त्याच्याशीं टक्कर द्यायला आपल्याला सामर्थ्य नाहीं असं मलाहि वाटतं." हरपालदेव उद्वेगानें म्हणाले.

" कां नाहीं ! " चंद्रसिंह मध्येंच म्हणाला.

"सुलतानाचं त्याला बळ आहे. तो आपलं असंख्य सैन्य घेऊन येईल व राजदुर्गाचा केव्हांच धुव्वा उडवून देईल." दुसरा एक सरदार म्हणाला.

" तो सैन्य आणून लढेल तर आपण काय ओढण्या पांघरून घरांत दडून बसूं ? " चंद्रसिंह कठोरपणानें म्हणाला.

" विजयसिंह, तुम्ही तरुण आहांत म्हणून असं बोलतां. माळव्याच्या सुलतानाचं सामर्थ्य तुम्हाला माहीत नाहीं. अहो, ज्यानं दिल्लीपतीचा अधिकार झुगारून दिला, त्याला आमच्यासारख्या एका लहान राज्याचा नाश करून टाकायला कितीसा उशीर लागणार आहे ? जोरावरचं वजन सुलतानाजवळ फार आहे. त्याच्या मदतीला सुलतान आपलं सर्व सैन्य देईल. परमारकुळ नामशेष करावं ही या सुलतानांची तर इच्छा आहे. " दोलतसिंग म्हणाला.

" दोलतसिंगजी, परमारकुळाच्या अभिमानासाठींच परमारांची कन्या मुसलमानांच्या घरांत जाणं योग्य नाहीं. " चंद्रसिंह चटकन् बोलून गेला. पण दोलतसिंगाला ते शब्द फार झोंबले.

" तुम्ही असा भलताच अर्थ करूं नका. " तो रागानेंच म्हणाला. " एका बाटग्या मुसलमानाला राजकन्या द्यावी असं मी तरी कुठं म्हणतों ? पण सर्व परिस्थितीचा नीट विचार केला पाहिजे. गांठ कोणाशीं आहे हें पाहिलं पाहिजे. एकट्या जोरावराला भिणारा मी तरी नाहीं, हा प्रश्न कांहीं तरी युक्तीनेंच सोडविला पाहिजे."

" अशी एखादी युक्ति तरी काढली पाहिजेना ?" अधीरपणें हरपालदेव म्हणाले.

" त्याचाच विचार केला पाहिजे."

" परंतु कोणत्या उपायानं हें संकट टळेल असं तुम्हाला वाटतं ? " खिन्नपणें हरपालदेव म्हणाला. " विजयसिंह, तुमचं काय म्हणणं आहे?"

" संग्राम करावा हेंच ते म्हणणार. " दोलतसिंग म्हणाला.

" हो. मला तोच मार्ग पसंत पडतो. महाराज, आपण विचारतांच तर मी सांगतों, आपली कन्या आपण एका मुसलमानाला देण्यापेक्षां आपल्या पदरीं आम्ही आहोंत तितके वीर धारातीर्थी मरण पावलों तरी हरकत नाहीं, पण यवनांच्या घरांत रजपुत कन्या जाणं योग्य नाहीं. ज्या यवनांनीं आपल्या या प्रिय भारतभूमीचा सत्यनाश केला, ज्यांनीं आपल्या पवित्र मंदिरांच्या मशिदी बनविल्या, ज्यांनीं आपल्या अत्यंत पवित्र अशा रमणीरत्नांचा भयंकर अपमान केला, ज्यांचा हस्तस्पर्श होऊं नये, म्हणून कित्येक तेजस्विनी पुण्यवती स्त्रियांनीं आपले देह अग्नींत जाळून घेतले, असल्या या चांडाळ यवनांपुढं मान वांकविण्यापेक्षां मृत्यु सहस्रपटीनें बरा. जीवमात्राला मृत्यु आहेच, मग असं अवमानित जीवन जगविण्यापेक्षां वीरमरण चांगलं नव्हे कां ? महाराज, राजकन्या पवित्र अशा राजा भोजमुंजांच्या परमारकुळांत जन्मली आहे, तिला या सैतान मोंगलांच्या जनानखान्यांत आपण जाऊं द्याल कां ? जोरावरच काय पण स्वतः सुलतान जरी समारंगणावर आला तरी त्याच्याशीं दोन हात करायला हा विजयसिंह तयार आहे." चंद्रसिंहाचे बाहू स्फुरण पावूं लागले व त्याच्या चेहऱ्यावर निश्चयाचें तेज चमकूं लागलें. मदोन्मत्त हत्तीचें गंडस्थळ फोडून मुक्ताफळें केव्हां काढूं असें वनराजाला होत असतें. चंद्रसिंहाच्या भाषणानें हरपालदेवाच्या मनावर बराच परिणाम झाला.

" विजयसिंह, एका मुसलमानाला माझी राजकुंवर देऊं नये असं तुमच्याप्रमाणें मला सुद्धां वाटतं, परंतु—"

" परंतु काय ? महाराज, लढाईचा प्रसंग येईल इतकंच ना ? "

" विजयसिंह, लढाईला तुम्ही जितके उताविळ झाला आहांत तितकं आम्हालाहि लढाईवर जावं असं वाटतं. " आपण लढाईविरुद्ध आहोंत असें कोणाला वाटूं नये म्हणून दोलतसिंह म्हणाला. मनांतून त्याला चंद्रसिंहाचा फार राग आला होता. लढाईचा प्रसंग टाळून राजकुंवर जोरावरला द्यावी

असेंच त्याला वाटत होते. पुनः एकदां हरपालदेवानें सर्वांना विचारलें, परंतु चंद्रसिंह व वीरसिंह यांचे शिवाय सर्वांचेंच मत लढाईविरुद्ध होतें. तसेंच जोरावरशीं युद्ध करून जय मिळणार नाहीं अशी हरपालदेवाचीहि खात्री होती. स्वतः हरपालदेवांत तितका जोम नव्हता व त्यांचा स्वभाव भिडस्थ असल्यामुळें आपल्या सरदारास दुखवूं नये असें त्यांना वाटत होतें. हरपाल-देवावर मोठें संकट येऊन पडलें होतें. एकीकडे लाडकी मुलगी मुसलमानाच्या घरांत आपण होऊन घालणें बरोबर नाहीं असें वाटे तर दुसरीकडे, एका राज-कन्येसाठीं आपल्या सर्व राज्याचा नाश करण्याची पाळी येणार असेंहि वाटे.

शेवटीं आणखी पंधरा दिवसांनीं नक्की काय तें कळवितों नाहींतर तुम्हाला वाटेल तें करा, असा निरोप जोरावरला पाठवावयाचा असें ठरलें. तितक्या मुदतींत एखादी युक्ति सुचून हें संकट टळलें तर ठीक नाहीं तर राजकन्या जोरावरला द्यावी असा विचार कायम झाला! हरपालदेवाच्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति झाली होती. कांहीं झालें तरी राजकन्या मुसलमानाच्या घरांत जाऊं द्यावयाची नाहीं असा चंद्रसिंहानें मनांत बेत केला.

## प्रकरण १८ वें

# मैत्रिणी

राजकुंवर आपल्या बैठकीच्या खोलींत एकटीच बसली होती. आपल्यामुळें आपल्या पित्यावर केवढें संकट आलें आहे याची तिला दादहि नसावी असें दिसत होतें. ती आपल्याच विचारांत मग्न झालेली दिसत होती. समोर असलेल्या मोठ्या आरशांत आपलें सुंदर प्रतिबिंब पाहून तिला समाधान वाटत होतें. ती आपला साज क्षणोक्षणीं नीटनेटका करी, पुनः आरशांत पाही, पुनः वस्त्रालंकार सारखे करी. असें तिचें बराच वेळ चाललें. खरोखरीच आपण रूपवान आहोंत असें तिला आतांसें वाटूं लागलें होतें. स्वरूपाचा वृथाभिमान वहाणारी राजकुंवर अल्लड तरुणी नव्हती. वयाच्या मानानें ती फार विचारी होती. परंतु आयुष्यांत केव्हां केव्हां असे प्रसंग घडून येतात कीं, एखादा सुजाण प्रौढहि बालक बनतो! तिच्या अंगांत कसल्या तरी नवजीवनाचा संचार

झाला होता; कसल्या तरी सुखदायक कल्पनांनीं क्षणोक्षणीं तिच्या अंगावर रोमांच उभे रहात होते; असें आपणांस कां वाटतें हें तिचें तिलाहि कळत नव्हतें. ती कसल्या तरी गूढ आनंदाचा अनुभव घेत होती. इतकें मात्र खरें!

ती एका मृदु मंचकावर आपले वस्त्रालंकार विसकटूं नये अशा काळजीनेंच बसली. तिच्या शिवाय तेथें कोणी नसतां तिनें इतकी काळजी कां घ्यावी? ती आपल्या विचारतरंगांत तरंगत होती, तिची सखी आंत केव्हां आली हेंहि तिला कळलें नाहीं. ती तिच्या अगदीं जवळ उभी राहिली, "कुंवरबा, काय चाललं आहे?" ती केवढ्यानें दचकली? चंदा तिच्याकडे पाहून हंसत म्हणाली. "इतक्या दचकलांत! कसला एवढा विचार चालला आहे?"

तिच्या मुखावर लाली चढली व ती ओशाळली "कसला ग विचार?" हंसून तिनें उत्तर दिलें "बसलें होतें आपली सहज."

तिची गोंधळलेली वृत्ति चंदाच्या लक्षांत आली होती. "सहजच दचकलांत वाटतं?"

"खरंच. तूं अशी एकदम आंत आलीस तर नाहीं कां तसं वाटणार?"

"खरं कुणाला वाटेल? बरं हं, कुंवरबा, मला सांगूं नका हं, मी जातेंच कशी." लटक्या रागाचा आविर्भाव आणून तोंड फिरवून चंदा म्हणाली.

"पण काय सांगूं तुला? सांगावयासारखं नाहींच कांहीं." चोरी करतांना आपल्याला कोणी पाहिलें तर नाहीं, असें चोराला वाटत असतें. तसें राजकुंवरला वाटूं लागलें.

"माझ्या जवळ हा लपंडाव मुळींच चालणार नाहीं बरं?" हंसत चंदा म्हणाली. "खरंच सांगा पाहूं अहेरियाच्या दिवसापासून तुमचं मन कांहीं ठिकाणावर नाहीं, कसा चोर पकडला?"

"चल, भलतंच कांहीं तरी." राजकुंवर मानेला हिसका देऊन म्हणाली.

"मी आपलं खरं तें सांगतें हो, भलत्याच अनोळखी तरुणासंबंधी असा विचार करणं चांगलं नाहीं. त्यांतून तुम्ही दुसऱ्याची वाङ्‌निश्चित वधू आहांत," खवचटपणानें चंदा म्हणाली. "बरं. ज्याचं नांवगांव सुद्धां पुरं ठाऊक नाहीं असल्या एका भटक्या तरुणाशीं तुम्हाला काय करायचं आहे?"

"चंदा, चंदा," राजकुंवर खुब रागावली, उष्ण उन्हाच्या वाफेनें अंग पोळत असतां मेघजलाची अपेक्षा करावी तों अग्नीचा लोट अंगावर यावा असें

तिला वाटलें. विजयसिंहाची चंदानें स्तुति करावी, असें तिला वाटत होतें. चंदाची थट्टा तिला मुळींच आवडली नाहीं. " चंदा, तूं जा पाहूं इथून, मला एकटीलाच बसूं दे कशी ? "

" बरं जातें मी आपली, माझ्यामुळें तुम्हांला विचार करतां येत नाहीं, माझी कशाला अडचण पाहिजे, " म्हणून खरोखरांच चंदा उठली. तिनें जावें असें राजकुंवरला मुळींच वाटत नव्हतें " पण संभाळा हं ? परिस वाटतो पण दगडच निघायचा कुठं ? "

" चंदा, प्रसंग काय ? तुझं आपलं कांहींतरीच. तुझ्याशिवाय माझ्या जिवा-भावाचं कोणी नाहीं हें तुला माहीत आहे ना ? " काकुळतीनें राजकुंवर म्हणाली. " बस गडे, मला पुष्कळ तुला सांगायचं आहे. " तिनें हात धरून चंदाला आपल्याजवळ बसविली.

अहेरियाच्या दिवशीं चंद्रसिंहाला पाहिल्यापासून राजकुंवरची चमत्कारिक स्थिति झाली होती. त्याला प्रत्यक्ष असा तिनें त्याच दिवशीं पाहिला होता. ज्या वेळीं पडदा बाजूला करून ती त्याच्याकडे पाहूं लागली, त्याच वेळीं त्याची दृष्टीहि सहजगत्या गवाक्षाकडे गेली व त्यानें आपल्याकडे पाहिलें असें वाटून तिचें शरीर पुलकित झालें ! जमलेल्या सर्व सरदारांत त्याच्यासारखा तेजस्वी कोणीच नाहीं असें तिला वाटलें. पुढें आपल्या पित्याचा प्राण त्यानेंच वांचविला हें तिला तिच्या पित्याकडूनच कळलें. भोजनसमयीं दुना स्वीकारतांना त्याचा विनयशीलपणा पाहून तिला त्याचेविषयीं आदर वाटूं लागला. यांपूर्वी तिनें ज्या भावना अनुभविल्या नव्हत्या अशा भावना तिच्या हृदयांत उठूं लागल्या. तिचे विचार त्या दिवसापासून चंद्रसिंहाबद्दलचेच चालू असत. जोरावरच्या मागणीचें तिला भान राहिलें नव्हतें किंवा तिला स्वतःच्या अस्तित्वाचाच विसर पडला होता. त्याच्याबद्दल चंदाकडून अधिक माहिती मिळावी असें तिला वाटत होतें. " पुष्कळ सांगायचं आहे. " म्हणून तिनें चंदाला बसवून घेतलें, पण तिच्या मुखांतून आतां शब्द निघेना. चंदा मोठी चाणाक्ष होती. राजकुंवरच्या मनाची स्थिति ती समजून गेली होती. तसेंच हरपालदेवासमक्ष " जोरावरला राजकन्या न देतां लढाई करावी " असें चंद्रसिंहानें निक्षून सांगितलेलें तिनें ऐकलें होतें, त्यामुळें त्याच्याविषयीं तिचा ग्रह चांगला झाला. तो खरा वीरपुरुष आहे असें तिला वाटूं लागलें.

" कुंवरबा, तिकडे पिताजीकडे नुकतंच खलबत चाललेलं तुम्हाला माहीत आहे कां ? "

" नाहीं, कसलं खलबत ग ? " नंतर चंदानें ऐकलेली सर्व हकीकत सांगून म्हटलें. " कुंवरबा, खरंच आपले सारेच सरदार अगदीं मेषपात्र आहेत. त्या परक्या विजयसिंहानं दंड थोपटून लढाईला उभं रहावं अन् आपल्याच सरदारांनीं मागं पळायला पहावं. मला तर असा एकएकांचा राग आला आहे कीं नाहीं, नामर्द नाहीं तर." त्वेषानें हाताचीं बोटें मोडून चंदा म्हणाली.

" चंदा, ते वीर माझ्यासाठीं एकटे लढाईला तयार आहेत, मग मला एवढी भीति कसली ? येई ना कां तो जोरावर नाहीं तर आणखी कोणी ? माझा प्राण गेला तरी हरकत नाहीं पण त्या बाटग्याशीं मी लग्न करणार नाहीं. एक तरी वीरपुरुष माझ्यासाठीं आपला अमोल जीव मातीमोल करायला तयार आहे, मग मी कां भ्यावं ? "

" हो. पण कुंवरबा, ते एकटे लढूं म्हणाले तर कसं जमावं ? हा विचार नको कां करायला ? "

" त्यांत विचार कसला ? तशीच वेळ आली तर मी त्यांना कळवीन कीं माझ्यासाठीं आपण रणांगणांत जायला तयार आहांत यांतच मला केवढं भूषण वाटलं, परंतु त्यांच्या एकट्यानं जें कार्य होऊं शकणार नाहीं, तें माझ्या एकटीच्या प्राणदंडानं सुलभ होईल ना ? "

" अहो, अद्याप अवकाश आहे. इतक्यांत एखादी युक्ति निघून हें संकट टळेलहि. त्यापूर्वी असला भलतासलता विचार मनांत आणूं नका. "

" चंदा, अग वेडे, युक्ति तरी कसली निघणार आहे ? आजचं मरण उद्यांवर ढकललं इतकंच. " किंचित् स्मित करून राजकुंवर म्हणाली. " जोरावरची मागणी कबूल करावी असेंच आपले भेकड सरदार म्हणणार व पिताजी त्यांचे पुढें कांहीं बोलूं शकणार नाहींत. " तिच्या मुखावर गंभीरभाव दिसूं लागला, " माझ्या एकटीच्यामुळें सर्वांचा प्राणनाश व्हावा असं मला केव्हांहि वाटणार नाहीं. चंदा, ते वीरवर माझ्या वतीनं बोलले यांतच मला धन्यता वाटली ! मला माझ्या जीवाची तितकी पर्वा वाटत नाहीं. भगवान् महाकालेश्वर मला जो मार्ग सुचवील तो पत्करीन. मला आतां कशाचंच भय वाटत नाहीं. " राजकुंवरच्या मुखावर

उत्साह दिसूं लागला. ज्यानें आपल्या दर्शनानेंच आपलें मन इतकें आकर्षित केलें, त्याचें साह्य आपल्याला मिळेल याचा तिला मनापासून भरंवसा वाटूं लागला. एखाद्या व्यक्तीविषयीं आपलें मत अनुकूल बनावें व अपेक्षेपेक्षांहि ती व्यक्ति सरस ठरावी म्हणजे मनाला कसा उल्हास वाटतो याचा अनुभव तिला होऊं लागला. पुढें येणाऱ्या संकटांचें तिला मुळींच भय वाटेना!

" कुंवरबा, मला वाटतं एकदा बासाहेबांना याबद्दल विचारून पहावं."

" कशाला ? पिताजी विचारतील तेव्हां कळेलच." कांहींशीं बेपर्वाईनेंच ती म्हणाली. " चंदा, त्या विजयसिंहांचा मित्र तो जयसिंह त्याच्या जवळून त्यांची खरी माहिती काढून घ्यायला तुझ्या भावाला सांगून पहा ना ? "

" अहो, तो जयसिंहहि मोठा लबाड आहे. मुळींच दाद लागूं देत नाहीं. आतां तो कुठं तरी गेला, पण कुठं गेला हें कोणालाच माहींत नाहीं. याचीं खरीं स्वरूपं वेगळींच असावींत असं मला वाटूं लागलं आहे."

" कशावरून ? " कांहीं तरी अधिक माहिती मिळावी म्हणून राजकुंवर उत्सुकतेनें म्हणाली.

" माझ्या भावाला अद्याप पुरं माहीत नाहीं, पण जयसिंह विजयसिंहा-जवळ एकटाच असला म्हणजे त्यांना कुमार म्हणत असतो व त्यांच्या पुढं फार आदबीनं वागतो, यावरून ते कोणातरी राजकुलांतले तर नाहीं, अशी मला शंका येते."

" कोणी सांगावं ? बाकी त्यांचं तेज कांहीं विलक्षण आहे खरं! तुला कसं वाटतं ?"

" खरंच ते कोणी तरी श्रेष्ठ राजकुलोत्पन्न असावेत अन् त्यांनीं आपल्या बाहुबलानं या रुक्मिणीचं हरण करावं असं मला वाटतं." चंदा हंसत म्हणाली.

" चल. वहावत चाललीस." तिला एक चापट मारून राजकुंवर म्हणाली. " देवी रुक्मिणी येवढं माझं थोर भाग्य कुठलं ! "

" काय झालं नसायला ? हा जोरावररूपी शिशुपाल मला नेऊं पहातोय म्हणून आपल्या विजयसिंह श्रीकृष्णाला पत्र पाठवा आपण. मी होते सुदेव श्रीकृष्ण तुमचं रक्षण करायला धांवून येईल बघा. "

" चंदा, खरंच कां ग ? " राजकुंवर दीर्घ श्वास सोडून म्हणाली. असें जर होईल तर ? असें तिच्या मनांत येऊन गेलें. अंतःकरणांत कसल्या तरी गूढ भावना उचंबळून आल्या व ती क्षणभर आपल्या विचारांत मग्न झाली.

## प्रकरण १९ वें

# विषयांध

" हं. चल ये अशी. माझ्याजवळ येऊन माझे पाय चेप पाहूं ? " मंचकावर हातपाय पसरून निजलेला रणमल्ल हुकमी आवाजानें मानकुंवरला म्हणाला. बिचारी मानकुंवर सभयपणें त्याच्याकडे पहात निश्चल अशी उभी होती.

" मी काय म्हणतों ऐकूं आलं कां नाहीं ? ती हुक्याची नळी दे माझ्या हातांत-नव्हे ओठांत पाहूं ? " आपल्या गंगाजमनी मिशा कुरवाळीत तिच्याकडे तिरळ्या डोळ्यानें पहात तो म्हणाला.

" महाराज, मी एक दासी असले म्हणून वाटेल तशी माझी थट्टा करणं आपल्या सारख्याला शोभतं कां ! " मानकुंवर जरा रागानेंच म्हणाली.

" शोभतं कां म्हणून तूं विचारणार कोण ? मान, तूं शहाणी आहेस ये जवळ पाहूं. असं वेड्यासारखं करून कसं चालेल ? अग, तूं दासी असलीस तरी मी तुला राणी करीन. मान, मान, तुझ्यासारख्या आमच्या राण्या देखील सुंदर नाहींत. बघ, तुला मारवाडची राणी करीन. पुरे झाला हट्ट. "

" महाराज, बस्स झालं. मी दासी आहे, तीच बरी आहे. तुमच्यासारख्या नरपशूंची राणी होण्यापेक्षां अग्नींत उडी टाकून मेलेलं काय वाईट ? " मानकुंवर संतापानें चिडून म्हणाली.

" असं काय ? बरं आहे. बटकी तर बटकी अन् इतकी मिजास अं ! मोठी सतीच लागून गेली आहे जशी ! तूं अशी वठणीवर नाहींच येणार. म्हणूनच तुला अशा युक्तीनं बोलावून आणलं समजलीस ? तूं इथं आली आहेस हें पद्मकुमारीला मुळींच माहीत नाहीं. पहातों आतां तूं माझ्या हातून कशी सुटतेस ती " म्हणत रणमल्ल जागेवरून उठला. या नराधमाच्या हातून सुटावें म्हणून मानकुंवर दरवाज्याकडे धांवली, पण तो बाहेरून बंद होता. तशीच ती दुसऱ्या दाराकडे धांवली. दार लोटतांच पुढेंच विकट हास्य करीत जयमल्ल उभा असलेला दिसला. वाघ व लांडगा यांच्यांमध्यें हरिणी सांपडली होती, काय करावें हें तिला सुचेना, " कां आतां कुठं जाणार ? " जयमल्लाचे ते शब्द तिच्या कानावर आदळले व त्याच्या पापी हाताचा स्पर्श तिच्या हाताला झाला ! काळसर्पानेंच आपला हात धरला आहे असें तिला वाटलें.



या नराधमाच्या हातून सुटावं म्हणून मानकुंवर दरवाज्याकडे धावली.

[ पान ८२.

" महाराज, तुमचं सावज धरा. आतां कुठं जाणार आहे ? मोठा दिमाख दाखवीत होती नाहीं कां ? "

या दोन नरराक्षसांपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं हें जाणून मानकुंवर थरथर कांपूं लागली व तिनें मोठ्यानें किंकाळी मारली. ती बेशुद्ध होऊन जयमल्लाच्या अंगावर पडली असती परंतु इतक्यांत दुसरें दार धाडकन उघडून मेरामण आंत आला. मेरामणची ती क्रुद्ध मुद्रा पहातांच जयमल्लानें मान-कुंवरचा हात सोडून दिला. ती खालीं पडतां पडतां दरवाज्याला ओठंगून उभी राहिली. भयानें अंग कांपत असल्यामुळें तिला नीट उभेंसुद्धां रहातां येईना. मेरामणच्या लक्षांत सर्व प्रकार यावयाला वेळ लागला नाहीं.

" जा. मानकुंवर, तूं बासाहेबांकडे जा. " जयमल्लकडे पहात तो म्हणाला.

" मेरा काका, मेरा--" मानकुंवर स्फुंदूं लागली. तिच्यानें पुढें शब्दो-च्चारच होईना.

" जा. बेटा, जा. तूं इथून लवकर जा पाहूं. " ममतेनें मेरामण म्हणाला. मानकुंवर तशीच रडत रडत निघाली. रणमल्लहि तिच्या मागें जाऊं लागला. मेरामण त्याला कठोरपणानें म्हणाला. " राजेसाहेब, तिला सरळ राजवाड्याकडे जाऊं द्या मग आपण बाहेर जा. " त्याच्या आवाजांत अधिकार होता. रणमल्ल रागानें जागेवर क्षणभर उभा राहिला.

" चितोडचे नोकर किती उद्दाम असतात हें मला पद्मकुमारीला सांगायला गेलं पाहिजे. " तो संतापून म्हणाला.

मेरामणनें किंचित् स्मित केलें. जयमल्लाला उद्देशून तो म्हणाला, " जय-मल्लजी, चितोडच्या दासी-कुणबिणी वेश्या नसतात हेंहि तुम्हांला कळलं पाहिजे.मानकुंवरसारख्या पोरीसोरीवर असा हात टाकणं तुम्हांला शोभतं कां? "

" मेरा, तोंड संभाळून बोल. कोणाला बोलतोस तूं हें ? " रणमल्ल रागानें बोलला.

" राजेसाहेब, चितोडच्या स्त्रियांचा अपमान करणाराला. " मेरामणहि संतापून म्हणाला. रणमल्लानें त्याचेकडे सक्रोध नजरेनें पाहिलें. " बरं आहे. पाहून घेईन. मारवाडच्या राजाचा अपमान करणाराला काय शासन होतं तें चितोडच्या उद्दाम नोकराला करून येईल " असें म्हणून रणमल्ल तेथून निघून गेला.

" जयमल्लजी. " मेरामण हंसून म्हणाला. " तुमच्या राजेसाहेबांना म्हणावं चितोडचे नोकरसुद्धां वीर आहेत. त्यांनीं चुडे नाहीं भरले. "

" मेरामण, जास्त बोलशील तर परिणाम चांगला होणार नाहीं. ध्यानांत ठेव. " जयमल्ल ओंठ चावून म्हणाला.

"असं. सरदारसाहेब, मारवाडच्या राजापुढं तुमच्या माकडचेष्टा चालतील, पण या मेवाडच्या नोकरापुढं तुमची गडबड चालणार नाहीं. समजलं ? आम्ही चितोडे स्त्रियांचा मान कसा राखावा हें आमच्या तलवारीनंच दाखवित असतों. " कमरेची लटकती तलवार त्याला दाखवून वृद्ध मेरामण करकरां दांत खात म्हणाला. त्याचा तो वीरभद्रावतार पाहून जयमल्ल जागच्या जागीं थंड पडला.

" मेरामण " तो काकुळतीच्या स्वरांत म्हणाला. " माझ्यावर कां उगाच आग पाखडतां ? आमच्या राजेसाहेबांची तिच्यावर फार दिवसापासून नजर गेली आहे. त्यांच्या हुकुमाप्रमाणं आम्ही वागलों, त्यांत आमचा काय दोष ? ते पडले आमचे राजे. मला काय, ती माझ्या मुलीसारखी."

" पुरें, पुरें. तुमचा पाल्हाळ. पुनः जर तुम्ही तिच्या वाटेस गेलात तर माझी ही तलवार एकदां बाहेर निघाली कीं रक्त पिऊन तृप्त झाल्याशिवाय म्यानांत शिरणार नाहीं हें लक्षांत ठेवा. " त्याच्याकडे तुच्छतेनें पाहून मेरामण तेथून निघून गेला. जयमल्ल मनांत त्याच्यावर नुसता संतापला होता. पण त्याच्यापुढें त्याला नम्रता स्वीकारावी लागली. चितोडे कसें बाणेदार आणि करारी असतात हें तो जाणत होता. ही गोष्ट मेरामणनें बाहेर कळविली तर आपल्यावर मोठा कठीण प्रसंग येईल असेंहि त्याला वाटूं लागलें.

राजवाड्यांत मानकुंवरच्या वाटेस जाणें शक्य नाहीं व ती तशी कांहीं केल्या बळत नव्हती. रणमल्ल व जयमल्ल यांनीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, पण त्यांत त्यांना मुळींच यश आलें नाहीं. उलट मानकुंवर आपला भयंकर द्वेष करते असेंच त्यांच्या निदर्शनास येऊं लागलें. रणमल्ल आपल्या मुलीकडून राज्यांत वाटेल तशी ढवळाढवळ करीत होता, परंतु अशा कामांत तिचें साह्य न होतां उलट ती गोष्ट तिला पसंत पडणार नाहीं हें तो जाणत होता. राणीला कळणार नाहीं अशीं इतर अनन्वित कृत्यें रणमल्ल व जयमल्ल करीत असले तरी राजवाड्यांतल्या स्त्रियांवर तिच्या देखत जुलूम केलेला तिला खपणार नाहीं याची त्यांना खात्री होती.

आज रणमल्लानें मुद्दाम आजाऱ्याचें ढोंग केलें होतें व त्याला पहावयाला स्वतः राणी चंद्रमहालांत आली होती. राणीला आपल्याजवळ बसवून रणमल्लानें बोलण्याच्या नादांत तिला गुंतविलें व तिकडे जयमल्लानें एका नोकरास राजवाड्यांत धाडून "राणीसाहेब मानकुंवरला बोलावीत आहेत." असा निरोप पाठविला. राणीनें बोलावल्यामुळें त्यांत कांहीं कपट नाहीं असें जाणून बिचारी मानकुंवर आपण होऊन लांडग्यांच्या तोंडांत आली होती. राणीसाहेबांच्या समक्ष रणमल्ल कांहीं करूं शकणार नाहीं, अशी तिची खात्री होती. मानकुंवर चंद्रमहालांत येतांच तिला दुसऱ्या एका दालनांत नेऊन अडकवून ठवण्यांत आलें. इकडे मानकुंवरवर हा प्रसंग आल्याचें राणीस माहीत नसल्यामुळें ती कांहीं वेळानें राजवाड्यांत निघून गेली. परंतु मेरामणच्या लक्षांत ही गोष्ट यावयाला उशीर लागला नाहीं. राणी एकटीच गेली, मग मानकुंवर कोठें आहे? यांत या दोन ठगांचें कांहींतरी कपट आहे हें तो जाणून गेला. कांहीं तरी कामासाठीं म्हणून आंत जाऊन रणमल्लाच्या खोलीजवळ गेल्यावर ते दोघे मानकुंवरला कसा त्रास देत आहेत हें त्याला कळलें व दुसऱ्या दारानें तो एकदम आंत गेला आणि त्या दुष्टांच्या हातून तिला त्यानें सोडविलें.

रणमल्ल तावातावानें तेथून राजवाड्यांत जावयाला निघाला. आपण आजाऱ्याचें ढोंग केलें आहे हेंहि तो विसरला. मानकुंवर निव्वळ खोटें सांगतें असें त्याला आपल्या मुलीला सांगावयाचें होतें. राणीला आपलेंच खरें वाटेल, मानकुंवरसारख्या दासीचें वाटणार नाहीं व आपण कांगाव करून आपलेंच खरें भासवूं असें त्याला वाटलें. अलीकडे राणीला हळुहळूं आपल्या पित्याचें स्वरूप कळूं लागलें होतें. यापूर्वी कोणी कांहीं सागितलें तरी तुम्हाला माझ्या माहेरची मंडळी नको म्हणून मला सांगतां असें ती म्हणे व त्यामुळें रणमल्लास अधिक फावत असे. त्याच्या विरुद्ध कोणी बोलूं शकत नसत.

रणमल्ल—जयमल्ल यांना मारवाडच्या रखरखीत हवेपेक्षां मेवाडचा सुपीक प्रदेश अधिक मानवला होता व या प्रदेशांत आपणांस यथेच्छ चरावयास मिळावें असें त्यांना वाटूं लागलें होतें. अल्पावधींतच रणममल्लानें चितोडच्या दरबारांत मारवाड्यांचा भरणा पुष्कळ केला होता. प्रथम कांहीं दिवस रणमल्लाचा हा कावा चितोडच्या सरदारांच्या लक्षांत आला नाहीं. परंतु अधिकाराच्या जागेवर मारवाडी लोक येऊं लागून राज्याचा अधिकार जसजसा त्यांच्या हातांत जाऊं लागला तसतसें त्यांना आपल्यावर येणाऱ्या संकटाची कल्पना होऊं

लागली. ही परिस्थिति जर अशीच राहिली तर मेवाडचें राज्य मारवाड्यांच्या वशांत आयतेंच पडणार, असें सुज्ञ लोकांस वाटूं लागलें. ही स्थिति राणीला कळवावी तर तिला खरें वाटणें शक्य नव्हतें व वाटत नव्हतेंच. शिवाय चितोडच्या सरदारांना तिला भेटावयास वेळच मिळत नसे. कारण रणमल्लाचे लोक चोहोंकडे होते. खुद्द मारवाडी स्त्रिया तिच्याभोंवती व पहाऱ्यावर मारवाडी लोकांचा पहारा असल्यामुळें चितोडच्या लोकांचें कोठेंच कांहीं चालत नव्हतें. कांहीं अंशीं राणीला एक प्रकारच्या बंधनांतच रणमल्लानें ठेवलें होतें म्हटलें तरी चाले. ही परिस्थिति अद्याप पुरतेपणीं राणीच्या लक्षांत आली नव्हती, परंतु कांहीं सरदार मात्र समजून चुकले होते.

रणमल्ल राणा मुकुलजीला आपल्या मांडीवर घेऊन स्वतः चितोडच्या भाग्यशाली सिंहासनावर बसे. राणाजीला सिंहासनावर बसावयाचें भय वाटतें असें तो प्रथम म्हणत असे. राणीलाहि तें खरें वाटे. स्वतः चंद्रसिंहसुद्धां अशा निमित्तानें कधीं सिंहासनावर बसला नव्हता. रणमल्लाचें सिंहासनारोहण चितोडच्या सरदारांच्या डोळ्यांत सलत होतें, परंतु राणीची आज्ञा ! चितोडचे सरदार स्वामिनिष्ठ होते. त्यांना कपट फारसें ठाऊक नव्हतें, त्यामुळेंच रणमल्लाचें कपटकारस्थान सहज पचनीं पडूं लागलें. मुकुलजीसाठीं सिंहासनावर बसतां बसतां चितोडचें सिंहासन आपल्याच मालकीचें असावें असें त्याला वाटूं लागलें. त्यासाठीं जयमल्ल वगैरे कांहीं सरदारांबरोबर रणमल्लाचे गुप्त बेत चालूं लागले. राणीला या गोष्टीची दादहि नव्हती, परंतु चितोडचे सर्वच सरदार गैरसावध नव्हते, रामसिंग, करणसिंग वगैरे कांहीं मंडळींना रणमल्लाच्या कपटाचा अंदाज झाला होता व काय वाटेल तें करून ही गळ्यांत पडलेली घोरपड काढून टाकली पाहिजे, हें परक्याचें पडूं पहाणारें जूं झुगारून दिलें पाहिजे, असें त्यांना अंतःकरणपूर्वक वाटत होतें.

विंचवाच्या नांगींत विष असतें. दंश होण्यापूर्वीच नांगी ठेंचून टाकली पाहिजे असें त्यांना वाटे, परंतु त्यांना कोणीतरी पुढारी पाहिजे होता. प्रत्यक्ष चंद्रसिंहाविषयीं ज्या राणीनें संशय घेतला तेथें आपला पाड काय ? आपलें कृत्य स्वार्थी दिसूं लागेल ? याला एकच उपाय होता व तो म्हणजे कुमार चंद्रसिंहाला ही परिस्थिति कळवून चितोडरक्षणाला त्याला बोलावून आणावयाचें हा होय. त्यांनीं कुमाराचा आसपासच्या राज्यांत तपास चालविला होता परंतु त्याचा पत्ता अद्याप लागला नव्हता. राणीला आपल्या

कपटी व मतलबी पित्याच्या खऱ्या स्वरूपाची खात्री पटवून देतां येईल अशा एखाद्या प्रसंगाची वाट पाहणें त्यांना भाग होतें. रणमल्लहि तितकाच धूर्त होता, आपला कार्यभाग होईपर्यंत चितोडच्या कोणाही सरदाराची राणीला भेट होणार नाहीं असा त्यानें पक्का बंदोबस्त करून ठेविला होता.

लोभानें मनुष्य काय करणार नाहीं? स्वतःच्या सुखासाठीं मनुष्य आपल्या स्वजनाचाही घात करावयास प्रसंगीं मागें पहात नाहीं. वेळूंचें एकमेकांशीं घर्षण होऊन अग्निस्फुलिंग उत्पन्न होतात व त्यांत कित्येक वेळूंचा नाश होतो. कांहींशी तशीच स्थिति राणीची झाली होती. तिनें आपण होऊनच आपल्या हातानें अग्नि प्रदीप्त केला होता, आतां तिला आपल्या हातून कांहींतरी चूक झाली असावी असें वाटूं लागलें व भुलभुलावणींत चुकल्यासारखी तिची स्थिति झाली!

## प्रकरण २० वें

# खरें स्वरूप

"बासाहेब, रक्षण करा! रक्षण करा! या गरीब गाईचं रक्षण!" राणीच्या पायांवर पडून मानकुंवर म्हणाली. चंद्रमहालांतून ती निघाली त्यावेळीं रणमल्ल आपल्या मागें चित्त्यासारखा येत आहे असें वाटलें व ती तेथून मागें न पहातां तीरासारखी धांवत आली. अर्धवट बेशुद्ध स्थितींत पडून वरील शब्द तिनें उच्चारले. मानकुंवर अशी येऊन पडल्यामुळें राणीला फार आश्चर्य वाटलें, एका दासीला पाणी आणावयास सांगितलें, पाणी मानकुंवरच्या तोंडावर शिंपडल्यावर ती शुद्धीवर आली. "मानकुंवर, काय झालं, नीट सांग पाहूं."

"बासाहेब, आपल्या पिताजीपासून माझं रक्षण करा." कशीबशी उठून रडत रडत ती म्हणाली.

"कुठं आहेत पिताजी? मानकुंवर, बाप्पाजी आजारी आहेत अन् मी आतांच त्यांना पाहून आले ना? कांहीं तरी खोटें सांगूं नको."

"नाहीं, नाहीं," ती हात जोडून म्हणाली. "बासाहेब, आपण चंद्रमहालांत मला बोलावलं असं मला खोटं सांगून तिकडे बोलावून नेलं अन् बासाहेब, मी खरं सांगतें. भगवान् एकलिंगजीला स्मरून सांगतें. ते दोघेही माझ्या

अश्रूवर उठले. मेराकाका होते म्हणून आज माझी अब्रू वांचली. ": मानकुंवर काकुळतीला येऊन म्हणाली.

" हारामखोर, बटकी. सांग, सांग. तुला काय कुभांड रचून सांगायचं तितकं, " राणीनें वर पाहिलें. रणमल्ल संतापून बोलत होता. राणीच्या कपाळाला आंठ्या चढल्या. " पद्मकुमारी " तुमचे चितोडचे लोक भारी उद्दाम आहेत. "

" बाप्पाजी, माझ्या लोकांना वाटेल तसं बोलूं नका. " राणी जरा रागानेंच म्हणाली. " मानकुंवर, झालेली हकीगत खरी खरी सांग पाहूं ? " रणमल्लाच्या समक्ष न भितां मानकुंवरनें सर्व वृत्तांत जशाचा तसा सांगितला. सांगतां सांगतां ती रडत होती. राणी पुढं हात जोडून ती काकुळतीनें म्हणाली. " बासाहेब, यापुढं आम्हीं कसं वागावं. मी एक गरीब कुणबीण आहे. पण मला कांहींच अब्रु नाहीं का ? " राणीला आपल्या पित्याच्या या बेछूट वर्तनाचा अत्यंत राग आला. मानकुंवरचें सांगणें तिला खरें वाटूं लागलें.

" बाप्पाजी, मानकुंवर सांगते हें खरं कां ? "

" तुला तरी खरं वाटतं कां ? म्हणतो काय तुमचे हे लोक मोठ द्वाड आहेत. ही मानकुंवर मला तुझ्यासारखी. तिला मी असं कांहीं करीन कां ? निव्वळ खोटं, निव्वळ खोटं. काय जहांबाज ही पोरटी आहे ? माझ्यावर नसता आळ घेते. मी-मी तुझा बाप, मारवाडचा राजा, माझ्यासारख्यावर असला घाणेरडा आळ, छाटून टाकीन तिची जीभ, काय समजते ? " रागानें रणमल्ल बोलत होता. त्याला खरोखरीच मानकुंवरचा राग आला होता.

" मला आपण राणी व्हायला सांगत होतात ती, मी मुलगी म्हणून वाटतं ? " राणीनें आपला पक्ष घेतला आहे, म्हणून जोर येऊन मानकुंवर म्हणाली.

" अग, दुष्टे, खोट्यानाट्या थापा मारून माझं नांव बद्दू करायला पहातेस होय ? शरम नाहीं वाटत तुला ? " संतापातिरेकानें रणमल्ल गर्जला. "पद्मकुमारी, तुझ्या फुशीनं ही शेफारून गेली आहे; पण माझ्या पुढं या बटकीचा वरचढपणा चालणार नाहीं. तुला पाह्यला ती चंद्रमहालांत आपण होऊनच आली होती. माझ्या अंगांत ताप होता म्हणून मी सहज हुक्क्याची नळी माझ्या हातांत दे म्हणालों तर त्याचं तिनं एवढं रण माजविलं. याद राखून ठेव माझ्याशीं गांठ आहे. ही असं कांहीं तरी खोटंनाटं

सांगेल म्हणून मी अंगांत ताप आहे तरी तसाच इथं आलों !" दांतओठ खाऊन रणमल्ल म्हणाला.

" बाप्पाजी, जाऊं द्या झालं तें झालं. पण यापुढं माझ्या कोणत्याहि माणसाला त्रास होतां कामा नये." राणी जरा कठोरपणानेंच म्हणाली.

रणमल्ल त्वेषानें म्हणाला. " काय म्हणतेस? मी त्रास देतो? वाहवा, वाहवा!" मुलीपुढें हात नाचवून रणमल्ल बोलत होता. " या दासीसाठीं माझा तूं अपमान करणार? अन् तिच्याच समक्ष! फार चांगलं. उद्यां तिनं आमच्या मिशा उपटून आमच्या हातांत द्याव्या म्हणजे झालं. चांगलं—चांगलं राणीसाहेब, जोंपर्यंत मी बोलत नाहीं तोंपर्यंत ठीक आहे, नाहीं तर माझा राग कसा आहे तें दाखवीन. एका बटकीसाठीं प्रत्यक्ष तूं आपल्या पित्याच्या अब्रूवर उठणार काय? पहातों आतां या गुलामडीच्या कशा गमजा चालतात त्या?"

" बाप्पाजी, बाप्पाजी. आतां पुरें झालं. तुम्ही फार संतापला आहांत," राणी म्हणाली.

" संताप नाहीं होणार तर काय? अशा अपमानानं कोणाच्या अंगाची लाही होणार नाहीं? तुझ्यामुळंच मला हा अपमान सहन करावा लागतोय. नाहीं तर या मानकुंवरची काय मगदुर आहे माझा अपमान करायची?"

" बाप्पाजी, तुम्हीं आतां तुमच्या महालांत जा." राणी कंटाळून म्हणाली.

" पद्मा, मला शहाणपण सांगतेस तूं?" रणमल्ल संतापातिरेकानें म्हणाला.

" हो. तुम्ही या वेळीं आपल्या महालांत जाल तर बरं." राणीहि किंचित् रोषानें म्हणाली.

" अस्सं काय? कोणाला तूं एवढ्या गमजा सांगतेस? तुला वाटत असेल मी चितोडची महाराणी आहे म्हणून अन् त्या घमेंडींत असशील तूं? पण तुझा हा अधिकार बदलून टाकायला मला वेळ लागणार नाहीं समजलीस?" रागाच्या भरांत रणमल्ल बोलून गेला. आतां मात्र राणीला फार राग आला. ती क्रोधानें बसल्या जागेवरून उठून आपल्या पित्यापुढें उभी राहिली.

" बाप्पाजी, मी चितोडची महाराणी आहे. माझा अधिकार तुम्ही कसा बदलणार तें दाखवा पाहूं? आजपर्यंत मी पुष्कळ ऐकलं पण आज मला अनुभव येतो आहे."

" अद्याप आला नाहीं. कळेल तुला, समजलं ना ?"

" काय कळणार? काय कराल तुम्ही ?"

" मला वाटेल तें करीन."

" पाहूंद्याच." राणीच्या अंगाचा संताप झाला होता.

" तशी तुझी इच्छा असली तर लवकरच कळेल. चितोडची महाराणी म्हणे, पाहूं दे तुझं राणीपद किती टिकतंय तें ?"

" बाप्पाजी, तुम्ही माझं कांहीं करूं शकणार नाहीं, समजलं ? चितोडची प्रजा स्वाभिमानी आहे, माझ्या हांकेला प्रत्येक चितोडवासी धांवून येईल." स्वाभिमानानें राणी म्हणाली.

" बोलाव बोलाव, तुझ्या प्रजेला." उपहासानें रणमल्ल म्हणाला. " तुझ्या या वर्तनाचा तुला पश्चात्ताप होईल बघ." इतकें बोलून रणमल्ल रागानें जळफळत बाहेर निघाला. त्यानें सक्रोध नजरेनें मानकुंवरकडे पाहिलें व मनांत म्हणाला " बरं आहे पाहून घेईन, तुझी मान वांकवीन तरच मी नांवाचा रणमल्ल."

रणमल्लाच्या शेंवटच्या वाक्यानें राणी अतिशयच संतापली होती. पितापुत्रांत झालेल्या संवादानें बिचारी मानकुंवर भयभीत होऊन गेली होती. याचा पुढें काय परिणाम होणार म्हणून तिला चिंता वाटूं लागली.

राजवाड्यांतून रणमल्ल रागानें निघाला व चंद्रमहालांत गेला. पुढेंच त्याला जयमल्ल भेटला. रणमल्लाच्या क्रुद्ध चेहऱ्यावरून कांहीं तरी तसाच प्रकार घडला असावा असें जयमल्लानें ताडलें. मेरामणनें त्याला नुकतीच धमकी दिली होती तें शल्य त्याच्या हृदयांत सलत होतेंच. लोखंड चांगलें लाल तापलें आहे तोंच घणाचा घाव घालून आपल्या मनाप्रमाणें आकार बनविला पाहिजे. असें जाणून जयमल्ल म्हणाला. " महाराज, आपली प्रकृति खरोखरीच ठीक दिसत नाहीं. राजवाड्यांत कांहीं अधिक उणा प्रसंग झाला काय ?"

" जयमल्ल, जयमल्ल. शक्य तितक्या लवकर.—पण चल, आपण आंतच बसून बोलूं." म्हणून रणमल्लानें जयमल्लाचा हात धरला व दोघे आंत बैठकीच्या खोलींत जाऊन बसले. मेरामण देवडीवर होताच. त्याला या दोघांचा संवाद ऐकूं आला होता. कांहीं तरी कपटकारस्थान करावयास ही जोडी गेली हें त्यानें तेव्हांच ताडलें व कांहीं काम नसतां तोहि उठून आंत

गेला. रणमल्लाच्या खोलीचें दार बंद होतें. परंतु तो सहज तेथून जावें अशा रीतीनें दाराजवळून दोन तीन वेळ खेपा घालून आला. त्याला फारसें ऐकूं आलें नाहीं, परंतु जे चारदोन शब्द ऐकूं आले त्यावरून पुढील प्रसंगाचा त्याला कयास करता आला.

" असं आहे कां ? " मेरामण स्वतःशींच बोलला. त्यानें आपल्या सफेत मिशांवरून एकदां हात फिरविला. तो जाऊन देवडीवर गुडगुडी ओढत बसला.

इकडे रणमल्ल जयमल्लास सांगत होता. " आतां आपण आपला कार्य भाग शक्य तितक्या लवकर उरकून घेतला पाहिजे. माझी मुलगीच आतां माझ्या विरुद्ध झालेली दिसते. एका बटकीमुळं तिनें माझा अपमान केला आहे. जयमल्ल, कांहीं म्हण तिला आपल्या गुप्त बेताचा सुगावा लागला आहे, आतां दिरंगाई करून उपयोग नाहीं, नाहीं तर डाव हुकायचा . "

" म्हणूनच मी म्हणत होतों, अशा कामाला दिरंगाई कामाची नाहीं. "

" मला तितका कठोरपणा दाखवायचा नव्हता. पण तिला फार मगरूरी आहे. आतां गम खाण्यांत अर्थ नाहीं. "

## प्रकरण २१ वें

# जसूनें सांगितलेली बातमी

राणी आपल्या महालांत एकटीच विचार करीत बसली होती. ती बरीच काळजींत असावी असें दिसत होतें. आधले दिवशीं रणमल्लाशीं झालेल्या भांडणाचा काय परिणाम होईल असें तिला आतां वाटत होतें, कारण त्या-नंतर रणमल्ल तिला मुळींच भेटला नाहीं. आपण आपल्या पित्याचा अपमान केला हें चांगलें केलें नाहीं असें तिचें मन तिला खाऊं लागलें. आपल्या पित्यासंबंधी जी थोडी थोडी कुणकुण आपल्या कानावर आली होती त्यांत कांहीं तथ्यांश तर नसेल ! ' तुझा अधिकार बदलून टाकायला मला वेळ लागणार नाहीं. ' असें आपला पिता बोलला त्याचा अर्थ काय ? अशा मन-स्थितींत राणी असतां जसु एकदम आंत आली.

" बासाहेब, मी एकदम अशी आंत आलें म्हणून मला माफ करा. तसंच जरूरीचं काम पडलं म्हणून मी आलें. " राणीपुढें हात जोडून जसु म्हणाली. राणीनें तिच्याकडे दृष्टिपात केला.

" काय काम आहे जसु ? "

जसूनें एकदां त्या दिवाणखान्याभर न्याहाळून पाहिलें. आपल्या दोघीं-शिवाय तिसरें कोणी नाहीं अशी खात्री करून घेतली. नंतर ती शक्य तितक्या राणीच्या जवळ बसली. तिचें आतांचें वर्तन राणीला चमत्कारिक वाटलें. तीहि तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागली.

" जसु, इतकं महत्त्वाचं तुला काय सांगायचं आहे ? "

" बासाहेब, तसंच महत्त्वाचं आहे. कोणी ऐकणार तर नाहीं ना? " इकडे तिकडे कावरीबावरी पाहून जसु म्हणाली. जसूचें बोलणें नीट ऐकावें म्हणून राणीहि नीट उठून बसली.

" सांग, सांग जसु, लवकर सांग काय तें? कोणी इकडे येणार नाहीं. मी बोलावल्याशिवाय कोणी येऊं नका असं मी सर्वांना बजावून सांगितलं आहे. "

"बासाहेब, " जसु अगदीं खालच्या स्वरांत म्हणाली."मी सांगितलेलं आपल्याला खोटं वाटेल कदाचित, पण आपलं जपून असावं असं वाटतं. "

" काय सांगायचं तें चटकन सांग पाहूं ! "राणी अधीरपणानें म्हणाली.

" बालराणाजीच्या जिवाला जपलं पाहिजे. "

" काय—काय ? माझ्या मुकुलला , माझ्या प्राणापेक्षां प्यारा मुकुलजीला ! जसु, काय म्हणतेस तूं ?" राणी घाबऱ्या घाबऱ्या म्हणाली.

" होय " शांतपणानें ती म्हणाली. " बासाहेब, राणाजीला फार जपलं पाहिजे. केव्हां दगा होईल याचा नेम नाहीं ! "

" जसु, जसु ? " जसूचा हात धरून राणी कंपित स्वरानें म्हणाली.''माझ्या बाळाच्या जिवाला दगा ? अग, त्याला कोण दगा करणार ? तो चितोडचा महाराणा आहे. राणाजींनींच त्याला सिंहासनावर आपल्या देखत बसविला ना ? माझ्या बाळाच्या जिवावर कोण उठलं आहे ? सांग लवकर, त्या स्वामिद्रोह्याला एका क्षणांत मेवाडच्या हद्दपार करते. "

" बासाहेब, आपण मोठ्यानं बोलूं नका. नाहीं तर परिणाम भलताच होईल ! "

" पण मला त्या दुष्टाचं नांव सांग आधीं, " राणी क्रोधानें म्हणाली.

" नांव सांगून आपल्याला खरं वाटेल कां ? "

" सांग. लवकर सांग. " अत्यंत अधीर होऊन ती म्हणाली.

" बासाहेब, आपले पिताजीच राणाजीच्या जिवावर उठले आहेत. " जसूचे ते शब्द ऐकतांच राणी वेड्यासारखी तिच्या तोंडाकडे पहात राहिली. आपल्या हृदयावर ब्रह्मांडाचें दडपण पडलें असें तिला क्षणमात्रांत वाटलें, मस्तकावर वज्राघात होऊन तें सुन्न झाल्यासारखें भासलें. तिला कांहींच सुचेना. " रक्षकच भक्षक झाल्यावर काय करणार ? " चंद्रसिंहासारख्या मेवाडच्या हितकर्त्याला दूर सारून हा कुऱ्हाडीचा घाव आपण होऊन आपल्या पायावर घालून घ्यावा तसें तिला वाटूं लागलें. कुऱ्हाडीचा दांडाच आपल्याला काळ होऊं पहातो आहे ! "जसु, जसु, खरंच कां हें ? माझे बाप्पाजी असं करतील ? तुझी चूक तर नाहीं झाली ? " हात पिळून राणी म्हणाली.

" नाहीं. नाहीं. बासाहेब, माझी पक्की खात्री झाली आहे. आपल्या पिताजींचा व जयमल्लजींचा बेत झाला आहे. राणाजीला ठार करून मेवाडचं सिंहासन त्यांना घ्यायचं आहे. "

" अगबाई. माझ्या बाळाला ठार करणार ? " राणी तटकन् उठून उभी राहिली. "जा. जा. जसु लवकर जा. माझ्या बाळाला एकटा टाकून आलीस?" राणीला विलक्षण धक्का बसल्यासारखें झालें.

" बासाहेब, भिऊं नका. राणाजीला एकट्यांना टाकून मी आलें नाहीं. त्यांच्याजवळ मानकुंवर अन् संग्रामसिंह आहेत. "

" कोण संग्रामसिंह ? " आश्चर्यानें राणी म्हणाली.

" कुमारांच्या बरोबर गेलेले संग्रामसिंह ? "

" अन् कुमार कुठं आहे ? "

" कोणाला ठाऊक ? संग्रामसिंहानें सांगितलं नाहीं, ते आपल्या मातापित्याला भेटायला आले आहेत. "

" कुमार नाहीं आले ? "

" नाहीं. अन् येणार पण नाहीं. " जसु मुद्दामच म्हणाली.

" हं ! " दीर्घ श्वास सोडून ती म्हणाली. " कसे येतील ? जसु, जसु. चंद्रसिंहांना मीच घालवून लावलं ना ? माझ्या बाळाचा जीव मीच धोक्यांत

घालून घेतला, काय करूं मी ? कोणाची मदत मागूं ? माझ्या बाळाचं कसं होईल ? बाप्पाजीची राज्यतृष्णा एवढी वाढली अं ? माझ्याच बाळाचा घात करून हें चितोडचं सिंहासन ते उपभोगायला पहातात काय ? धिःकार ! धिःकार ! ! "

" बासाहेब, लवकर तोड काढली पाहिजे. भगवान एकलिंगजी आपला पाठीराखा आहे. " धीर देत जसु म्हणाली.

" जसु, ही गोष्ट खरीच कां ? तुला कसं कळलं ? कोणाचं कपट तर नाहीं हें ? "

" नाहीं. अगदीं खरंच आहे. बासाहेब, राणाजीला सिंहासनावर घेऊन बसण्यांत त्यांचा तोच उद्देश होता व त्यांत मानकुंवरमुळं आपल्याशीं काल भांडण झाल्यामुळं चितोडचं सिंहासन लवकर हस्तगत करून घ्यायचं त्यांचं ठरलं आहे. वृद्ध मेरामणला ही गोष्ट काल कळली व मला सुचवून ठेवलं कीं राणाजींना डोळ्यांत तेल घालून जप. आपल्याला ही गोष्ट कदाचित् खरी वाटणार नाहीं. म्हणून इतका वेळ कळविलं नाहीं. आम्ही राणाजीवर सारखी नजर ठेवली आहे. आपल्या पिताजींनें राणाजीला चंद्रमहालांत बोलावलं आहे म्हणून जयमल्लजी काल दोन वेळ त्यांना न्यायला आले पण आम्ही त्यांचे बरोबर त्यांना पाठविलं नाहीं. आज सकाळीं राणाजींना आपल्या पिताजीनं मिठाई पाठविली पण आम्ही ती त्यांना न देतां टाकून दिली. कारण त्यांत विष आहे अशी माझी खात्री झाली. थोड्या वेळापूर्वी स्वतः आपले पिताजी आले व राणाजीला चंद्रमहलांत नेतो म्हणून म्हणूं लागले. परंतु बासाहेबांच्या परवानगीशिवाय त्यांना पाठवीत नाहीं असं मी चक्क सांगून दिलं. तेव्हां ते रागारागानें निघून गेले. संग्रामसिंहाला राणाजीला संभाळायला सांगून मीं आपल्याला ही गोष्ट सांगायला आलें. राणाजींना एकट्यांना चंद्रमहालांत नेऊन त्यांच्या जीवाला कांहीं धोका तर पोंचणार नाहीं असं वाटतं. बासाहेब, आपल्या आज्ञेशिवाय आम्हाला कांहीं करतां येत नाहीं. आमच्या जिवा-पलीकडे आम्ही राणाजीचं रक्षण करूं पण याला कांहीं तरी उपाय केला पाहिजे."

" अरे देवा ! कसं होईल आतां ! " कपाळाला हात लावून दुःखितांतः-करणानें राणी म्हणाली. " जा, जा. जसु. तूं माझ्या बाळाला घेऊन ये. त्याला मी माझ्या हृदयाशीं जपून ठेवीन. " राणीची स्थिति केविलवाणी झाली होती. ती मेवाडची स्वामिनी असून असहाय

बनली! काय करावें, कोठें जावें? आपल्या अज्ञान बालकाला कोठें लपवावें? असें तिला होऊन गेलें. ज्याचें साहाय्य संकटकालीं मागावयाचें त्याचाच आधार तुटला—नव्हे तोच संकट उत्पन्न करणारा ठरल्यावर सहाय्य तरी कोणाचें मागावयाचें? सुरक्षित जागा म्हणून जेथें आश्रय घ्यावयाला जावें तों तीच प्राणघातक दरी आहे म्हणून कळावें असें राणीला यावेळीं झालें.

"बासाहेब, आपण असा धीर सोडूं नका." राणी भांबावलेली पाहून जसु म्हणाली. "कांहींतरी व्यवस्था केली पाहिजे, आपण समजून गेलों आहोंत असं आपल्या पिताजींना कळतां कामा नये?"

"मग काय करूं मी? जा. सर्व सरदार-सामंतांना बोलावून आण. बाप्पाजींना सांगतें, मला हें चितोडचं सिंहासन नको, पण माझ्या बाळाच्या जिवाला दगा करूं नका. माझ्याच दुष्ट कृत्याचं फळ मला मिळत आहे. कुमार चंद्रसिंहांचा कांहीं अपराध नसता त्यांना मी चितोडांतून घालविलं! त्यामुळंच देवानं माझ्यावर आज हा प्रसंग आणला! ज्यानं स्वखुषीनं राज्यत्याग केला, त्यांना राज्यलोभ कसा होईल हें मला कळायला पाहिजे होतें, पण मला तेव्हां कळलं नाहीं. मला माझ्या माहेरच्या मंडळींचा लोभ होता. जसु, जसु, माझं बाळ सुरक्षित कसं राहिलं? मला सांग ग!" राणीचा कंठ भरून आला व डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. अपत्यप्रेम माणसाला रंकाहून रंक बनवितें. महाराणी अगदीं दीन बनली होती, तिला कांहींच सुचेना!

"बासाहेब, मी संग्रामसिंहाला येथें घेऊन येतें मग आपण कांहींतरी निश्चित ठरवूं."

"जा, जा, घेऊन ये लवकर." राणी म्हणाली व तिच्या मनांत आशा उत्पन्न झाली.

## प्रकरण २२ वें

# बेत

"महाराज, आपला दोनतीन वेळां बेत फसला, परंतु आतां शक्य तितक्या लवकर आपला कार्यभाग उरकून घ्यावा हें चांगलं. पाऊल भरलं आहे; माघारें घेणं आतां बरं नाहीं."

जयमल्लाचें भाषण ऐकून रणमल्ल क्षणभर विचारांत मग्न झाल्यासारखा दिसला. " जयमल्ल, तूं म्हणतोस तें खरं, पण आपल्याला वाटलं तितकं हें काम सोपं नाहीं हें तूं जाणतोसच. ती हरामखोर जसु महा लबाड आहे. तिला कांहींतरी संशय आला आहे. आपण ती मिठाई पाठविली त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं, उलट तिला आपला संशय मात्र आला. मी किती प्रयत्न केला,पण तिनें काल मुकुलला मला हातसुद्धां लावूं दिला नाहीं."

" ती समजून गेली आहे खास. शिवाय याच संधीला तो संग्रामहि कोठून तरी अकस्मिक येऊन पोंचला आहे. होईल तितक्या लवकर काम उरकून टाकलं पाहिजे. एकदा कां चितोडच्या इतर सरदारांना ती गोष्ट कळली, तर प्रसंग कठीण येईल."

" जयमल्ल, तूंच कांहीं तरी युक्ति काढ पाहूं ? " हुक्क्याची नळी ओठांत धरून रणमल्ल म्हणाला.

" संग्राम राजवाड्यांत आहे. तो राणीसाहेबांना भेटण्यापूर्वींच त्याला अडकवून टाकावा व इतर कोणाहि सरदारांना राजवाड्यांत आपल्या परवानगी-शिवाय जातां येऊं नये."

" ही व्यवस्था तावडतोब झाली पाहिजे." रणमल्ल चटकन् उठून बसून म्हणाला.

" आपल्या लोकांना मी तशी सूचना देऊन ठेवली आहे म्हणा." मिशा-वरून हात फिरवीत जयमल्ल म्हणाला.

" जयमल्ल, माझ्यापेक्षां तूंच दूरदर्शी आहेस खरा, पण पद्मकुमारीनेंच तिच्या सरदारांना राजवाड्यांत बोलावलें तर ? "

" कोणालाच आंत जाऊं द्यायचं नाहीं व बाहेर कोणाला त्यांचा निरोप कळूं द्यायचा नाहीं. आतां थोडासा कठोरपणा धरलाच पाहिजे. महाराज, आपलं कार्य उरकेपर्यंत चितोडच्या राणीला प्रतिबंधांतच ठेवलं पाहिजे." इतकें बोलून जयमल्ल भेदक नजरेनें रणमल्लाकडे पाहूं लागला.

" तिला हें सहन होईल कां ?"

" तिकडे लक्ष द्यायचं नाहीं. आपण चितोडचं सिंहासन हस्तगत करणार तें तरी त्यांना सहन होईल कां ? " रणमल्लास टोमणा मारून जयमल्ल म्हणाला. रणमल्ल स्तब्ध बसला होता. " महाराज, आतां सर्व मायामोह दूर सारला

पाहिजे. त्याशिवाय हें वैभवशाली सिंहासन आपल्या हातीं येणार नाहीं हें निश्चित. नाहीं तर चला, आपल्या रूक्ष मारवाडांत."

"नाहीं. नाहीं. इतक्यावर आतां गोष्ट आली, थोड्यासाठीं मी माघार घेईन असं वाटत कां तुला? मी या चितोडच्या सिंहासनाचा उपभोग घेतल्याशिवाय रहाणार नाहीं. कधींपासूनची तरी माझी ही इच्छा आहे."

"अन् ती खुबसुरत मानकुंवर." कुत्सितपणें हंसून जयमल्ल म्हणाला.

"अं! ती कुठं जाणार आहे म्हणा? जयमल्ल, एकदां हें सिंहासन पचविलं कीं ती माझी झालीच. तिला मीं विसरणार नाहीं समजलास!" गर्वभरानें रणमल्ल म्हणाला. "हें पहा. आतां वेळ दवडून उपयोग नाहीं. आजच्या आज मंदोरला एक जासूद जाऊं दे. येथें कांहीं तरी दगा आहे व पद्मकुमारीला आपली मदत पाहिजे म्हणून आपलं सैन्य घेऊन ये, असं जोधरावाला कळविलं पाहिजे. कशाला सैन्य पाहिजे, हें त्याला कळतां कामा नये. अगदीं गुप्त राहिलं पाहिजे. इकडे पद्मकुमारीला अगदीं बंदोबस्तांत ठेवायची. सैन्य आलं कीं चोहींकडे नाकेबंदी करून शक्य तितक्या लवकर मुकुलला हस्तगत करून घ्यायचं. एकदां आपलं सैन्य आलं कीं, चितोडच्या लोकांची भीति बाळगायला नको."

"जोधराव सहाय्य झाले नाहींत तर." शंकित होऊन जयमल्ल म्हणाला.

"एकदां त्याला इथं येऊं दे मग तो माझ्या पुढं जास्त गडबड करणार नाहीं. तसा तो आज्ञाधारक आहे. मला तो संकटांत टाकणार नाहीं. चितोडचं सिंहासन मिळवायचं हें तरी त्याच्याचसाठीं ना? पुढं तोच मालक होणार आहे." जयमल्ल मनांत हंसला. "सध्यां चंद्रसिंह कुठं आहे हें कळलं का?"

"नाहीं. कां बरं?"

"समजा. ही गडबड त्याला कळली तर तो आपल्याला चितोडचं सिंहासन पचूं देईल कां? पद्माच्या मदतीला धांवून नाहीं कां येणार?" विचारी मुद्रा करून रणमल्ल म्हणाला.

"अं! ती काळजीच नको. ज्याअर्थी आपल्या कन्येनं मुद्दाम त्याचा अपमान करून त्याला घालविला आहे. त्याअर्थी तो आतां तिला मदत करायला कशाला येतोय, उलटं तिला चांगलं प्रायश्चित्त मिळालं असंच त्याला वाटेल." हंसून जयमल्ल म्हणाला.

" छे, जयमल्ल, तसं तूं समजूं नकोस. हे चितोडचे लोक फार स्वाभिमानी असतात. घरांतल्या भांडणामुळं परक्याला घरांत घालून घेणार नाहींत. इतकं जुळायला आपल्याला कोण प्रयास पडले हें तुला ठाऊकच आहे. "

" तें जरी खरं असलं, तरी पद्मकुमारीला सहाय्य करायला चंद्रसिंह कांहीं येणार नाहीं, असं मला पक्कं वाटतं. चितोडचं कांहीं झालं तरी त्याला आतां काय करायचं आहे ? त्याला आतां पुनः चितोडांत कोण पाय घालूं देणार आहे ?" हंसून जयमल्ल म्हणाला.

" तें तर खरंच. पण मुकुलसाठीं तो धावून आला तर आपण सावध असावं. "

" म्हणून तर संग्रामाला इथंच अडकवून ठेवायचा. "

" हो. त्याला कैदच करून ठेवावा म्हणजे झालं. "

' माझं तरी म्हणणं तसंच आहे. त्याला एकदां कैद केला कीं तो जिवंतपणीं कांहीं चंद्रसिंहाकडे जात नाहीं, अन् त्याला इथली भानगड कळत नाहीं. एकदां आपण सिंहासनावर विराजमान झालांत कीं, मग कोणाचं भय नाहीं." जयमल्लाची ही युक्ति रणमल्लास पसंत पडली. संग्रामसिंह राजवाड्यांत मुकुलजीजवळ आहे तो राणीला भेटण्यापूर्वीच त्याला कैद करून ठेवावयाचा त्यांचा बेत ठरला.

इकडे जसूनें सर्व परिस्थिति संग्रामसिंहास सांगितली व राणीसाहेबांस भेटून यावें म्हणून सांगतांच संग्रामसिंह राणीस भेटावें म्हणून जावयास निघाला. राजवाड्यांतच एका भागांत राणा मुकुलजीजवळ संग्रामसिंह होता, तेथून तो राणी होती त्या माडीवरच्या भागाकडे चालला. त्याला राजवाड्याची चांगली माहिती होती. तो लहानपणापासून कुमार चंद्रसिंहाबरोबर राजवाड्याभर खेळलेला होता. संग्रामसिंह जिना चढून वरच्या दालनांत गेला असेल इतक्यांत मागाहून कोणी तरी त्याच्या कमरेला घट्ट मिठी मारली. आपली तरवार उपसण्यापूर्वींच त्याला जमिनीवर पाडण्यांत आला व घट्ट डोळे बांधण्यांत आले. दोघा राकट व सशक्त मारवाड्यांनीं त्याला चटकन् उचलून तेथून नेलें. हा प्रकार इतक्या अल्पावकाशांत घडला कीं, स्वतः संग्रामसिंहासहि विचार करण्यास अगर कोणाला तरी मदतीला बोलवावें म्हणून ओरडण्यास वेळ मिळाला नाहीं. तसेंच राणीच्या दासींपैकीं कोणालाहि ही गोष्ट कळली नाहीं.

संग्रामसिंहाला तेथून उचलून ते दोघे झटकन् सती पद्मिनीच्या महालाकडे गेले. अगदीं तिन्ही सांजा झाल्यामुळें राजवाड्यात ठिकठिकाणीं समया तेवत होत्या. त्या अंधुक प्रकाशांत संग्रामसिंहाची उचलबांगडी कळली नाहीं व कळली असली तरी ती बहुतेक मंडळी मारवाडचीच होती. पद्मिनीच्या महालाजवळ एक मोठें भुयार होतें व या भुयाराच्या दारावर चिता रचून चितोडची अब्रू व द्रव्य यांची राखरांगोळी करण्यांत आली होती. चितोडचा विध्वंस झाला होता तरी पद्मिनीचा महाल अलाउद्दीनानें तसाच ठेवला होता व तो राणा लाक्षाच्या वेळेपर्यंतहि चांगल्या स्थितींत होता. त्या महालांत कोणीहि राहात नसे. परंतु महालाची व्यवस्था नीट ठेवण्यांत आली होती. केव्हां केव्हां चितोडच्या राजस्त्रिया सती पद्मिनीच्या त्या स्मृतिचिन्हाचें दर्शन घ्यावयाला भक्तिभावानें जात असत.

संग्रामसिंहाला उचलून आणून त्या भुयारांत लोटून देण्यांत आलें. आपल्याला असें अकस्मात् पकडून भुयारांत कां व कोणीं टाकलें हें त्याला कळेना! चितोडांत येऊन त्याला अद्याप चार घटका सुद्धां झाल्या नव्हत्या तोंच हें संकट त्याच्यावर आलें!

## प्रकरण २३ वें

# राणीची जसूशीं मसलत

" बासाहेब, संग्रामसिंहाला आपण सारं सांगितलं का ? " जसु रात्रीं राणीकडे येऊन म्हणाली.

" जसु, संग्राम इकडे आलाच नाहीं. किती वेळ तरी मी त्याची वाट पाहिली, अखेरीस तो येत नाहीं असं मला वाटलं. " राणी दीर्घ श्वास सोडून म्हणाली " त्यानं तरी मला आतां मदत कां करावी ? "

" म्हणजे ? संग्रामसिंह इकडे आले नाहींत ? " जसु आश्चर्यानें म्हणाली. " बासाहेब, माझ्या देखत ते आपल्या इकडं यायला निघाले ना ? त्यांना हकीकत सांगताच ते वाटेल ती मदत करायला तयार झाले. बरं, ते त्यांच्या घरींसुद्धां गेले नाहींत असं वाटतं. मग ते गेले तरी कुठं ? हा चमत्कारच नाहीं कां ! " जसूची हकीकत ऐकून राणीलाहि आश्चर्य वाटलें.

" मग तो कुठं असावा बरं ? "

" यांत कांहीं तरी वेगळाच प्रकार दिसतोय असं वाटतं. "

" काय वाटतं तुला ? "

" त्यांच्यावर कांही तरी कपटप्रयोग झाला असावा. "

" जसु, मला सुद्धां तसंच वाटतं. चंद्रसिंहाकडून तो याच वेळीं आला व कदाचित् मला साहाय्य करील म्हणून बाप्पाजीनं त्याला कुठं तरी अडकवून तर ठेवला नाहीं ? अशी एक शंका येते. जसु, जसु ! आतां माझं कसं होईल ग ! माझ्या बाळाला मी कुठं लपवून ठेवूं ? " राणीच्या डोळ्यांतून झरझर अश्रुप्रवाह वाहूं लागला. " माझ्या बाळाच्या रक्षणाला कोण धावून येईल ?"

" बासाहेब, धीर सोडूं नका. " स्वतःच्या डोळयांतलीं आसवें राणीच्या दृष्टीस पडूं न देतां जसु म्हणाली.

" मग काय करूं मी ? जसु, माझ्या प्रत्यक्ष बापानंच मला अशा प्रतिबंधांत ठेवल्यावर माझ्या मदतीला तरी कोण येणार ? देवा ! माझ्या बाळाचं आतां तूंच रक्षण कर ! त्याच्याच जिवाची मला फार काळजी वाटते ! " राणी दुःखित स्वरानें म्हणाली. क्षणोक्षणीं ती दीर्घ सुस्कारे सोडीत होती. रणमल्ल व जयमल्ल यांनीं ठरविल्याप्रमाणें राणीला कडक प्रतिबंधांत ठेविली व तिलाहि ही स्थिति कळावयास फार वेळ लागला नाहीं. जसु व मानकुंवर या दोघीच फक्त तिच्याकडे वारंवार येत; बाकी सर्व मंडळी त्यांचीच म्हणजे मारवाडीच होती. जसुला व मानकुंवरलाहि वाड्याच्या बाहेर जाण्याची बंदी होती. राणीला अशा कडक बंदोबस्तांत ठेवल्याचें बाहेर कोणाला कळूं द्यावयाचें नाहीं हेंहि त्यांनीं ठरविलें होतें व रामसिंगादि कोणाहि मंडळींची राणीला भेट होऊं देत नसत व तिचाहि निरोप कोणाला पोंचणार नाहीं, याचाहि बंदोबस्त करून ठेवलेला होता. त्यामुळें कोणासच राणीची खरी परिस्थिति माहीत नव्हती. उलट राणीस कोणी भेटावयास आले तर राणीसाहेबांना इतक्यांत तुमची भेट घ्यावयाची नाहीं असें त्यांना परस्पर सांगण्यांत येई.

मेरामणावर रणमल्ल व जयमल्ल फार चिडले होते. त्याचा कांटा त्यांना एका घटकेंत दूरहि करतां आला असता. परंतु जर आपण मेरामणाच्या जीवाला कांहीं अपाय केला तर चितोडची मंडळी सावध होतील व आपला

कार्यनाश होईल म्हणून मेरामणाला त्याच्या पहिल्याच कामगिरीवर अद्याप राहूं दिलें होतें. मेरामणकडून रामसिंगास इतकें कळलें होतें कीं रणमल्लाचा कांहीं तरी घाट चालला आहे. राणाजीला जपलें पाहिजे. परंतु महाराणीकडून खरा प्रकार कळल्याशिवाय कांहीं करूं नये असें त्यानें ठरविलें व एक दोन वेळ राणीची भेट घेण्याचा प्रयत्न केला; पण तिची भेट झाली नाहीं. पुढें काय करावें याबद्दल त्यांच्यांत खल चालत होता. राजवाड्यांतील खरा प्रकार अद्याप मुळींच कळला नव्हता. चंद्रसिंहाकडून संग्रामसिंह आल्याचें त्याला कळलें, पण त्याच्या घरीं तपास करतां त्याचा पत्ताच नाहीं असें त्यांस कळलें व अधिक चिंता वाटूं लागली.

रणमल्लानें राणीला पहाऱ्यांत ठेवून तो आपल्या सैन्याची वाट पाहूं लागला. सैन्य येतांच एकदम प्रतिपक्षाला चीत करून चितोड बळकावयाचा त्याचा विचार होता. राण्याला हस्तगत करून घेण्याचा त्यानें पुनः प्रयत्न करून पाहिला, परंतु राणी आतां आपल्या पुत्राला क्षणभरहि विसंबत नव्हती, त्यामुळें त्यांना बळजबरीनें त्याला तिच्यापासून दूर नेतां येईना. न जाणों आपण तशी जबरदस्ती केली तर उलट प्रकार होऊन चितोडच्या स्वामिनिष्ठ सरदारांना ही गोष्ट कळून सर्वच पारडें उलटावयाचें! तेव्हां आपलें सैन्य येईपर्यंत धीर धरला पाहिजे व तोंपर्यंत खरी स्थिति कोणाला कळणार नाहीं अशी तजवीज ठेविली पाहिजे असें त्यांनीं ठरविलें.

आपल्या पुत्रावर येणाऱ्या संकटाची राणीला जाणीव होतांच आपल्या सरदारांच्या मदतीनें आपण हें संकट टाळूं शकूं असें तिला प्रथम वाटलें. पण रणमल्लानें तिला कैदच करून ठेवलेलें पहातांच तिचा अत्यंत संताप झाला! रणमल्लाची तिनें अतिशय निर्भर्त्सना केली असती. पण तो स्वतः तिच्यासमोर मुळींच गेला नाहीं. स्वतःच्या जिवापेक्षां तिला आपल्या प्रिय पुत्राच्या जिवाची फार काळजी वाटूं लागली. आपण संतापानें बाहेर पडण्याचा प्रयत्न केल्यास न जाणों आपल्या बाळाच्या जिवाला धोका होईल असें तिला विचारांतीं वाटूं लागलें. राणी आपल्या पिल्यावर फार संतापली होती, फक्त जागच्याजागीं जळफळण्यापलीकडे तिच्या हातीं सध्यां कांहीं सत्ता राहिली नव्हती. तिला आपल्या सरदारांची वगैरे कोणाचीच भेट घेतां येईना! संतापाच्या अतिरेकानें आपला मेंदू बिघडून जाईल कीं काय असें तिचें तिलाच वाटूं लागलें. तशा त्या स्थितींत जसु व मानकुंवर आपल्याकडून होईल तितकें

तिचें समाधान करीत असत. आपल्या पुत्रासाठीं आपला सर्व मानपान व अभिमान गिळून वाटेल त्याची मदत घ्यावयाला ती तयार झाली होती. आपल्या पित्यासारखा पाषाणहृदय पिता सर्व जगांत नसेल असें तिला वाटूं लागलें.

स्त्रिया सर्व कांहीं सहन करतील, पण त्यांच्या अपत्याला कोणी वाईट म्हट-लेलें त्यांना सहन होणार नाहीं. रणमल्ल तर मुकुलजीच्या जिवावरच उठला होता हें राणीला कसें सहन व्हावें ?

रात्र झाली, राणीच्या शयनखंडांत चार समया तेवत होत्या. बालराणा एका मंचकावर गाढ झोंपीं गेला होता. आपल्यावर येणाऱ्या प्राणसंकटाची त्या अज्ञान बालकाला जाणीव नव्हती. त्याच्या त्या प्रशांत व सहास्य मुद्रे-कडे पाहून राणीचें मातृहृदय पिळवटून येत होतें. " माझ्या या लाडक्या सुकुमार बाळाचं मी रक्षण कसं करूं ? " हा एकच विचार तिच्या अंतःकर-णांत घोळत होता. तिला खाणें, पिणें, निद्रा वगैरे कांहींच सुचत नव्हतें ! आपल्या पुत्राच्या मुखाकडे पहात ती सचिंतपणें बसली होती. जमु तिच्या जवळ आली.

" बासाहेब, मला एक उपाय सुचला आहे. " ती अगदीं हळूं म्हणाली. " तसं करून पाह्यचं कां ? "

" काय ? काय बरं ? " राणी अत्यंत उत्सुकतेनें म्हणाली.

" आपल्या वाड्याला अनेक गुप्त द्वारं आहेत हें मला माहीत आहे, एखादं दार सांपडून जर राणाजींची मुक्तता करतां आली तर प्रयत्न करून पहावा. "

" खरंच कां ? जमु, मग उशीर कशाला ? चल, आपण या बंदिखान्यांतून माझ्या बाळाला घेऊन बाहेर निघून जाऊं. तो सुरक्षित राहिला म्हणजे मला कसली भीति नाहीं. " राणी उताविळपणें म्हणाली.

" नाहीं. बासाहेब, एकदम घाई करून उपयोग नाहीं. मला जो मार्ग माहीत आहे तो बराच बिकट आहे, शिवाय तो मार्ग मी स्वतः एकदां पाहून येईन अन् मगच राणाजींना त्यांतून नेणं बरं. नाहीतर एक करतां भलताच प्रसंग यायचा. चांगली रात्र पडून जरा सामसुम झाल्यावर मी एकदां खात्री करून घेतें. घाईनें कोणाला संशय यायचा कदाचित्. "

" हो. पण आपण सर्वच एकदम गेलों तर काय हरकत आहे ? " राणी अधीरपणें म्हणाली.

" नको. तो मार्ग आज कित्येक वर्षे तरी बंद आहे. सती पद्मिनीच्या महालाकडून तो रस्ता जातो असं माझ्या आजीनं मला सांगितलेलं आहे. इतक्या वर्षांच्या बंद मार्गानं राणाजींना एकदम नेणं चांगलं नाहीं. प्रथम तो रस्ता आहे कीं बुजला, हें मी एकदां पाहून येईन. " जसूचें म्हणणें राणीला पटलें व त्या चोहींकडे सामसुम होण्याची वाट पाहूं लागल्या.

## प्रकरण २४ वें

# भुयारांतून सुटका

भुयारांत पडल्यावर संग्रामसिंह विचार करूं लागला. आपल्याला असें येथें कोणी टाकलें असावें ? प्रथम त्याचा कांहींच तर्क चालेना, परंतु हळुहळु त्याला एक शंका येऊं लागली व नंतर त्याच्या मनाची खात्री झाली. रणमल्लाचेंच हें काम असलें पाहिजे असें त्याला वाटलं. पण येथून आतां सुटण्याचा उपाय काय ? बाहेर पडावयास कांहीं मार्ग आहे कां म्हणून पहावयास तो उठला. चोहींकडे भयंकर काळोख असल्यामुळें त्याला स्वतःचें शरीरसुद्धां दिसत नव्हतें. तो इकडेतिकडे चाचपडूं लागला तर धुरळा, कोळीष्टकें व खडबडीत भिंती याशिवाय हाताला कांहींच लागत नव्हतें. कोठें तरी दार सांपडेल म्हणून त्यानें बराच वेळ प्रयत्न केला. पण व्यर्थ ! कित्येक वर्षे ती जागा ओसाड पडली होती. पूर्वी जेव्हां कोणा बलाढ्य शत्रूची स्वारी चितोडवर आली तर राजस्त्रिया व जडजवाहीर हें सुरक्षिततेकरितां या भुयारांत लपवून ठेवीत असत. अल्लाउद्दीनानें पद्मिनीसाठीं जेव्हां चितोडावर स्वारी केली, तेव्हां सर्व उपाय हरल्यावर या भुयाराच्या दारावर मोठी चिता रचून पद्मिनीसह हजारों रजपुत स्त्रियांनीं आपल्याला त्यांत जाळून घेतलें होतें ! तेव्हांपासून तें भुयार अगदीं निरुपयोगीच झालें होतें. कारण त्या भुयाराच्या दारावर भुतांचा पहारा असतो अशी पुष्कळांची समजूत होती. रात्रींतर काय परंतु भर दिवसासुद्धां त्या भुयाराकडे जावयास वाड्यांतले नोकरचाकर अतिशय भीत. त्यामुळें तिकडे नेहमींच शांतता असे. मनुष्य न फिरकल्यामुळें तिकडे अगदीं उदासवाणें वाटे. जवळच पद्मिनीचा महाल होता, तेथें नोकर येऊन एकदां तरी साफसुफ करून

जात त्या भुयारासंबंधीं अनेकांनीं अनेक आख्यायिका ऐकलेल्या होत्या व त्यामुळें त्याला अधिकच भयाण स्वरूप आलें होतें.

रणमल्ल जेव्हां चितोडला आला, तेव्हां त्यानें इतर सर्व महालाबरोबर हा पद्मिनीचा महाल व भुयार हेंही पाहून ठेवलें होतें. त्याचाच त्यांनीं संग्रामसिंहासाठीं आतां उपयोग करून घेतला होता.

तें भुयार म्हणजे एक लांबचलांब घळ होती. हा कोठेंतरी दूरपर्यंत मार्ग असावा असें संग्रामाला वाटलें व तो पुनः उठून मार्ग सांपडतो कां म्हणून पाहूं लागला. कोठें कांहीं न दिसल्यावर तो हताश होऊन खालीं बसला व आपणास जिवंत समाधि मिळणार असें त्याला वाटूं लागलें. रात्र आहे का दिवस हेंहि कळण्याला मार्ग नव्हता. सुटण्याचा मार्ग दिसतो कां म्हणून आशेनें उठावें व पुनः निराश होऊन बसावें. पुनः प्रयत्न करून पहावा असें किती तरी वेळ त्याचें चाललें होतें. " मी इथंच कुजून मेलों तरी माझी दाद कोणाला लागणार नाहीं. मी न गेल्यानें कुमार चंद्रसिंहाला काय वाटेल ? बालराणाजींचें कसें होईल ? त्यांची या संकटांतून सुटका होईल कीं नाहीं ! माझ्या मातापित्यांना माझ्याबद्दल केवढी काळजी लागून राहील." अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत एकामागून एक येत होते.शेवटीं आपल्या दैवांत असेल तसें होईल, म्हणून निराश होऊन तो स्वस्थ बसून राहिला.

बसल्या जागेवरून त्याला दूर अंतरावर अंधुक प्रकाश दिसूं लागला व त्याच्या निराशपूर्ण हृदयांत आशांकुर उद्भवला ! तो अंधुक प्रकाश जवळजवळ येऊं लागला. संग्राम इतक्या निधड्या छातीचा, पण त्याच्या हृदयांत क्षणभर भय उत्पन्न झालें ! ही पिशाच्चचेष्टा तर नव्हे असें त्याला वाटूं लागलें. केव्हांपासून आपण येथें असून इतका वेळ हा प्रकाश दिसत नव्हता व आतां कोठून दिसूं लागला ! कां आपण स्वप्नांत आहोंत कां भूक फार लागली आहे म्हणून दृष्टिभ्रम होऊन हा प्रकाश दिसूं लागला. कुठें तरी दार असावें म्हणावें तर इतका वेळ प्रयत्न करून तें आपणास कुठेंच दिसलें नाहीं, मग हा प्रकाश कशाचा ? प्रकाश क्षणोक्षणीं स्पष्टपणें जवळ जवळ येऊं लागला. संग्रामसिंग मनाचा धडा करून त्या दिशेला स्तब्धपणें बसून पहात होता, आतां तर त्याला अंधुक अशी आकृतिहि दिसूं लागली. हें पिशाच्चच असावें असें वाटून तो झटकन् उठून उभा राहिला. त्यानें आपली तलवार म्यानांतून बाहेर काढली. परंतु जवळ येणारी आकृति स्त्रीची आहे व तें पिशाच्च नसावें अशी

त्याची खात्री होऊं लागली. इतक्यांत त्या स्त्रीच्या आकृतीनें संग्रामकडे पाहिलें. ती भयानें थरथर कापूं लागली. तिच्या हातून पणतें खालीं पडलें व तें तात्काळ विझून गेलें. त्याबरोबर त्या स्त्रीनें अस्पष्ट अशी किंकाळी मारली व ती खालीं पडली. संग्राम एकदम पुढें झाला; त्या स्त्रीला हलवून सावध करूं लागला.

" जसुबा, जसुबा. " पणतें पडण्यापूर्वीच त्यानें तिला ओळखलें होतें. " जसुबा, मी संग्राम, तुम्ही घाबरूं नका." त्याचे शब्द कानावर पडतांच जसु सावध होऊन चटकन उठून बसली व तिची भीति नाहींशी झाली. काळोखांत जरी कांहीं दिसत नव्हतें, तरी त्यांना एकमेकांची ओळख पटल्यामुळें आतां भय वाटत नव्हतें.

" संग्रामसिंह, तुम्हाला त्या मेल्यांनीं इथं कां टाकलं ? अशा निर्मनुष्यजागीं तुम्हाला अवचित पाहून मी फार घाबरलें. मला कोणी हजार मोहरा दिल्या असत्या तरी मी या जागेंत कधीं आलें नसतें. " शहारे आणून ती म्हणाली. " या जागेविषयीं काय काय बातम्या उठल्या आहेत हें तुम्हाला माहीतच आहे ! "

" होय. मला सुद्धां प्रथम वाटलं कीं माझ्याकडे पिशाच्च येत आहे म्हणून. "

" पण, संग्रामसिंह, तुम्हाला त्या दुष्टांनीं केव्हां इथं टाकलं ? आम्हीं तुमची किती तरी वाट पाहिली. बासाहेबांना तर फार वाईट वाटलं तुम्ही न आल्यामुळं. "

" जसुबा, मला वाटतं तुम्ही ज्यांना उद्देशून म्हणता ते रणमल्लजयमल्लच असावेत, खरं ना ? "

" होय. दुसरं कोण तुम्हाला इथं टाकणार ! मेल्यांचं तळपट होवो." रागानें हाताचीं बोटें कडकड मोडून जसु म्हणाली. " पण, त्यांनीं तुम्हांला इथंच टाकलं हें फार बरं झालं. पहिल्यानं मी फार भ्यालें. तुमची भेट अशी इथं होईल असं मला वाटलं नव्हत."

" जिवंतपणीं आतां मला कोणी भेटेल असं मलाहि वाटत नव्हतं. ईश्वराच्या कृपेनें सर्व कांहीं घडत असतं. " नंतर आपल्याला कसें पकडून येथें टाकण्यांत आलें हें संग्रामानें तिला सांगितलें. कालपासून राणीवरहि कसा पहारा कडक आहे हें तिनें त्याला सांगितलें. " संग्रामसिंह, एकलिंगजीनें

खेर केली म्हणूनच तुमची इथं भेट झाली. चला, आतां येथून बाहेर पडावयाचा मार्ग आपण शोधून काढूं. त्या मारवाड्यांना वाड्याची पुरी माहिती नाहीं म्हणूनच त्यांनीं तुम्हाला इथं टाकलं. कारण या मार्गानें बाहेर जायला वाट आहे हें मला ठाऊक आहे, तेव्हां ती वाट आपण शोधून काढूं या. रस्ता आढळल्यावर तुम्हाला वाड्याबाहेर पडतां येईल व बाल राणाजीला मदत करतां येईल. कुमार चंद्रसिंहाला झटपट चितोडला घेऊन या म्हणजे बाल राणाजीवरचं संकट टळेल. ''

" हो पण जसुबा, राणीसाहेबांनीं सांगितल्याशिवाय कुमार चितोडांत तर काय पण मेवाडच्या सीमेंत सुद्धां पाऊल घालणार नाहींत. त्यांचा स्वभाव फार मानी आहे. "

" होय. मला कुठं माहीत नाहीं! पण प्रत्यक्ष बासाहेबांनीं सांगितल्यावर तर येतील? संग्रामसिंह, बासाहेबांचा पाहिला स्वभाव राहिला नाहीं. राणाजींच्या जिवासाठीं त्या वाटेल तें करतील आतां. "

" बरं, चला, प्रथम बासाहेबांना भेटूं. '' नंतर चाचपडत चाचपडत दोघेहि राजवाड्याकडेच गेले. थोड्या वेळांतच ते राणीच्या शयनखंडांत आले. राणी जसूची वाट पहातच बसली होती. तिच्या बरोबर संग्रामाला पाहून तिला फार आश्चर्य वाटलें. जसूनें तिला सर्व हकीगत सांगितल्यावर ती म्हणाली. " इतकंच ना? मी स्वतःच चंद्रसिंहांना एक पत्र लिहून देतें, मग तर ते माझ्या बाळांच्या रक्षणाला येतील ना? जा. जसु, प्रथम संग्रामसिंहाला कांहीं खायला आणून दे. तोंपर्यंत मी पत्र लिहून ठेवतें. "

" नको. बासाहेब, मला खाण्याची तितकी जरूर नाहीं. आपण पत्र लिहून द्या तोंपर्यंत बसतों. '' परंतु राणीचा फार आग्रह पडला व जसूनेंहि चटकन् जाऊन लोटाभर पाणी आणि सुखडी ( गुळपापडी ) त्याच्या पुढ्यांत आणून ठेवली. त्यालाहि सपाटून भूक लागलीच होती. तेव्हां अधिक आढेवेढे न घेतां त्यानें फराळ केला व तितक्या वेळांत राणीनें पत्र लिहून ठेवलें.

राणी नेत्रांत आसवें आणून रुद्ध कंठानें म्हणाली. संग्रामसिंह, "कुमारांना म्हणावं माझ्या बाळाचा प्राण अन् चितोडची अब्रु तुमच्या बाहुबळानं रक्षण करा. माझा अपराध क्षमा करून मला माझ्या बाळाची भिक्षा घाला. त्यांना म्हणावं माझ्या पितृरूपी वणव्यांतून माझा कोवळा उगवता

अंकुर करपून जाईल तर तुमच्या प्रेमाचं जीवन घालून त्याचं रक्षण करा. मी सर्वस्वीं अपराधी आहे पण बाळ मुकुळ तुमचा लहानगा भाऊ आहे त्याला या संकटांतून वांचवा !" राणीचा कंठ भरून आल्यामुळें तिला पुढें बोलवेना ! तिची ती स्थिति पाहून संग्राम व जसु यांनाहि वाईट वाटलें.

"बासाहेब !" आपले ओले झालेले डोळे कोरडे करीत संग्राम म्हणाला. "आपण मुळींच काळजी करूं नका. आठ दिवसांत कुमारांना घेऊन येतो. तोंपर्यंत बालराणाजींचं रक्षण करा." नंतर त्यानें राणीला लवून प्रणाम केला व निजलेल्या बालराण्याचें दर्शन घेतलें. मुकुलजी शांतपणें निद्रासुख घेत होता. त्याच्या निर्दोष चेहऱ्याकडे पाहून त्याचें हृदय भरून आलें !

पुनः एकदा राणीला आश्वासन देऊन तो जसूबरोबर भुयाराच्या पायऱ्या उतरूं लागला. मानकुंवरनें तें गुप्तद्वार काळजीपूर्वक बंद करून घेतलें व ती जसूची वाट पहात बसली.

इकडे जसु व संग्रामसिंह हळुहळु त्या भुयारांतून पुढें जाऊं लागले. बरेंच लांब गेल्यावर त्यांना दुसरें दार लागलें. पुष्कळ कालपर्यंत, त्या दाराचा उपयोग न झाल्यामुळें तें उघडण्यास संग्रामाला बराच त्रास पडला, परंतु अखेरीस तें उघडलें गेलें. बाहेर गार वारा अंगाला लागून दोघांनाहि समाधान वाटलें. पहाट झाली होती व चंद्रप्रकाश दिसत होता. जसूला परत जावयाला सांगून संग्राम म्हणाला "बरोबर आठव्या दिवशीं मी कुमारांना घेऊन येतों व तुम्ही मला येथें भेटा. पुढें काय करावयाचें तें ठरवूं. माझ्याविषयीं काळजी करूं नका. राणाजीची मात्र चांगली काळजी घ्या."

नंतर त्यानें त्या दाराला एक शिळा टेकून ठेवली व तो तेथून प्रथम रामसिंगाच्या वाड्याकडे जावयास निघाला.

आपल्याला अशा अपमानकारक रीतीनें वागविल्यामुळें संतापून राणीनें आपल्या माहेरच्या कोणालाहि आपल्या पुढें न येण्याची ताकीद दिली होती व फक्त जसु आणि मानकुंवरच तिच्या जवळ येत. त्यामुळें जसूनें भुयारमार्ग शोधून काढला ही गोष्ट रणमल्लास तावडतोब कळली नाहीं. ती आपल्या ताब्यांत पुरतेपणीं सांपडली आहे, असेंच रणमल्लजयमल्लास वाटून ते निश्चित होते !

## प्रकरण २५ वें

# पुनः राजदुर्ग

जोरावराला वायदा केल्याला पंधरा दिवस भरत आले तशी हरपालदेवास अत्यंत चिंता वाटूं लागली. कांहीं तरी तोड निघून हें संकट टळेल असें प्रथम वाटत होतें, परंतु पुष्कळ भवति न भवति झाली तरी राजकुंवर जोरावराला दिल्याशिवाय हें संकट टळत नाहीं अशी त्यांची खात्री होऊं लागली. एक दोघा सरदारांशिवाय सर्वांचें मत असें पडूं लागलें कीं, पूर्वीपासूनच राजकन्येचा वाङ्‌निश्चय झाल्यामुळें आतां आपण तोडण्यांत अर्थ नाहीं. विवाह झाल्यावर तो मुसलमान् झाला असता तर काय केलें असतें ? कारण जोरावर हट्टाला पेटला आहे व तो राजकन्येशीं विवाह केल्याशिवाय रहाणार नाहीं. तेव्हां एक तर त्याला राजकन्या स्वखुषीनें दिली पाहिजे, नाहींतर युद्धाला तरी सिद्ध झालें पाहिजे. माळव्याच्या सुलतानाशीं संग्राम करण्याचें सोपें नाहीं. त्यामुळें सर्व राजदुर्गाचा नाश होईल व अखेरीस जबरदस्तीनें तो राजकन्येला घेऊन जाईल. दुसरा एक उपाय होता तो असा कीं, एखाद्या शूर वीरानें छाती ठोकून पुढें यावें व राजकुंवरशीं विवाह करून जोरावरशीं भिडावें. परंतु अशा या परिस्थितींत तसा शूरवीर कोण पुढें होणार आहे व आपला जीव धोक्यांत घालणार आहे ? राजकुंवरसारखी वागदत्त सौंदर्यसंपन्न वधू जोरावर कोणाला पचूं देणार ? सर्वांच्या एकविचारापुढें हरपालदेवाचें कांहीं चालूं शकत नव्हतें व एका आपल्या मुलीसाठीं आपल्या लोकांचा सर्वनाश व्हावा असेंहि त्यांना वाटत नव्हतें.

राजकुंवरला न देतां लढाई करावी असें चंद्रसिंह व वीरसिंह यांचेंच अखेरपर्यंत म्हणणें होतें; परंतु हरपालदेवांत तितकी हिंमत नव्हती व सरदारांच्या वर्चस्वामुळें ते अधिक बोलूं शकत नव्हते. शिवाय आपल्या मृत पित्याचा वचनभंगहि आपणाकडून होतो असें त्यांच्या मनाला वाटूं लागलें. शेवटीं जोरावरकडे जासूद पाठवून त्याचें म्हणणें कबूल करावें असें ठरलें. चंद्रसिंहानें पुष्कळ वादविवाद केला, परंतु त्याला सर्वांच्या पुढें आपलाच अधिक हेका चालवितां येईना व नाइलाजानें स्वस्थ बसावें लागलें.

दरबारांत अखेरचा निर्णय लागल्यावर खिन्न मनानें हरपालदेव आपल्या राणींच्या महालांत गेले. राजकुंवर आपल्या मातेजवळ बसली होती.

राजाच्या उदास मुद्रेवरून काय प्रकार घडला हें दोघींच्याहि लक्षांत आलें. आपल्या लाडक्या कन्येला पाहून हरपालदेवाच्या मनांत नानाविध तरंग उत्पन्न होऊं लागले. आपली लाडकी कन्या आपल्याला कायमची अंतरणार हें जाणून त्यांनीं भान न राहून राजकुंवरला एकदम हृदयाशीं धरली व चटकन तिला दूर करून ते घोगऱ्या स्वरानें म्हणाले, " जा. राज, तूं जा. तुझ्या आईशीं मला कांहीं बोलायचं आहे. " त्यांच्या वर्तनावरून त्यांच्या अंतःकरणांत केवढें जबर दुःख होत असावें असें दिसत होतें. पित्याची आज्ञा होतांच राजकुंवर तेथून जावयास निघाली, परंतु दाराबाहेर गेली नाहीं तोंच पित्याच्या तोंडचे शब्द ऐकून जागच्याजागीं स्तब्ध उभी राहिली.

" आपली राजकुंवर आपल्याला आतां कायमचीच अंतरली बरं कां ! " कळवळून असे उद्गार हरपालदेवाच्या मुखांतून निघाले. त्यांनीं एका आसनावर आपलें अंग टाकलें. राणी घाबरली. राजकुंवर पुढें जाणार होती, पण आपल्या पित्यानें आपणास जावयास सांगितलें असून आपण त्यांचें भाषण ऐकत उभें राहिलों हेंच आधीं आपण गैर केलें, असें वाटून ती तेथून अपल्या शयनखंडांत जाऊं लागली तोंच हरपालदेवाचें तें वाक्य ऐकून पुढें आपल्या अदृष्टांत काय आहे हें जाणण्याची जिज्ञासा उत्पन्न होऊन ती जागेवर क्षणभर उभी राहिली.

" काय झालं ? " राणी पतीजवळ येऊन म्हणाली " शेवटीं काय ठरलं ? "

" काय ठरायचं ? " त्यांनीं दीर्घ सुस्कारा सोडला. " कमल, ती आपल्या पोटीं आली हेंच तिचं दुर्दैव समजलं पाहिजे. "

" पण सर्वांचा काय विचार झाला ! " राणीनें अधीरपणें विचारलें व नंतर दरबारांत घडलेली हकीगत हरपालदेवानें राणीला सांगितली. आपल्या लाडक्या कन्येचा हा विचित्र दैवयोग पाहून राणीलाहि फार दुःख झालें. राजकुंवरला आपण होऊन एका बाटग्यास द्यावयाची म्हणजे केवढा कठोरपणा करीत आहोंत याची जाणीव होऊन हरपालदेवास अत्यंत वेदना होत होत्या. यवनांचा तिला मूळपासून तिटकारा असून आतां जन्मभर त्यांच्यांत आयुष्य कंठावें लागणार हें जाणून त्यांच्या मनाला यातना होऊं लागल्या.

" दुसरा कांहींच उपाय नाहीं कां ? " राणी डोळे पुसून म्हणाली.

" नाहीं. " लांब श्वास सोडून हरपालदेव म्हणाले. " सर्व उपाय खुंटले म्हणून तर तिला त्या बाटग्याला द्यावा असं ठरलं ! "

" कमल " खरोखरीच यापेक्षां एखाद्या गरीबाच्या पोटीं ती गेली असती अगर जन्मतांच मेली असती तर तिच्यावर आज हा प्रसंग आला नसता. आपल्या सारख्यांच्या पोटीं येऊन तिला काय सुख मिळणार? आमच्या दुर्दैवानें तिच्यावरचं संकट टाळायला आम्ही असमर्थ असावं ना ? " उद्वेगपूर्ण स्वरानें ते म्हणाले.

" माझ्या राजला ही गोष्ट आवडायची नाहीं. ज्या यवनांचा तिला तिटकारा; त्या यवनांच्या घरांत तिनं जन्म काढायचा ? "

" मी तरी तेंच म्हणतों; पण काय करणार ? " हताशपणें हरपाल-देव म्हणाले.

" आपले सरदार युद्धाला इतके कां भितात, याचं मला आश्चर्य वाटतं ! "

" त्यांचंहि म्हणणं कांहीं अंशीं बरोबर आहे. आपल्या थोड्याशा लोकांचं बळ सुलतानाच्या पुढं कितीसं टिकणार ? अखेरीस जबरदस्तीनं तरी तो तिला नेणारच ना ! त्यांत हिंमतीनं युद्ध करावं असं कोणीच म्हणत नाहीं. फक्त वीरसिंह व नवीन आलेले विजयसिंह हेंच युद्धाला तयार आहेत. "

" विजयसिंहांचं काय म्हणणं आहे ? "

" ते म्हणतात लढाईच करावी. आम्ही मरूं पण राजकन्येला यवनांच्या जनानखान्यांत जाऊं देणार नाहीं. "

" खरंच, ते तसेच शूरवीर आहेत. त्यांचं म्हणणं बरोबर आहे असं नाहीं कां वाटत ? "

" हो. पण पुढचा विचार केला पाहिजे ना ? " हरपालदेव निःश्वास सोडून म्हणाले.

" यापूर्वीच दुसऱ्या एखाद्या रजपुताशीं राजकुंवरचं लग्न करून टाकलं असतं तर आज हा प्रसंग आला नसता. एकदां लग्न होऊन गेल्यावर जोरावर काय करतां ? "

" तसं कसं झालं असतं ? " खिन्नपणें हंसून हरपालदेव म्हणाले. " तिचा वाङ्निश्चय झालेला आहे हें आसपास सर्वांना माहीत असून आपण होऊन संकट कोण ओढून घेतं ? अजूनहि तसा शूरवीर पुढं येत असला तर मी त्याला राजकुंवर देईन. "

" राजकुंवरसाठीं इतकंहि साहस करायला कोणी क्षात्रिय वीर पुढं यऊं शकणार नाहीं ? आपले सर्वच क्षत्रिय आज नामशेष झाले असावेत असं मला वाटत नाहीं. " राजकुंवर सर्व गात्रें एकत्र करून पुढें ऐकूं लागली.

" पुष्कळ क्षत्रिय आहेतहि, पण जोरावराशीं सामना द्यायला सामर्थ्य आहे असा वीर पाहिजे ना! त्या विजयासिंहाला तसं सामर्थ्य असतं तर मी आनंदानं माझी राज त्याला द्यायला तयार झालों असतों, पण-" अर्धवट बोलून हरपालदेव पुढें म्हणाले. " हें पहा, आतां आपलं दुःख मनांत दाबून पुढील प्रसंगाशीं झुंजायला राजकुंवरला तयार केलं पाहिजे. आपल्या इच्छेसाठीं तरी तिनें जोरावराशीं विवाह करावा असं तिला कळवायचं, नाहीं तर ती ऐत्यावेळीं कांहीं तरी भलतंच करून बसायची. मला तीच मोठी भीति वाटते ! "

" हं ! " निश्वास सोडून राणी म्हणाली. ' शेवटीं हेंच तिच्या नशिबीं होतं ना ! "

" पहा, आतां कठोरपणा स्वीकारला पाहिजे. तूंच अशी हताश झाल्यावर आम्हीं काय करावं ? "

" महाराज, माझ्या राजला पाहिजे तर विष द्या, पण तिला यवनाला देऊं नका. परमारकुळाची आज इतकी अवनति झाली काय ? " राणी हात जोडून, डोळ्यांत आंसूं आणून म्हणाली.

" कमल, मला तुझी फार आशा होती. तूंच जर असं म्हणूं लागलीस तर काय करावं ? मला तरी ही गोष्ट मनापासून आवडते कां ? दुष्ट यवनांच्या बलापुढं खरोखरींच परमारकुळाची अवनति झाली आहे. " हरपालदेवाचा कंठ भरून आला. "आपली होणारी मानहानी आपण भोगली पाहिजे. राजकुंवर सुखी झाली म्हणजे झालं. तो तिला दुखविणार नाहीं. " हरपालदेव राणीच्या समाधानासाठीं म्हणाले. राणी कांहींच बोलली नाहीं, तिनें आपल्या नेत्रांतली आसवें टिपून काढलीं; अधिक वेळ थांबण्यांत अर्थ नाहीं, जें कळावयाचें तें कळून चुकलें असें स्वतःशीं म्हणून राजकुंवर आपल्या शयनखंडांत निघून गेली. तिच्या मनाची विलक्षण स्थिति झाली होती.

## प्रकरण २६ वें

# सुटलेला बाण

शयनखंडांत येऊन राजकुंवरनें मंचकावर अंग टाकलें व तिच्या नयनांतून एकसारखा अश्रुप्रवाह सुरू झाला. ती क्षणभरानें उठून एका खिडकीशीं बसली. बाहेर विश्वांत काळोख पसरला होता व तिच्याहि हृदयांत काळोख पसरला होता. आकाशांत चांदण्या चमचम करीत होत्या. जशी विश्वनिर्मित्यानें चोहींकडे बेदरकारीनें हिऱ्यांचीं फुलेंच उधळून टाकलीं आहेत असें वाटे. परंतु राजकुंवरच्या हृदयाकाशांतील फुलें करपून गेलीं होतीं. ती समोरच्या विंध्य पर्वताच्या काळ्या आकृतीकडे पाहूं लागली. जणूं काय तो मानवांकडे काळोखांतहि तुच्छतेनें पहात आहे, असें तिला वाटलें. चांदण्याच्या अस्पष्ट प्रकाशांत तिला दूर अंतरावर मांडवगडाचा भव्य तट अस्पष्ट दिसत होता. ती मनांत म्हणाली " आमच्या परमारांच्या कुळांत माझ्यासारखी दुसरी कोणी तरी दुर्दैवी राजकन्या होऊन गेली असेल का ? " रडून रडून तिच्या कमलनयनांत कमलाची रक्तिमा आली होती. ती क्षणोक्षणीं उष्ण सुस्कारे सोडी. जवळच्या चौरंगावरचें एक प्रफुल्लित सुंदर गुलाब पुष्प तिनें उचललें, त्याकडे क्षणभर पाहिलें व नंतर एक एक पाकळ्या ती खुडून टाकूं लागली.

" कुंवरबा, हें काय ? चांगलं फुल असं तोडून टाकतां?" चंदा आंत येऊन त्या खुडलेल्या पाकळ्यांकडे पाहून म्हणाली.

" चंदा, या फुलासारखीच आपली स्थिति आहे, नाहीं कां ? कोणी तरी यावें अन् असं चुरगळून टाकावं ! " ती दीर्घ निःश्वास सोडून म्हणाली.

" छे ! तसंच कांहीं नाहीं ! सुकुमार पुष्पाचा नाश करणारे सर्वच नसतात बरं ! पण कुंवरबा, मी ऐकलं तें खरंच कां ? "

" काय ? "

" जोरावराचं म्हणणं कबूल करायचं म्हणे ! "

" चंदा ! चंदा ! " म्हणून राजकुंवरनें आपली मान चंदाच्या खांद्यावर टाकली व ती जोरानें रडूं लागली. मातेच्या प्रेमळपणानें तिच्या पाठीवरून

हात फिरवीत चंदा म्हणाली " असं काय हें ? कुंवरबा, तुम्हीच असा धीर सोडून हताश होता ? "

" मग काय करूं ? चंदा, ज्या आईबापांच्या जिवावर जिवाचं जोखीम घालायचं, त्यांनाच जर जोखीम जड वाटूं लागलं तर कोणाची आशा करायची ?"

" हं ! यांतून कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे ! "

" काय काढणार ? चंदा, तुझी माझी ही आतां शेवटची भेट बरं ! एका बाटग्या यवनाची पत्नी म्हणून लज्जेनं खालीं मान घालून जगून मेल्यासारखा जीव जगविण्यापेक्षां, मी एक रजपूत बाला आहे हें जगाला दाखविण्याकरिता स्वाभिमानानं मरून अमर होणं चांगलं नव्हे कां ? यवनाला दिल्यामुळं मी माझ्या आईबापाला मेल्यासारखीच होणार ना, मग खरोखरींच आत्मत्याग करून जिवाचं सार्थक तरी का करून घेऊं नये ? मरून मरायचं मग जिवंतपणींच मरण कशाला अनुभवायचं ? चंदा, माझ्यामुळं माझ्या आईबापांवर आज केवढं मोठं संकट आलं आहे. स्वतःच्या मर्जीविरुद्ध त्यांना आपल्या पोटचा गोळा एका यवनाच्या स्वाधीन करावा लागणार आहे. सरदारापुढं त्याचं कांहींच चालत नाहीं असं दिसतं, मला जोरावरला देण्याचं नक्की ठरलं. सांग, मी आतां कोणाची करुणा भाकूं ? मला कोण सहाय्य करणार ? माझे दोघेहि भाऊ अज्ञान आहेत. चंदा, या अभागिनीला या संकटांत कोण मदत करणार ? माझ्या मरणानं माझ्या आईबापांला दुःख होईल, पण एकदांच दुःख झालेलं पतकरलं. जिवंत राहून जन्मभर दुःख अन् अपमान सोसण्यापेक्षा एकदांच सोक्षमोक्ष झालेला बरा नव्हे कां ? "

" कुंवरबा, मला सारी हकीकत तर सांगा. " नंतर आपल्या मातापित्याचा झालेला संवाद तिनें चंदाला सर्व सांगितला. चंदा क्षणभर विचार करून म्हणाली. " मला एक युक्ति सुचली आहे. "

" कोणती ! " आशेनें राजकुंवर म्हणाली.

" या संकटांतून ते विजयसिंह तुम्हाला सोडविणार नाहींत कां ? "

" चंदा, ते माझ्यासाठीं युद्धाला तयार आहेत. पण दुसऱ्या कोणालाच युद्ध नको तिथं ते एकटे काय करणार ? "

" आपण त्यांना विचारून तर पाहूं ? "

" काय विचारणार ? "

" महाराज काय म्हणाले वरं ? जर विजयसिंहाला तसं सामर्थ्य असतं तर मी माझी राज त्यांना दिली असती. असं महाराज म्हणाले, होय ना ? "

" होय. "

" मग तसं त्यांना विचारलं तर ? "

" काय म्हणतेस तूं ? "

" विययसिंहांनीं तुमचं पाणिग्रहण करून तुमचं रक्षण करावं. "

" पण तें शक्य आहे कां ? माझ्यासाठीं त्यांनीं भलतंच सहास करावं असं मला वाटत नाहीं. चंदा, मला आतां भगवान महाकालेश्वराच्याच चरणाचा आश्रय घेतला पाहिजे. " निराशेनें राजकुंवर म्हणाली.

" आपण प्रयत्न करून पाहूं. कुंवरबा, माझ्या सांगण्याप्रमाणं तुम्ही करून तर पहा ? "

" काय करूं ? "

" विजयसिंहाला एक पत्र लिहून द्या. "

" नको ग बाई." राजकुंवर कावरीबावरी होऊन म्हणाली " चंदा, अग तें म्हणतील तरी काय ? एका अपरिचित तरुणाला मी भलतीच कशी भीड घालूं ? माझ्यासाठींच त्यांनीं इतका यत्न केला त्याचा असा फायदा घेऊं होय ? ते मला निर्लज्ज नाहीं कां समजणार ? नको, नको, चंदा, असलं भलतंच साहस नाहीं उपयोगी."

" कुंवरबा, जिवावर येऊन बेतलं अशा वेळीं असल्या भलत्या शंकाकुशंका काढूं नका. अहो, आणीबाणीच्या वेळीं रजपुत तरुणींनीं किती तरी साहसी तरुणांचं सहाय्य मागून आपली अन् आपल्या कुळाची अब्रु बचावली हें तुम्हाला माहीत नाहीं कां ? विजयसिंहावर आपल्याला जबरदस्ती कां करायची आहे ? त्यांना सामर्थ्य असलं तर सहाय्य करायला कबूल होतील, नाहीं तर नाहीं म्हणतील. आपण प्रयत्न करून पहायचा आहे. माझी खात्री आहे ते दिसतात तसे नसावेत अन् त्यांच्या मदतीनं हें संकट टळेलहि ! "

" चंदा, त्यांना तसं सामर्थ्य असतं तर त्यांनीं पिताजींना अवश्य मदत केली असती. "

" कुंवरबा, कांहीं म्हणा, माझं मन मला सांगतंय याच विजयसिंहाच्या हातून तुमचं संकट टळणार आहे. तुम्ही एक पत्र लिहून द्या पाहूं ? " चंदा आग्रहपूर्वक म्हणाली. राजकुंवरचा निश्चय होईना. तिच्या मनांत असंख्य शंका-

कुशंका येऊं लागल्या. "आपण पत्र लिहलं तर ते मनांत काय म्हणतील? आपल्या या उद्धटपणाचा त्यांना तिटकारा वाटणार नाहीं कां?" जिवावर प्रसंग येऊन बेतल्यावर व सर्व तऱ्हेचा प्रयत्न हरल्यावरच मनुष्य प्राणार्पण करावयास तयार होतो. सहज गोष्टीला कोणी तसा प्राणघात करून घेत नाहीं. नाहीं तर सहज कारणासाठीं प्राण देणारे किती तरी मानवप्राणी नित्य आढळले असते. मग दुःख, संकट, अडचणी यांचें नांवच ऐकूं आलें नसतें.

"मग काय? कुंवरबा, देतां ना पत्र लिहून?" स्तब्ध बसलेल्या राजकुंवरला ती म्हणाली. "अन् असं बघा, त्यांत विजयसिंहाची आपल्याला परीक्षाहि करतां येईल."

"कसली ग?"

"तुमचं त्यांच्यावर जसं प्रेम जडलं आहे, तसं त्यांचंहि तुमच्यावर आहे कीं नाहीं हें नको का कळायला?"

"चल, चल. माझ्याबद्दल कोणां तुला सांगितलं?" तशाहि स्थितींत तिच्यां मुखावर स्मित झळकलें.

"कोण सांगायला पाहिजे? कुंवरबा, या गोष्टी मुखानंच सांगाव्या लागत नसतात बरं? मी म्हटल्याप्रमाणें सुदेवाचं काम करायला तयार आहे. या पाहूं तुमच्या श्रीकृष्णाला पत्र लिहून. मला द्वारकेला जाण्याचे श्रम पडणार नाहींत हो. उशीर कराल तर तो शिशुपाल उद्यां येऊन घेऊन जाईल बघा. पाहूं तर द्या या श्रीकृष्णाचं सामर्थ्य! उगाच नाहीं श्रीकृष्ण व्हायचं वाटेंवर पडलं!"

"चंदा, पुरे तुझी थट्टा. माझ्यावर प्राणसंकट येऊन पडलं अन् तुला आपली थट्टा सुचते."

"अहो, रुक्मिणीवरहि असंच प्राणसंकट आलं होतं बरं. संकटाशिवाय श्रीकृष्ण भेटतो वाटतं?" असें म्हणत चंदानें लेखनसाहित्य आणून राजकुंवरजवळ दिलें. नंतर दोघींच्या विचारानें बऱ्याच वेळानें एक पत्र लिहून तयार झालें. पत्राची नीट घडी घालून चंदा चंद्रसिंहाकडे जावयास निघाली. चंदा तेथून बाहेर जातांच राजकुंवरच्या हृदयांत विलक्षण धडधड सुरू झाली. आपण हें भलतेंच धाडस केले असें तिला वाटूं लागलें. एका परक्या पुरुषाला, आपल्या सारख्या अविवाहित तरुण स्त्रीनें पत्र लिहिणें म्हणजे निव्वळ मूर्खपणाच असें आतां वाटून तिची मोठी चमत्कारिक स्थिति झाली. चंदाजवळून पत्र

घेऊन फाडून टाकावें म्हणून तिनें चंदाला हाक सुद्धां मारली. परंतु चंदा केव्हांच पसार झाली होती. धडधडणाऱ्या: हृदयानें व थरथरणाऱ्या देहानें ती पलंगावर पडली व आपल्या हातांनीं तिनें आपलें मुख घट्ट झांकून घेतलें. आपल्या या धाडसाचा काय परिणाम होणार याची तिला धास्ती वाटूं लागली. बाण सुटून गेल्यावर परत हातांत कसा येणार! ती मोठ्या चिंतेंत पडली. चंदाच्या सांगण्यावरून आपण हें धाडस करावयाला नको होतें असें तिला आतां वाटूं लागलें.

## प्रकरण २७ वें

# आश्वासन

कुमार चंद्रसिंह एकटाच आपल्या शयनखंडांत होता. त्याच्या हृदयांत तुफान चाललें होतें. त्याच्या धनुष्याकृति भृकुटींचा क्षणांत संयोग होई तर क्षणात त्यांतून प्रखर क्रोधबाणांची वृष्टि होईल कीं काय असें वाटे. त्याच्या नाकपुड्यांतून जोरानें श्वासोच्छ्वास होत होता व हाताच्या मुठी आवळल्या जात होत्या. त्या खंडांत दोन समया मंदपणे तेवत होत्या व तो एकसारखा झरझर येरझारा घालीत असल्यामुळें त्या प्रकाशांत त्याची छाया त्याच्या बरोबर फिरत असून क्षणांत लांब अन् क्षणांत लहान अशी दिसत होती. थोडा वेळ फिरल्यानंतर तो एका गवाक्षाजवळ उभा राहिला. त्यानें आपले दोन्ही हात स्वस्तिकाकार हृदयावर ठेवले व तो राजमहालाकडे पाहूं लागला. राजमहालाच्या गवाक्षांतून दिव्याचा मंद मंद प्रकाश दिसत होता. त्यानें वर आकाशाकडे पाहिलें, असंख्य तारका प्रकाशल्या होत्या. अहेरियाच्या दिवशीं राजवाड्याच्या दरवाज्यावरील गवाक्षांत दोन तेजस्वी तारकांचें दर्शन झालें तो दिवस त्याला आठवला. " जिच्या नेत्रांत तारकांचें स्निग्ध तेज प्रतिबिंबित झालें आहे, तिचें हृदय कसें असेल ? " तो मनाशींच विचार करूं लागला.

" हरपालदेव इतके भीरु असतील असं मला वाटलं नव्हतं. आपल्या मुर्दाड भेकड सरदारांच्या म्हणण्याला मान देऊन आपली कन्या नव्हे अन्न एका यवनाला देणार अं ! हतभागिनी राजकन्ये, अशा राजाच्या पोटीं न येतां तूं एखाद्या भिकाऱ्याच्या पोटीं आली असतीस तरी तूं सुखी झाली असतीस, हं ! " दीर्घश्वास सोडून त्यानें जोरानें मुठी आवळल्या.

" एकंदरींत या सरदारांना आपल्या राजाच्या अब्रूपेक्षां स्वतःचा जीव अधिक प्यारा आहे हें सिद्ध होतें. पण या राजाला कसं कांहीं वाटत नाहीं ? संग्रामानें मला सांगितलं होतं कीं जीव देईन पण यवनाशीं विवाह करणार नाहीं असा राजकन्येचा निर्धार आहे मग तिला जबरदस्तीनंच हे जोरावरला देणार काय ? माझ्याकडून मी पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, पण मी पडलों त्रयस्थ अधिक काय करूं शकणार ? माझ्यासारख्या तरुणानं अविवाहित तरुण राजकन्येचा पक्ष घेऊन सर्वांच्या विरुद्ध जाणं योग्य दिसेल कां ? हें संकट मला टाळतां येईल कां ? " तो क्षणभर विचारांत मग्न झाला.

" हं. असंच केलं तर ! पुनः तो स्वतःशींच म्हणूं लागला. " ज्याच्या अंगीं पुरुषार्थ असेल, ज्याला तिचें रक्षण करतां येईल असा एखादा रजपूत शूर वीर पुढं आल्यास आपण आनंदानें तिचं त्याच्याशीं पाणिग्रहण करूं " असं हरपालदेव मला म्हणाले होते. माझ्या बाहुबळावर तिचं रक्षण करतां येणार नाहीं कां ! आज चितोडचं साहाय्य मला मिळण्यासारखं असतं तर मी केव्हांच राजाची या संकटांतून मुक्तता केली असती. पण आतां चितोडचा अन् माझा संबंध काय ? मी कधींच मदत मागणार नाहीं. हरपालदेव, खरोखरींच तूं अगदीं मूर्ख आहेस. स्वतःच्या कन्येची अब्रू तुला रक्षण करता येऊं नये ! मला पांचपन्नास लोक मिळाले तरी त्या जोरावरला चितोडच्या रक्तांत किती शक्ति असते हें दाखविलं असतं. अन् त्या दोलतसिंगादि भेकड सरदारांनाहि कळलं असतं. पुनः उद्यां प्रयत्न करून पाहावा. थोडंसं सैन्य हरपालदेव माझ्या मदतीला द्यायला तयार असले तर माझ्या जिवांत जीव असेपर्यंत राजकुंवरचं रक्षण करीन. राजकुंवर, तुझ्यासारख्या रमणीरत्नाचं रक्षण करण्याचं सामर्थ्य आम्हा पुरुषांत नसलं तर आम्हाला आम्ही षंढच म्हणवून घेतलं पाहिजे ! तसाच प्रसंग आला तर माझ्या एकट्याच्या हिंमतीवर मी तुझं पाणिग्रहण करून त्या जोरावरशीं भीडायला सिद्ध होईन, नंतर आपला विवाह स्वर्गात— "

इतक्यांत मानसिंग आंत आला व प्रणाम करून म्हणाला. " कुमारसाहेब, एक स्त्री आपल्याला भेटायला आली आहे. "

" एक स्त्री ! " आश्चर्यानें तो उद्गारला. " अशा वेळीं मला भेटायला कोण स्त्री आली ? छे ! तुझी कांहीं तरी चूक होत असेल. ती चुकून इकडे आली असेल नाहीं तर. "

" नाहीं. तिला आपलीच भेट घ्यायची आहे."

" हें पहा, अशा रात्रीं मी परक्या स्त्रियांची भेट घेत नसतों. तिचा काय निरोप असेल तो घेऊन ये जा."

" मी तसंहि तिला सांगितलं पण ती ऐकत नाहीं. आपल्यालाच काय तें सांगणार आहे व काम महत्त्वाचं आहे असं तिचं म्हणणं आहे. आपली भेट घेतल्याशिवाय जाणार नाहीं असं ती म्हणते."

" अशी ही स्त्री कोण ?" मोठ्यानें पण स्वतःशींच कुमार बोलला. " बरं जा घेऊन ये तिला, म्हणावं झटपट सांगून जा."

" जी हुकुम." म्हणून मानसिंग गेला व बुरखा पांघरलेल्या एका स्त्रीला आंत घेऊन आला. तिच्याकडे पाहून कुमार म्हणाला. " तुमचं काय काम आहे ? झटकन् सांगून टाका."

" महाराज, मी सांगेन तें कोणी ऐकणार तर नाहीं ?"

" नाहीं. जें सांगायचं असेल तें खुशाल सांगा." खिडकीच्या तावदानावर कोंपर टेकून कुमार म्हणाला. ही कोण हें त्याला कळेना.

" महाराज, आपल्या मदतीची आम्हाला जरूर लागली आहे म्हणून मी आपल्याकडे आलें. माझी एक मैत्रीण प्राणसंकटांत पडली आहे. तिचं रक्षण आपण कराल कां ?"

" संकट कोणतं हें कळल्याशिवाय मी काय सांगूं ? माझ्यानं होईल ती मदत मी आनंदानं करीन. पण हें पहा, मी इथं नुकताच आलों आहे असं असतां दुसऱ्या कोणाची मदत न मागतां माझ्याकडेच तुम्ही कां आलांत, माझी मदत तुम्हाला पुरेशी होईल कां ?"

" चोहींकडे निराशा दिसली म्हणून आपल्याकडे धांव घेतली. आपण आमचं संकट निवारण करूं शकाल अशी खात्री वाटली. कुमार." तिनें शब्दांवर मुद्दाम जोर दिला. " कुमार, आपण मदत कराल ना ?"

तिच्या तोंडचें ' कुमार ' ऐकून चंद्रसिंहाला जरा चमत्कारिक वाटलें. ही स्त्री आहे तरी कोण याचा त्याला कांहींच बोध होईना. " मी एक सामान्य सरदार आहे, मला तुम्ही कुमार म्हणूं नका." तो म्हणाला. पण ती स्त्री हंसते आहे असें त्याला वाटलें. " तुमच्या मैत्रिणीवर कसलं संकट आलं आहे, मला सांगाल तर बरं होईल." तो शांतपणें म्हणाला. त्या स्त्रीनें झटकन् आपला बुरखा काढून घेतला व ती त्याच्याकडे धीटपणानें पाहूं लागली.

" कुमार. " पुनः जोरानेंच ती म्हणाली. " आपला नोकर आपल्याला कुमार म्हणतो मग मला म्हणायला काय हरकत आहे ? मी राजवाड्यांतून आलें आहे. आमचं एवढं संकट आपण निवारा म्हणजे झालं. "

" राजवाड्यांतून आलांत ? " तो आश्चर्यानें म्हणाला.

" हो. माझं नांव चंदा. मी राजकुंवरकडून आलें आहे. " ती चंद्रसिंहाकडे निर्भयपणें टक लावून पहात होती.

" राजकन्येकडून ? " त्याला अधिकच आश्चर्यचकित पाहून चंदा हंसूं लागली.

" हो. मी राजकन्येची सखी आहे. "

" हं. "

" कुमार, माझ्या सखीवरील संकट दूर करायला कोणीच पुढं होत नाहीं. दरबारच्या साऱ्या सरदारांनीं हातांत चुडे भरले आहेत. फक्त वीराला शोभेल असं वर्तन आपणंच केलंत म्हणून आपल्याकडेच मदत मागायला मी आलें. मी आपल्याकडे आलें म्हणून राजकन्येविषयीं आपला भलताच ग्रह तर होणार नाहीं ? स्त्रियांची अब्रू रक्षण करणं हें वीरपुरुषाचं कर्तव्य नाहीं कां ? "

" होय. तुमचं म्हणणं बरोबर आहे. अन् राजकन्येनं माझ्या मदतीची अपेक्षा केली यांत मला धन्यताच वाटते. चंदा, राजकन्येला म्हणावं शक्य तो उपाय मी करून पाहिला पण जिथें राजा हरपालदेव संग्रामाला तयार नाहींत तिथं मी एकटा काय करणार ? जिथं सर्व दरबारी एका बाजूला, तिथं मी परका मनुष्य काय करूं शकणार ? "

" मग कांहींच उपाय नाहीं तर ? " हताश होऊन चंदा म्हणाली. " मी केवढ्या आशेनें आपल्याकडे आलें होतें. कुमार, आपण निधड्या छातीचे आहांत व आपणच माझ्या सखीला मदत करूं शकाल असं आम्हाला वाटत होतं. राजकन्येनं आपल्याला एक पत्रहि लिहून दिलं आहे. आपण एकदां वाचून पहा. " असें म्हणून चंदानें आपल्या जवळचें पत्र चंद्रसिंहापुढें टाकलें. चंद्रसिंहानें तें उचलून समईच्या मंद प्रकाशांत वाचलें. चंदा त्याच्या धीर-गंभीर मुद्रेकडे पहात होती. पत्र वाचीत असतां त्याच्या मुखावर क्षणोक्षणीं भाव बदलत होते.

" क्षत्रियवीर चूडामणी,

" माझ्या या धाडसाबद्दल आपण मला दूषण द्याल. परंतु रजपुतरमणीला प्राणापेक्षांहि आपली अब्रू प्रिय असते हें सांगायला नको. महाराज, आपण वीरवर आहांत. माझ्यावर भयंकर प्रसंग आला आहे, माझ्या पिताजींचं त्यांच्या भेकड सरदारांपुढं कांहीं चालत नाहीं, म्हणून मला यवनाच्या अंतःपुरांत जाण्याचा प्रसंग येणार आहे. या प्राणसंकटांतून माझं रक्षण फक्त प्राणदंडानंच होऊं शकेल अथवा कोणी तरी वीरपुरुष आपल्या बाहुबळानं जर मला सोडवील तरच यांतून माझी सुटका होईल. नाहीं तर भगवान् महाकालेश्वरची मर्जी! आपल्या मदतीची याचना केल्याबद्दल कदाचित् आपण मला मूर्ख म्हणाल; दरबारांत फक्त आपणच वीरोचित भाषण केलं म्हणून आपल्याच मदतीची अपेक्षा करीत आहे. भावी अनर्थांतून माझी सुटका करूं शकाल कां? महाराज, ही गोष्ट अशक्य असल्यास आपण मुद्दाम आपल्या अंगावर ओझं घेऊं नये. माझ्यासाठीं एका तरी वीराला कळकळ वाटते यांनच मला समाधान वाटेल. शक्य नसल्यास माझ्यासाठीं भलतंच साहस करूं नये."

'राजकुंवर'

पत्राची घडी घालून चंद्रसिंह म्हणाला, "चंदा, जा. राजकन्येला सांगा म्हणावं भिऊं नका! जा. म्हणावं जोंपर्यंत माझ्या हातांत तलवार धरण्याचं सामर्थ्य आहे, माझ्या बाहूंत शक्ति आहे, शरीरात रक्ताचा एक थेंब आहे, तोंपर्यंत राजकुंवरला यवनाला देऊं देणार नाहीं. उद्यां हरपालदेवाला निक्षून सांगतों. त्यांनीं नाहींच ऐकलं तर राजकन्येचं पाणिग्रहण करून एकटा समरांगणांत उडी घेईन. एका रजपुत बालेनं यवनांच्या अंतःपुरांत जाणं म्हणजे रजपुतांना केवढा काळिमा! जा. राजकन्येला म्हणावं पाणिग्रहण अन् अग्निप्रवेश याची तयारी असूं दे. कारण असंख्य शत्रूंपुढं माझा जोर कितीसा चालणार आहे? तरीपण देहांत प्राण असेपर्यंत मी झुंजेन, राजदुर्गाचे सरदार नामर्द असतील; पण आमचें चितोड—" त्यानें एकदम जीभ चावली व तो भानावर आला. चंदा फार चतुर होती. चंद्रसिंहाचा तो आवेश पाहून तिला फार हर्ष झाला. आपल्या राजकन्येचें संकट टळलेंच असें तिला वाटूं लागलें. चंद्रसिंहाच्या शेवटच्या अर्ध्या वाक्यानें तिला पूर्वी आलेली शंका दृढ झाली. ती प्रफुल्लित अंतःकरणानें आपल्या सखीकडे जावयास निघाली.

" बरं आहे. मी जाऊन राजकुंवरला धीर देते. आपण तिचं रक्षण करूं शकालच अशी माझी खात्री आहे. भगवान् महाकालेश्वर आपल्याला खात्रीनं यश देईल."

" पाहूं काय होतं तें." चंदा निघून गेली व चंद्रसिंह खिडकींतून राजवाड्याकडे विमनस्कतेनें पहात तेथेंच उभा राहिला व विचारांत व्यग्र झाला।

## प्रकरण २८ वें

# पुढील योजना

" कुमार, कुमार." परिचित माणसाकडून हांक ऐकतांच चंद्रसिंहानें आश्चर्यानें मागें वळून पाहिलें. संग्रामाला समोर उभा पाहून त्याच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं! संग्राम दमलेला दिसत होता. प्रवासाचे कपडे अद्याप त्याच्या अंगावर होते. चंदा गेली व घटकाभरानें तो आंत आला.

" संग्राम, असा एकदम आलास, आठच दिवस तुला जाऊन झाले ना?"

" कुमार, राणीसाहेबांनीं आपल्याला बोलावलं आहे म्हणून तांतडीनें आलों."

" मला? काय म्हणून?"

आपल्या मदतीची राणीसाहेबांना जरूर लागली. बाल राणाजींचा जीव धोक्यांत आहे. त्यांना या संकटांतून आपल्याशिवाय कोण सोडविणार?"

" काय म्हणतोस? मुकुलजीवर संकट? कसलं संकट? चितोडचे सरदार सामंत काय करतात?"

कुमार, चितोडची स्थिति फार चमत्कारिक झाली आहे. आपल्या सरदाराच्या हातीं कसलीच सत्ता राहिली नाहीं, ते बलहीन बनले आहेत. तोंडपुजांचं चांगलं फावलं आहे व ज्यांना चितोडची कळकळ आहे ते जागच्याजागीं हातपाय चोळीत बसले आहेत. परक्यांचा जोर बळावला आहे, बिचाऱ्या स्वतः राणीसाहेबच दीन बनल्या आहेत."

" म्हणजे? आहे तरी काय हें? संग्राम, सारं नीट सांग पाहूं?" अधीरपणें चंद्रसिंह म्हणाला. तो एका मंचकावर बसला व जवळ संग्रामाला बसवून घेतलें. नंतर चितोडांत घडलेला अन् घडत असलेला सर्व वृत्तांत त्यानें चंद्रसिं-

हाला सांगितला. राणीला व मुकुलजीला राजवाड्यांत कसें कैद करून ठेवलें आहे, बहुतेक सरदारांना आपल्या पक्षाला अनुकूल करून घेतले आहेत, मारवाड्यांचा जिकडे तिकडे कसा मुळसुळाट झालेला आहे, मोठ्या हुद्याच्या जागीं त्यांचे मारवाडी असून, चितोडचे सरदार नाममात्र आहेत. तसेंच रणमल्लानें त्याला भुयारांत कसें टाकलें व नंतर जसूकडून झालेली सुटका, राणीसाहेबांची मदतीची याचना वगैरे सांगून संग्रामानें राणीचें पत्र चंद्रसिंहाला दिलें.

चंद्रसिंहानें घाईघाईनें पत्र वाचलें. त्याच्या मुखावर भयंकर संताप दिसूं लागला. त्यानें त्वेषानें आपलें दांत ओठावर दाबले. " संग्राम, त्या दुरात्म्या रणमल्लानें चितोडांत असा धुमाकूळ माजविला आहे काय? त्याला काय वाटतं, चितोड असहाय आहे? राणाजी अर्भक आहेत म्हणून मी चितोडचा धनी होईन? संग्राम, इतकं सर्व होईपर्यंत चितोडचे सरदार गाढ निद्रासुख घेत आहेत कां चैनबाजींत मग्न झाले आहेत? धिःकार! धिःकार असो त्यांना! आपली सत्ता, आपलं स्वातंत्र्य स्वहस्तानं गमावून मरणोन्मुख होऊं पहाणाऱ्यांना शतशः धिःकार असो! सर्वच नामर्द होऊन परक्यांचं जूं लादून घ्यायला तयार झालेत काय? आपल्या राणाजीच्या संरक्षणाची कोणालाच काळजी नाहीं कां? "

" कुमार, रामसिंह करणसिंहासारखे चार दोन सरदार चितोडच्या रक्षणासाठीं खटपट करीत आहेत. पण इतर बहुतेक रणमल्लाची आज्ञा झेलून त्याचं दास्यत्व पत्करून आपलं हित साधूं पहात आहेत. तेव्हां हे थोडे लोक काय करूं शकणार? राणीसाहेबच जिथं बंदिवान झाल्यात तिथं दुसऱ्यांचा काय पाड? "

" राणीसाहेब! राणीसाहेब, आपण होऊन आपल्या हातांनीं हा अग्नि पेटवून घेतला आहे! दुष्ट रणमल्ला, आजच शिसोदिया कुळ नामशेष झालं नाहीं! " चंद्रसिंह भयंकर संतापला होता. परक्याच्या हातीं आपला स्वतंत्र देश जावा हा विचारच त्याला सहन होऊं शकत नव्हता. बाप्पा रावळाचा वंश परतंत्र! किती अपमानकारक हा विचार! त्यानें जोरानें हाताच्या मुठी वळवल्या. त्याच्या नेत्रांतून अग्निच बाहेर पडतो कीं काय असें वाटूं लागलें! जोरानें ओठावर ओठ दाबून तो क्षणभर उभा राहिला. " चल, संग्राम, चल. आतां जाऊन त्या रणमल्लाची रणमस्ती जिरवतो. चितोडचे सर्व लोक गुलाम नाहींत हें त्याला दाखवितों. चितोडचा राणा बालक असला तरी

अनाथ नाहीं हें त्याच्या प्रत्ययाला आणून देतों. त्याची ती गंगाजमनी दाढी उपटून त्याच्या हातांत देईन तेव्हांच माझ्या जिवाला शांति वाटेल. माझा मेवाड परक्यांच्या अमलाखालीं रहाणार; शक्य तरी आहे कां? चितोडचें पवित्र सिंहासन पाप्याच्या स्पर्शानें अपवित्र होणार नाहीं. कधीं नाहीं! संग्राम, चल, माझा पुष्कर तयार करायला सांग. आतां उशीर नको. मी चितोडांत जन्मांत पुनः पाय दिला नसता, परंतु राणीसाहेबांनीं बोलावलं आहे, चितोडचं व राणाजीचं रक्षण मला केलंच पाहिजे. माझं तें कर्तव्यच आहे. पिताजीला मी वचन दिलेलं आहे व माझ्या स्वदेशासाठीं मला क्षणाचाहि विलंब न करतां धावून गेलंच पाहिजे." तो आवेशानें उभा राहिला. त्याचा हात धरून संग्राम म्हणाला. "कुमार, अशी घाई करून उपयोग नाहीं. कारण इकडे येण्यापूर्वीं मी प्रथम रामसिंगांनाच भेटलों. मंदोरहून पुष्कळ सैन्य घेऊन जोधराव चितोडला एकदोन दिवसांत येऊन पोंचेल. राणाजी व राणीसाहेब रणमल्लाच्या ताब्यांत आहेत. आपण जर घाईनें गेलों तर त्यांच्या जिवावर प्रसंग येईल. युक्तिप्रयुक्तीनं प्रथम राणाजीला चितोडच्या बाहेर काढलं पाहिजे, असं रामसिंगजींचं म्हणणं आहे. कारण पुष्कळ लोक रणमल्लाच्या बाजूला असल्यामुळं चितोडांत आपला जोर तितका चालूं शकणार नाहीं. राणाजी एकदां चितोडच्या बाहेर सुरक्षित सुटले कीं जिंकलं! कारण प्रत्येक दरवाज्यावर मारवाड्यांचा कडक पहारा आहे. जिवाला जीव देणारे असे रामसिंगाजवळ दोनशें जवान आहेत. आपण गुप्त रीतीनं चितोडांत प्रवेश करून घेऊं. रामसिंग—करणसिंग वगैरे आपणांस सहाय्य करतील. ते आपल्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत आहेत."

"होय. तूं म्हणतोस तेंहि खरं दिसतं." चंद्रसिंह विचारपूर्वक म्हणाला. "एकदम गेलों तर परिणाम चांगला होणार नाहीं! तो नरपशु प्रत्यक्ष आपल्या नातवाचासुद्धां घात करील! म्हणून सावधगिरीनंच कार्य केलं पाहिजे राणाजीला चितोडाबाहेर कसा काढायचा?"

"कुमार, आपल्या कुलाचाराप्रमाणें येत्या कार्तिकी पौर्णिमेला गोमुंडाच्या देवांच्या दर्शनाला महाराणाजीला गेलं पाहिजे. तेव्हां दर्शनाच्या निमित्तानं महाराणीनं बालराण्याला घेऊन चितोडाबाहेर पडावं. रणमल्लाला ती गोष्ट कबूल करावी लागेल. कुलाचाराप्रमाणें केलंच पाहिजे असं त्याला सांगितलं पाहिजे. आपण इकडून चितोडाबाहेर जाऊन राणाजीला हस्तगत करून घेऊं

त्यांना सुरक्षित जागीं ठेवून नंतर चितोडांत गुप्तपणें प्रवेश करून घेऊं. रामसिंग आपल्या मदतीला सिद्ध आहेतच." चंद्रसिंहाला संग्रामचा बेत पसंत पडला. त्याला आतां बरेंच समाधान वाटूं लागलें.

" संग्राम, तुझं म्हणणंच सयुक्तिक आहे. इकडेहि मला दुसरं एक कार्य करायचं आहे. राजकन्येनंहि माझी मदत मागितली आहे." नंतर चंद्रसिंहानें राजदुर्गांत घडलेली सर्व हकीकत व चंदा येऊन गेल्याचें वर्तमान त्याला सांगितलें " संग्राम, विवाह करून बाप्पाजीच्या वचनांतून मला मुक्त व्हायचं आहेच व या संकटांतून राजकुंवरला सोडविण्याला दुसरा मार्ग नाहीं! आतां मला माझं खरं नांव सांगायला हरकत नाहीं. मी आतां या भेकड राजदुर्गाच्या सरदारांना भीत नाहीं. माझ्या एकट्याच्या बाहुबलावर राजकुंवरचं रक्षण करीन अन् चितोडचे शूरवीर माझ्याबरोबर समरांगणांत बेधडक उड्या घेतील."

संग्रामाला आनंद झाला व तो हर्षनिर्भर स्वरानें म्हणाला, " कुमार, राजकुंवरच्या रक्षणाला आपण पुढं निघाल्यावर चितोडचे वीर आपल्या पाठीशीं क्षणार्धांत येतीलच यांत संशय नाहीं. भगवान् एकलिंगजीची करणी अगाध आहे. राणाजींचं व राजकुमारींचं संरक्षण आपल्या हातून होऊन आपला पराक्रम व धैर्य सर्वांच्या निदर्शनाला यावं अशी त्याची इच्छा दिसते."

" संग्राम, आतांच माझीं स्तुतिस्तोत्रं गाऊं नकोस. माझ्या हातून कार्य घडूं दे, मग मला धन्यवाद द्यायचे असतील तितके दे." चंद्रसिंह किंचित् स्मित करून म्हणाला.

" आपण निरपेक्ष कार्य करणार मग त्यांत सिद्धि मिळणारच." संग्राम म्हणाला.

" होय. हीं दोन्हीं कार्यें निरपेक्ष बुद्धीनें मी करणार आहे असें तुझें म्हणणें आहे काय?" संग्रामकडे सहास्य मुद्रेनें पहात चंद्रसिंह म्हणाला. आपल्या आवडत्या कुमाराच्या गंभीर मुखावर आज आनंदाचें हास्य पाहून संग्रामसिंहाला मनापासून हर्ष होत होता. दोन्हीकडून आलेल्या संकटांत चंद्रसिंहाला अपूर्व उत्साह वाटत होता, व त्यामुळें संग्रामाच्या हृदयांत नुसत्या आनंदोर्मी उसळल्या होत्या.

" एक कार्य तर आपण निरपेक्ष बुद्धीनंच करणार ना. दुसऱ्यांत मात्र-" अर्धेंच बोलून संग्राम हंसूं लागला.

" माझा स्वार्थ आहे. असं तूं म्हणणार ना ? होय. संग्राम अहेरियाच्या दिवशीं राजकुंवरचें ओझरतें दर्शन झाल्यापासून त्या पवित्र राजकुमारीनें माझ्या नेत्रांचं सार्थक केलं आहे. संग्राम, सुंदर स्त्रियांच्या मोहांत मी सहसा सांपडणार नाहीं असा मला गर्व होता, तो ते दिवशींच मावळला ! "

" एकंदरींत राजदुर्गांत येऊन आपला तोटा न होतां लाभच झाला म्हटलं पाहिजे. " थट्टेच्या स्वरानें संग्राम म्हणाला.

" अरे, अद्याप पण जिंकायचा आहे ! "

" त्यांत मोठंसं कांहीं नाहीं. शिशुपालवध करून आपण आपल्या रुक्मिणीस लवकर चितोड द्वारकापुरींत गृहप्रवेश कराल. " संग्राम पुन: हंसून बोलला.

" होय. इकडे शिशुपालवध करून तिकडे रणमल्ल बोकडाचा बळी देऊनच मी नगरप्रवेश करणार आहे." चंद्रसिंह उल्हासानें म्हणाला. प्रवासामुळें संग्राम दमून गेला होता तरी त्याला विलक्षण उत्साह वाटूं लागला. चंद्रसिंहानें त्याला रात्रभर विश्रांती घ्यावयास सांगितलें व पहांटेसच त्यानें चितोडकडे जावें असें ठरलें.

संग्रामानें गुप्त मार्गानें राजवाड्यांत जाऊन राणीला व बालराणाजीला देवीच्या दर्शनाच्या निमित्तानें चितोडबाहेर पडावें म्हणून सांगावें. संग्रामनेंहि गुप्त वेषानें त्यांच्या बरोबर माळव्याच्या मार्गाकडेच असलेल्या गोमुंडा नांवाच्या गांवीं गोमुंडा देवीच्या दर्शनाला यावें व चंद्रसिंहानें इकडून जाऊन त्यांना भेटावें असा बेत ठरला. प्रतिवर्षी कार्तिकी पौर्णिमेला गोमुंडा देवीचा उत्सव मोठ्या थाटानें होत असे आणि दर्शनाला राजपुरुष व स्त्रिया जाण्याचा परिपाठ होता. ही संधि उत्तम आहे असें जाणून त्याच संधीचा फायदा करून घेण्याचें ठरलें. एकदां मुकुलजी चितोडहून सुटल्यावर मग रणमल्लाची भीति नव्हती.

संग्राम गेल्यावर चंद्रसिंह आपल्या पलंगावर पडला व किती तरी वेळ विचार करीत राहिला. त्याच्या अंतःकरणांत नानातऱ्हेचे विचार चालले होते.

## प्रकरण २९ वें

# मागणी

ठरल्याप्रमाणें पहांटेस संग्रामसिंह पुनः चितोडाकडे जावयास निघाला. चितोडला पोंचतांच राणीसाहेबांना भेटून धीर द्यावयाचा म्हणून तो जलदीनें दौड करीत होता. आपला प्रिय चंद्रसिंह परत मेवाडांत येईल, या आशेनें त्याला विलक्षण उत्साह वाटत होता. ज्या राणीनें त्याचा अपमान केला, तिलाच आतां त्याच्या मदतीची जरूर लागली होती.

संग्राम गेल्यानंतर उजाडण्याची वाट पहात चंद्रसिंह पलंगावर पडून राहिला. उजाडतांच हरपालदेवाला भेटावयाचें म्हणून तो उतावीळ झाला होता,

इकडे सबंध रात्र निद्रा न आल्यामुळें हरपालदेव नित्यापेक्षां लवकर उठून प्रातर्विधि आटोपून आपल्या शेलक्या मंडळींस यावयास निरोप पाठवून त्यांची वाट पहात बसले. त्यांच्या मनाची फार चमत्कारिक स्थिति झाली होती. आपल्या लाडक्या कन्येचा आपण बळी देत आहोंत असेंच त्यांना वाटत होतें. कदाचित् आपला हा भेकडपणा न आवडून ती आपल्या जिवाचें कांहीं तरी बरेंवाईट करून घेईल अशीहि त्यांना भीति वाटत होती. हें संकट टळायला एकच मार्ग होता व तो म्हणजे एखाद्या बलाढ्य शूर वीरानें तिचें पाणिग्रहण करणें हाच होय व तें आतां अशक्य होतें. मंडळी जमतांच हरपालदेव म्हणाले, " आजचा शेवटचा दिवस आहे, तेव्हां जोरावरला आज उत्तर धाडलेंच पाहिजे. सरदारहो, मग सर्वांचा अखेरचा निकाल एकदां सांगून टाका, "

" महाराज, जोरावरचं म्हणणं आपल्याला मान्य केलंच पाहिजे. दुसरा इलाज नाहीं. " दौलतसिंग म्हणाला.

" अजूनही एखादा उपाय निघत असल्यास पहा. " चंद्रसिंह म्हणाला.

" विजयसिंह, तुम्हींच काढा ना मग कांहीं उपाय ? " दौलतसिंग जरा चिडूनच म्हणाला. प्रथमपासूनच चंद्रसिंहाच्या विरुद्ध तो बोलत असे.

" माझा मार्ग तुम्हां लोकांना पसंत नाहीं. नाहीं तर लढाईशिवाय राजकन्या त्याला कधींहि मिळणार नाहीं. "

" तुम्हां तरुण लोकांना मागचापुढचा तितका पोंच नसतो. एकदम लढाईंत उडी घ्यायची इतकंच तुम्हाला ठाऊक आहे. मग सर्वांचा कुलक्षय

झाला तरी चालेल. विजयसिंह, जोरावरशीं लढाई करणं तितकं सोपं नाहीं. तुम्हाला मोठी घमेंड आहे, पण त्याच्यापुढं तुम्ही म्हणजे ' दर्यामें खसखस ' हें लक्षांत ठेवा. " दोलतसिंग उपहासानें म्हणाला त्यामुळें चंद्रसिंहाला त्याच्या बोलण्याचा राग आला.

" दोलतसिंगजी, त्या जोरावरची कशाला एवढी बढाई मारतां, महाराज आज्ञा देतील तर मी एकटा त्याच्याशीं लढायला तयार आहे. शत्रूची स्तुति करणं तुम्हाला बरं दिसत नाहीं. "

दोलतसिंग एकदम खवळून म्हणाला. " काय म्हणतां पुनः म्हणा. विजयसिंह, कोणाला बोलतां तुम्ही ? तुम्हाला तुमच्या पराक्रमाची घमेंड असेल, म्हणून आम्हाला नामर्द समजतां कीं काय ! आमच्या सर्वांचा कुलक्षय झाला तरी त्याचं तुमच्या सारख्यांना काय ! " दोलतसिंगाचा हात तलवारीकडे गेला. त्याच्या जवळ वीरसिंह बसला होता, त्यानें त्याचा हात घट्ट धरून ठेवला.

" दोलतसिंगजी, असें वर्दळीवर येऊं नका. " चंद्रसिंह दोलतसिंगाकडे फक्त तुच्छतेनें पाहून हरपालदेवास म्हणाला, " महाराज, कांहीं झालं तरी रजपुतकन्या यवनाच्या अंतःपुरात जातां कामा नये. माझ्या जिवांत जीव असेंपर्यंत मी ही गोट होऊं देणार नाहीं. "

" कोणच्या हक्कानें म्हणतां तुम्ही ? " दोलतसिंग पुनः उसळून म्हणाला.

" मी तुम्हाला विचारीत नाहीं. " चंद्रसिंह त्याच्याकडे तिरस्कारानें पाहून म्हणाला. " महाराज,आपण मला पाचपन्नासच लोक द्या, तितक्या लोकांनिशीं मी जोरावरला सामना द्यायला तयार आहे. त्याच्या मारख्या बाटग्याला खऱ्या रजपुताचं पाणी दाखवीन, तोंपर्यंत राजकन्या त्याला आपण देऊं नये."

" तर,तर. हेच खरे रजपुत." उपसाहानें दोलतसिंग वीरसिंहाला म्हणाला.

" दोलतसिंग, तुम्ही जरा ऐका. " मग चंद्रसिंहाला राजा म्हणाला. " विजयसिंह, इतक्या लोकांनिशीं लढणं म्हणजे मूर्खपणा होय. आमचं सर्व सैन्य त्याच्या पुढं कुचकामाचं ठरणार आहे. "

" तुम्हीच काय ते रजपुत अन् आम्ही नाहीं असं तुम्हाला वाटतं. विजयसिंह, आम्हालाहि आमचा अभिमान आहे, पण असा तुमच्यासारखा भलताच दुरभिमान नाहीं.लढाई करायची तर केसरिया करूनच गेलं पाहिजे." पुनः दोलतसिंग म्हणाला.

चंद्रसिंहानें कपाळाला आंठ्या घालून त्याच्याकडे पाहिलें. "दौलतसिंगजी, रजपुत संग्रामावर जातात तेव्हां मरूं किंवा मारूं या भावनेनेंच जातात."

"तुमचा जीव तुम्हाला नकोसा झाला असला तर खुशाल जा." दौलतसिंग म्हणाला.

"दौलतसिंगजी." गर्जून चंद्रसिंह म्हणाला व त्यानें आपल्या तलवारीला हात घातला. येथेंच दोघांचें युद्ध जुंपणार हें पाहून स्वतः राजा हरपालदेव पुढें झाला व त्यानें चंद्रसिंहाचा हात धरला. "हं हं, विजयसिंह, असे हातघाईवर येऊं नका."

चंद्रसिंहाला दौलतसिंगाचा विलक्षण संताप आला होता. तो गर्जून म्हणाला, "दौलतसिंगजी, तुम्ही माझा जो उपहास करतां त्याचं उसनं घ्यायला मी समर्थ आहें, पण महाराजांच्यासाठीं मी माघार घेतों." दौलतसिंगहि उठणार होता परंतु वीरसिंहानें त्याला घट्ट धरून ठेवला होता. चंद्रसिंह हरपालदेवाकडे वळून म्हणाला. "महाराज, एखादा शूरवीर पुढं येऊन जर राजकन्येला मागणी घालून तिचं पाणिग्रहण करील तरच हें संकट टळेल असं आपण काल म्हणाला होतात व दौलतसिंगहि आतांच म्हणाले कीं, 'कोणत्या हक्कानें तुम्ही असं म्हणतां' तर या सर्वांसमक्ष मी राजकन्येच्या हाताची मागणी करून असं सांगतों कीं माझ्या जिवात जीव असेपर्यंत राजकन्या यवनांच्या हातीं जाणार नाहीं."

"विजयसिंह, राजकुंवरचं पाणिग्रहण करायला तुम्ही तयार आहांत?" आश्चर्यानें हरपालदेव म्हणाला. सर्वजणच त्याच्याकडे पाहूं लागले.

"हो. मी आपल्याला योग्य वाटत असेन–जोरावरपेक्षां योग्य वाटत असेन तर आपण माझं म्हणणं कबूल कराल." चंद्रसिंह गंभीरपणें म्हणाला.

"विजयसिंह, जोरावरशीं संग्राम करून तुम्हाला राजकुंवरचं रक्षण करणं कठीण आहे, तेव्हां तुमचं म्हणणं मी कसं कबूल करूं?"

दौलतसिंग व त्याच्या पक्षाची मंडळी चंद्रसिंहाकडे हेटाळणीनें पाहूं लागले.

"महाराज," चंद्रसिंह म्हणाला. "जोरावरचा प्रश्न नाहीं. राजकन्येला माझ्या सारख्यालाच द्यायला आपण तयार आहांत कां?

हरपालदेव क्षणभर विचारांत पडला. "महाराज एखाद्या भटक्याला आपली मुलगी देणार नाहींत." दौलतसिंग कुत्सितपणें हंसून म्हणाला.

" विजयसिंह, जोरावरचं पारिपत्य करण्याचं सामर्थ्य तुमच्या अंगीं असतं तर मी आनंदानें माझी राजकुंवर तुम्हाला दिली असती, परंतु तुमच्या एकट्याच्या पराक्रमानें जोरावरचं कांहीं सुद्धां वांकडं होऊं शकणार नाहीं, उलट तुमचा जीव मात्र संकटांत पडेल. "

" महाराज, रजपुताला आपल्या स्त्रियांच्या अब्रूपुढें आपल्या प्राणाची किंमत वाटत नसते. स्वाभिमानी रजपुत आपल्या हातान आपल्या कुळाला कलंक लावून घेणार नाहींत. आपण माझी किंवा राजकन्येची मुळींच काळजी करूं नये. मी जरी एक भटक्या असलों तरी रजपुत स्त्रीला एका यवनाच्या जनानखान्यांत जाऊं देणार नाहीं. जोरावरला निरोप धाडा, त्याच्यांत जर सामर्थ्य असेल तर त्यानें माझ्या हातून—एका भटक्याच्या हातून—शिसोदिया कुळांतील या चंद्रसिंहाच्या हातून राजकुंवरला न्यावं. महाराज मी राजकुंवरला घेऊन चितोडला जातो माझ्या मार्गाकडे जोरावरला यायला सांगा. चितोडच्या सैन्याकडून जर जोरावरचा पराभव झाला नाहीं, तर राजकुंवरचं मुख पुनः आपल्या दृष्टीस पडणार नाहीं, हें मात्र पक्कें समजा. कारण आमच्या चितोडच्या अंगना सर्वच सती पद्मिनीच्या कुळाला शोभतील अशा असतात. स्वतःचा देह त्या अग्नींत जाळून घेतील, पण यवनांनां विटाळूं देणार नाहींत. " चंद्रसिंह आवेशानें बोलत होता व सर्व आश्चर्यातिशयानें त्याच्या तेजस्वी मुखाकडे पहात होते.

आपण शिसोदिया कुलांतले आहोंत हीं अक्षरें त्याच्या मुखांतून बाहेर पडतांच हरपालदेव दिङ्मूढ बनून गेले! त्याचें भाषण पूर्ण होतांच हरपालदेव एकदम पुढें झाले व त्याचा हात हातांत घेऊन गद्गद वाणीनें म्हणाले,

"कुमार, महाराणालाक्षाजींचे आपण ज्येष्ठ चिरंजीव काय? ज्यांनीं आपल्या वचनासाठीं चितोडच्या सिंहासनाचा त्याग केला, ते नरश्रेष्ठ कुमार चंद्रसिंह आपणच कां? "

" होय. महाराज, लाक्षाजींचा पुत्र चंद्रसिंहच मी. "

" कुमार, इतके दिवस आपण माझ्याजवळ असून मी आपणांस ओळखूं शकलों नाहीं, माझ्या हातून जाणून न जाणून जर आपला कांहीं अपमान झाला असल्यास आपण मला क्षमा करा. "

" महाराज, आपल्या हातून तसा कांहींच प्रकार घडला नाहीं. उलट आपण मला—एका भटक्याला—आश्रय दिलात व माझा इतका सन्मान केलांत त्याबद्दल मीच आपला ऋणी आहे व आपले मजवर अनंत उपकार झाले आहेत. "

" कुमार, हें आपलं सौजन्य म्हटलं पाहिजे. पण आपण असा अज्ञातवास कां पतकरला ? "

" तशाच कांहीं कारणामुळं मला अज्ञातवासांत रहावं लागलं होतं, परंतु आतां तसं कारण नाहीं. मला चितोडला जायला आजच्या आज निघालं पाहिजे, माझा मित्र जयसिंह म्हणजे संग्रामसिंह आजच चितोडला गेला व मलाहि गेलं पाहिजे तेव्हां माझी मागणी आपल्याला कबूल आहे ना ? "

" वा ! कुमार, आतां नाहीं कोण म्हणेल ? " आनंदून हरपालदेव म्हणाला, " माझें भाग्य थोर म्हणूनच आपण माझे सोयरे होणार. राजकुंवर दैवाची थोरच म्हटली पाहिजे. कुमार, मी आतां जोरावरला भीत नाहीं. "

" पण महाराज, मी मेवाडचा राणा नसून एक सामान्य सरदार आहे हें आपणांस माहीत आहे ना ? "

" कुमार, आपली प्रतिज्ञा कोणाला माहीत नाहीं ? सर्व राजपुताना व आसपासच्या राजेरजवाड्यांना आपल्या प्रतिज्ञेची माहिती आहे व आपल्या प्रतिज्ञेमुळें आपली कीर्ति दिगंत पसरली आहे. कुमार, आपण महाराण्याचा अधिकार सोडून दिला असला तरी आपण शिसोदिया कुलाचे सर्वश्रेष्ठ नर-चूडामणी अहांत, माझी राजकुंवर आनंदानें आपल्याला वरील. आपल्या राज्य-त्यागाबद्दल तिला मुळींच वाईट वाटणार नाहीं. "

" महाराज, आपली इच्छा असली म्हणजे झालं. मला आज रात्रीं चितोडला गेलं पाहिजे. "

" फार उत्तम. कुमार, उद्यां पहांटेस आपण चितोडला जा. आज विवाह-विधि उरकून घेऊं. वीरसिंह." ते त्याच्याकडे वळून म्हणाले, जोरावला कळवा कीं राजकुंवर आम्ही चितोडच्या कुमार चंद्रसिंहाला दिली. तुला पाहिजे अस-ल्यास युद्धाला ये. "

" तसं नाहीं. जोरावरला म्हणावं मी राजकुमारीचं हरण करून घेऊन गेलों, दम असला तर चितोडलाच ये अन् तुझं सुलतानी सर्व सैन्य देखील घेऊन ये " चंद्रसिंह आवेशानें म्हणाला.

" बरं आहे. " आनंदून वीरसिंह म्हणाला. दौलतसिंगाला मात्र वाईट वाटलें. हरपालदेवाला तर अत्यंत हर्ष होऊन व विलक्षण उत्साह वाटूं लागला. उत्साहाच्या भरांत ते आनंददायक वर्तमान सांगायला ते अंतःपुरांत गेले व चंद्रसिंहहि उल्हासानें आपल्या निवासस्थानाकडे गेला.

## प्रकरण ३०.वें

# संकटनिवारण

शिवसमंदसरोवरावर कांठच्या शिवालयांत राजकुंवर शंकराची आराधना करीत बसली होती. बालसूर्याचे कोंवळे कर आतां तारुण्यामुळें कणखर भासत होते. गाभाऱ्यांत शिवलिंगाचें दर्शन घ्यावयाला त्यानें आपली अंजली पसरली होती. राजकुंवर शुभ्र वस्त्रें परिधान करून मनोभावानें श्रीशंकराची पूजाअर्चा करीत होती. दिनकराच्या तेजापुढें तेथला नंदादीप निस्तेज दिसत होता. गाभारा लहानच संगमरवरी पाषाणाचा असून तो सुगंधित परिमलांनीं दरवळून गेल्यामुळें आल्हाद वाटून अंतःकरण भक्तिरसानें उचंबळून येत होतें. राजकुंवर पूजाविधि आटोपून आतां नेत्र झाकून शंकराची स्तुति करीत होती व तिच्या नयनशुक्तिकेंतून मोत्यांचे सर तिच्या गुलाबी गालावर ढळूं लागले.

आपलें भवितव्य तिला कळून चुकलें होतें. रात्रीं तिनें मोठें धाडस करून चंद्रसिंहाला पत्र धाडून मदतीची याचना केली व त्यानेंहि मदत करण्याचें अभिवचन दिलें. त्याबद्दल तिला अत्यंत हर्ष झाला. आधींच ती अहेरियाच्या दिवसापासून त्याच्यावर अनुरक्त झालेली होती, त्यांत आपल्यासाठीं त्यानें दरबारांत वीरोचित भाषण केलें हें तिला कळलें.तो शूर, धाडसी व स्वाभिमानी आहे हें तिला कळून आलें होतें, तसेंच त्यानें तिचें पाणिग्रहण करण्याचें कबूल केल्यामुळें तर तिला त्याच्याविषयीं अत्यंत आदर व पूज्यभाव वाटूं लागला. तिला मनोवांछित वर लाभणार म्हणून हर्ष झाला होता! मग असे अश्रु ढाळण्याचें कारण काय?

राजकुंवरला आतां त्याच्या जीविताविषयीं चिंता उत्पन्न झाली. आपला विवाह त्याच्याशीं होऊन भागत नाहीं. ही वार्ता दुष्ट जोरावरला कळतांच तो त्वेषानें राजदुर्गावर चाल करून येईल व सर्वांचा कदाचित नाश होईल. त्यामुळें आपला पिता त्याची मागणी कबूल करणार नाहीं व अखेरीस आपणांस यवनांच्या अंतःपुरांत जाण्याचा प्रसंग येईल. तिनें आपली ही शंका चंदाजवळ बोलून दाखविली; पण अशा शंकाकुशंका काढून मनाला त्रास करून घेणें तिला पसंत नव्हतें, म्हणून ती राजकुंवरची आपल्याकडून

होईल तशी समजूत करीत होती. राजकुंवरचें समाधान झालें नाहींच. उजाडतांच ती स्नान करून आपल्या आराध्य दैवताची अंतःकरणपूर्वक करुणा भाकूं लागली. या संकटांतून आत्मबलिदानाशिवाय मार्ग नाहीं असेंच तिला वाटूं लागलें. आपल्या पित्यानें विजयसिंहाची मागणी कबूल केली नाहीं तर शिवचरणीं हा देह अर्पण करून सर्वांना मुक्त करावयाचें असें तिनें ठरविलें. आपल्यासाठीं त्या वीरपुरुषानें मृत्यूच्या कराल मुखांत उडी टाकण्यापूर्वीच आपल्या देहाचा नाश करून घ्यावयाचा व त्या वीरवराचा जीव मातीमोल होऊं द्यायचा नाहीं असा तिनें मनाशीं निश्चय केला.

" भगवान् महाकालेश्वरा, या संकटांतून मुक्त होण्याचा मार्ग तूंच दाखविणार आहेस ! मरणाशिवाय तरणोपाय नाहीं, तेव्हां तुझ्या चरणाजवळ या अभागिनीला आश्रय दे म्हणजे झालं ! विजयसिंहासारख्या तरुण नरश्रेष्ठाला माझ्यामुळं मृत्यूच्या डोहांत उडी घालायला नको. माझ्या मातापित्याला कांहीं काल दुःख होईल पण ते पुढें विसरतील. " इतकें बोलून तिनें दीर्घ श्वास सोडला व नेत्र उघडले. पहाते तों चंदा हसत उभी होती. राजकुंवरनें आपले आर्द्र नेत्र पुसले व आसनावरून उठून चंदाकडे पाहून म्हणाली. "चंदा, तूं माझ्या एकांताचा भंग करायला कां बरं आलीस ? "

"कुंवरबा, भगवान् महाकालेश्वर तुमच्यावर प्रसन्न झाले बरं! तुम्ही तर इकडे त्याच्यावर मोत्यांच्या सरांचा अभिषेक सुरू केला होतात. अहो, बाईसाहेब, तुम्ही इकडे शंकराच्या पूजेंत गुंतलांत पण तिकडे मलाच दृष्टांत झाला बरं कां ? "

" कसला दृष्टांत ग ? "

" शंकरानं तुम्हाला त्याच्यासारखा भोळा नव्हे पण क्रोधी वर दिला असा दृष्टांत मला झाला बघा. "

" पुरें तुझा वात्रटपणा. चंदा, ही वेळ थट्टा करावयाची नव्हे बरं!" गंभीर मुद्रेनें राजकुंवर म्हणाली. आपल्या बातमीनें राजकुंवरला आनंद होईल असें चंदाला वाटलें होतें.

" कुंवरबा, चांगली आनंदाची बातमी सांगायला आले तर तुम्ही आपल्या कष्टीच दिसतां, ते विजयसिंह खरे कोण हें कळलें कां तुम्हाला ? "

"नाहीं. कोण आहेत ? " आश्चर्यानें ती म्हणाली.

" दुसरे तिसरे कोणी नसून शिसोदिया कुलभूषण राणा लाक्षाजींचे ज्येष्ठ पुत्र कुमार चंद्रसिंह. "

" काय म्हणतेस तूं, खरं कां हें ? " राजकुंवरला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें.

" हो. हो. खरंच सांगतें मी. त्यांनींच स्वमुखानं दरबारांत महाराजांना सांगितलं ना ? "

" चंदा, चंदा, तूं मला फसवीत तर नाहींस ? " राजकुंवर अधीरतेनं म्हणाली.

"नाहीं. कुंवरबा, माझ्यावर इतका सुद्धां तुमचा विश्वास नाहीं अं ? पण बाई साहेब, ज्यांच्यावर आपण इतक्या भाळला अहांत ते चितोडचे उत्तराधिकारी असले तरी त्यांनीं आपला तो अधिकार सोडून देऊन ते एक सामान्य सरदार सध्यां आहेत बरं कां? असल्या विचार शून्य, रागीट, दुराग्रही कुमाराची पत्नी होण्यापेक्षां तो जोरावर काय वाईट ? मी म्हणते, तुम्ही त्या जोरावरशींच लग्न करा. "

" चंदा, तूं अगदीं अक्कलशून्य आहेस. " राजकुंवर किंचित् स्मित करीत म्हणाली.

" अन् हे तुमचे चंद्रसिंह राज्य गमावून अकलेचें बारदानच बनले आहेत जसे. वाहवा ! मला जर कुठचं राज्यं असतं तर तें सोडून मीहि अशीच अक्कलवंत झालें असतें ! " थट्टेच्या स्वरांत चंदा म्हणाली.

" चंदा, राज्यत्याग करणं म्हणजे काय समजतेस तूं ? "

" मूर्खपणा दुसरं काय ! "

" सर्वांनाच तसा मूर्खपणा करायला साधत नाहीं समजलीस ? चंदा, कुमारांनीं चितोडच्या सिंहासनाचा त्याग केला यांत त्यांच्या मनाचा थोरपणाच प्रत्ययाला येतो. राज्यासाठीं काय काय अनर्थ होतात हें तुला ठाऊकच आहे. राज्य सोडून असं सामान्य लोकांसारखं वागणं कोणाच्याच हातून होऊं शकणार नाहीं. तेव्हां कुमारासारखे सत्यनिष्ठ वीर पुरुष दुर्मिळ असं नाहीं कां तुला वाटतं ? "

" कुंवरबा, पुरें झालं तुमचं. मी तर त्यांना मूर्खच म्हणतें. ज्यांला राज्य नसतें ते हजार उपायानं मिळवायला पहातात अन यांना मिळत असून गमावून बसले, काय म्हणावं त्यांना, तुम्हीच त्यांचे गुण गा. " चंदा हंसत हंसत

म्हणाली. नंतर दरबारांत नुकतांच घडलेला सर्व वृत्तांत तिनें राजकुंवरला सांगितला. ज्याच्यावर आपलें प्रेम बसलें तो शिसोदिया कुलाचा वीरभूषण आहे हें कळून तिला अत्यंत हर्ष झाला.

" चंदा, अखेरीस या चंद्रशेखराला माझी करुणा येऊन त्यानें माझी मुक्तता केली. मला आतां कोणाचंच भय वाटत नाहीं. " आलेले आनंदाश्रु तिनें पुसून टाकले.

" हो. चंद्रशेखर प्रसन्न होऊन त्यानें चंद्रच वर दिला खरा " चंदा हंसून म्हणाली. " पण संभाळा हो, या चंद्राच्या दुसऱ्या किती तरी चांदण्या असायच्या. "

" नाहीं. चंदा, या चंद्राला ही चांदणी प्रथम मिळणार आहे. " दोघीहि आश्चर्यानें पाहूं लागल्या. स्वतः हरपालदेवच आपल्या कन्येला हें आनंददायक वर्तमान सांगावयाला आले होते. राजकुंवर शिवमंदिरांत आहे हें कळतांच ते इकडे आले. चंदाचें शेवटचें वाक्य ऐकून त्यांनीं त्याला उद्देशून उत्तर दिलें. पित्याला पाहून राजकुंवरनें लज्जेनें खालीं मान घातली. चंदा हंसत उभी होता.

" बाळ राजकुंवर, चंदाकडून तुला सर्व कळलं आहेच. आजच विवाहविधि उरकून कुमारांनीं नंतर चितोडला जावं असं मी म्हणत होतों, परंतु चितोडांत बाल राण्यावर कांहीं संकट आलं आहे, तें प्रथम दूर करून मग विवाह करावयाचा असं कुमारांचं म्हणणं पडलं. चितोडला तुला बरोबर न्यायचा त्यांचा विचार आहे, कारण ते तिकडे गेल्यावर मागें जोरावर आल्यास तुला आधींच सुरक्षित ठिकाणीं न्यावं असं त्यांचं म्हणणं आहे. "

" पिताजी, " खालीं पहात राजकुंवर म्हणाली. " मला पाठवून संकट टळत नाहीं. कारण खरी गोष्ट कळतांच जोरावर इथं धांवून येईल. "

" हो. आतां मी जोरावरला भीत नाहीं. राजकुंवर, कुमार चंद्रसिंहाच्या हिंमतीवर मी प्रत्यक्ष माळव्याच्या सुलतानाशीं अथवा दिल्लीपतीशींहि संग्राम करायला सिद्ध आहे. जोरावर लढाईला येणार हें जाणूनच आम्ही इकडे तशी तयारी ठेवणार आहोंत. चितोडचं संकट टाळून कुमार आमच्या मदतीला येणार आहेत. दोघे मिळून जोरावरला तेव्हांच चिरडून टाकूं "

" पिताजी, मग मला पाठविण्याची एवढी घाई कां ? "

सुरक्षितपणासाठीं, तूं त्यांच्याबरोबर गेलीस म्हणजे कसलीच भीति नाहीं."

" पिताजी. थोडे दिवस आपण माझें सहज रक्षण करूं शकाल. तशीच वेळ आली तर मीहि वीरकन्या आहे, माझं रक्षण कसं करावं हें मी त्या जोरावरला दाखवीन. पिताजी, सध्या चितोडचं संकट टळूं द्या. नंतर–" इतकें बोलून राजकुंवर स्तब्ध राहिली. तिच्या बोलण्याचा आशय हरपालदेवाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं. विवाहापूर्वीच चंद्रसिंहाबरोबर जावयाला ती तयार नव्हती व तिचें म्हणणेंच योग्य होतें. थोडे दिवस आपण आपल्या कन्येचें रक्षण करूं शकूं असें आतां त्यांनाहि वाटूं लागलें. " राजकुंवर, तूं म्हणतेस तसंच करूं. मी तसं कुमारांना सांगतों. चितोडची मदत आम्हाला मिळणार या आशेवर आम्हीं राजदुर्ग सहज दोन महिने लढवूं. माझ्या मुलीचं रक्षण करण्याचं माझ्यांत तितकं सामर्थ्य आहे." इतकें बोलून हरपालदेव तेथून निघून गेले. चंदा व राजकुंवर महालांत गेल्या.

## प्रकरण ३१ वें

# राणीच्या महालांत

आठव्या दिवशीं जसु त्या भुयारांत संग्रामाची वाट पहात होती. जसजसा उशीर होऊं लागला तसतशी तिला काळजी वाटूं लागली. आज आठ दिवस राणी, जसु आणि मानकुंवर बालराजाचें जिवापलीकडे जतन करीत होत्या. राणी क्षणभरहि दृष्टीच्या आड त्याला जाऊं देत नव्हती. चंद्रसिंह केव्हां येऊन आपल्या बाळाला संकटमुक्त करतो असं तिला होऊन गेलें होतें. तिला अन्न-पाणीहि गोड लागत नव्हतें. रणमल्ल व जयमल्ल केव्हां केव्हां तिला भेटावयास येत, परंतु तिनें त्या दोघांशीं बोलणें आजिबात वर्ज्य केलें होतें. रणमल्लहि विशेष तंटाभांडण होईल असें उकरून काढीत नव्हता. कारण आपला कार्य-भाग उरकेपर्यंत गप्प बसावें असें त्यानें ठरविलें होते.

जसु भुयाराजवळ उभी होती. इकडे संग्राम न आल्यामुळें तिची अगदीं निराशा झाली. पुढें काय करावे हें तिला सुचेना. संग्राम न आला तर बाळ राण्याचें यापुढें कसें रक्षण करावें या विचारांत ती होती. इतक्यांत भुयाराच्या दाराची शिळ बाजूला सरकली गेली व गार वारा अंगाला झोंबला. " जसुबा " हळूंच हांक ऐकूं आली.

" कोण ? संग्रामसिंह ! " जसूनें एकदम विचारलें.

" हो. चला आपण आंतच जाऊं. "

" तुमची वाट पाहून कंटाळले अन् तुम्ही येत नाहीं असंच मला वाटलं."

" जसुबा, आपण आंत जाऊन बोलूं चला." नंतर ते भुयारमार्गानें वाड्याकडे जाऊं लागले. जातां जातां संग्रामानें सर्व वृत्तांत तिला सांगितला. आपण राजदुर्गांत कसें गेलों व कुमाराला इकडील परिस्थिति सांगितल्यावर ते रणमल्लावर कसें चिडले, लागलेच इकडे यावयास कसे निघाले वगैरे सांगून तो म्हणाला, "जसुबा, आपले कुमार खरोखरीच थोर मनाचे आहेत. राणीसाहेबांचे सर्व अपराध विसरून आपल्या राजाला व देशाला सोडविण्यासाठीं ते अगदीं जिवाची पर्वा करणार नाहींत."

" खरंच; कुमार चितोडच्या उद्धारासाठीं वाटेल तें प्राणसंकट ओढून घेतील. संग्रामसिंह, पूर्वी कुमारांचा द्वेष करीत होत्या त्याच राणीसाहेब आतां त्यांच्या वाटेकडे सर्व प्राण एकवटून वाट पहात आहेत." बोलतां बोलतां दोघेहि राजवाड्यांतल्या दाराजवळ आले. मानकुंवर तेथें वाट पहात होतीच. नंतर ते तिघेहि राणीच्या शयनखंडांत आले. राणी आपल्या गालावर तळहात टेकून निजलेल्या आपल्या पुत्राकडे पहात बसली होती. तिच्या नेत्रांतून आंसवें वहात होती. राणी पुढें होऊन हात जोडून संग्राम उभा राहिला. त्याला पहातांच तिला फार आनंद झाला, आपले अश्रु पुसून ती हलक्या स्वरानें म्हणाली. " संग्रामसिंह, आलांत तुम्ही ! "

" हो. बासाहेब, आतांच आलों. आपण कांहीं काळजी करूं नये. "

" कुमार केव्हां येतील ? माझ्या बाळाचं ते रक्षण करतील ना ? " ती उत्कंठेनें म्हणाली.

" बासाहेब, राणाजींची आतां मुळींच काळजी करूं नका. उद्यां कुमार चितोडांत येतील बघा. "

" खरंच कां ? मागचं सारं विसरून ते माझ्या मदतीला धावून येतील ? "

हो. बासाहेब, बाळराणाजीसाठीं व आपल्या मेवाडदेशासाठीं कुमार चंद्रसिंह वाटेल तें दिव्य करायला तयार होतील. परंतु ते येण्यापूर्वी काय करायचं तें आपण केलं पाहिजे."इकडे तिकडे पाहून तो म्हणाला. " आपलं भाषण कोणी ऐकणार तर नाहीं ?"

"नाहीं. जसु व मानकुंवर या दोघींशिवाय मी इकडे कोणालाच येऊं देत नाहीं. तरी पण काळजी घ्यावी हें चांगलं. जा. मानकुंवर तूं पहात रहा कोणी इकडे येत कां?" मानकुंवर जाऊन दाराजवळ उभी राहिली.

"बासाहेब, उजाडतांच आपण गोमुंडाला देवीच्या दर्शनाला जायची तयारी करा. आपल्या कुलाचाराप्रमाणें आपणांस देवीचं दर्शन परवां पौर्णिमेला घ्यायचं आहे असं आपल्या पिताजीला कळवा. एकदां आपण चितोडबाहेर पडलांत कीं मग जिंकलं. आपले पिताजी आपल्याला येथून बाहेर जाऊं देतील कां?" शंकित होऊन तो म्हणाला.

"मी पिताजीला सांगून पहातें."

"गुप्त मार्गानं राणाजींना नेलं तर?" जसु म्हणाली.

"नाहीं. तो मार्ग राणाजींना सोईस्कर नाहीं. मीच मारवाड्याचं वेषांतर करून चितोडांत मोठ्या प्रयासानं शिरलों. प्रत्येक वेशीवर कडक पहारा आहे. कोणालाच आंत येऊं देत नाहींत व बाहेर जाऊं देत नाहींत. तेव्हां राणाजींना बाहेर कसें न्यावें? तसा धोका आहे परंतु रणमल्लजीला विचारूनच गोमुंडा देवीला जावं हा मार्ग उत्तम. बासाहेब, कसंहि करून आपण उद्यांचेंउद्यां चितोडबाहेर निघा. मी इकडे रामसिंग वगैरे मंडळीस भेटून जी व्यवस्था करायची ती करून ठेवतों. चितोडच्या बाहेर आपल्याला अनेक मित्र भेटतील. कुमारहि गोमुंडाला येणार आहेत."

"बरं आहे. मी उद्यां बाप्पाजीला भेटून गोमुंडाला गेलंच पाहिजे म्हणून सांगतें. पण त्यांनीं जाऊं दिलं नाहीं तर?"

"तर? मग शेवटचा उपाय. कुमार येतांच चितोडवर एकदम चालून यायचं. आंत आपली कांहीं मंडळी आपल्या पक्षाला सामील होतील. परंतु आपण राणाजीला मात्र नीट संभाळा." पुढें कसें करावयाचें हें थोडक्यांत सांगून संग्राम आल्या वाटेनं बाहेर गेला व तेथून रामसिंगाच्या वाड्याकडे गेला. मारवाड्याच्या वेषांतरामुळें त्याला कोणी ओळखलें नाहीं. रणमल्ल व जयमल्ल यांस असेंच वाटत होतें कीं संग्राम भुयारांत अन्नपाण्यावांचून मरण पावला.

जोधराव आपले मारवाडी सैन्य घेऊन चितोडपासून दोनतीन कोसांवर सैन्याचा तळ देऊन बसला. त्यानें तेथून आपल्या पित्यास निरोप पाठविला कीं, आपण येऊन मला भेटावें. जोधरावनें येतांच चितोडवर एकदम छापा

घालावा असें रणमल्लानें त्याला कळाविलें होतें. परंतु एकदम चितोडवर छापा घालून चितोडच्या सैन्याशीं सामना देण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. कारण आपल्या पित्याचा कावा अद्याप त्याला कळला नव्हता व रणमल्लानें खरी वस्तुस्थिति त्याला कळविली नव्हती. आपल्या भगिनीवर कांहीं तरी संकट आलें आहे व आपल्या पित्याला आपल्या सैन्याची जरूर भासली म्हणून त्यानें चितोडास बोलावलें, इतकेंच त्याला माहीत होतें. आपण असें ससैन्य एकदम चितोडांस घुसलों तर तेथले वीर क्षणांत आपला नाश करून टाकतलि म्हणून तो आंत न येतांच बाहेर राहिला. त्याचें हें करणें रणमल्लास आवडलें नाहीं. जोधरावानें एकदम येऊन चितोडचा ताबा घ्यावा व जे सरदार युद्धाला येतील त्यांना कापून काढावें म्हणजे झालें! बहुतेक सरदार आपल्या बाजूलाच आहेत व चितोड सर करावयाला मुळींच उशीर लागणार नाहीं असें त्याला खात्रीपूर्वक वाटत होतें. परंतु आतां जोधराव बाहेर येऊन राहिल्यामुळें चितोडचे लोक सावध होतील व चितोड सर करायला बरीच अडचण पडेल असें त्यांस वाटून जोधरावच्या या कृत्याचा त्याला रागहि आला. त्यानें पुनः जोधरावला निरोप पाठविला कीं, ' तूं मूर्खपणा करून बाहेर कशाला राहिलास? चितोडवर एकदम चालून ये. " परंतु जोधराव आला नाहीं. उलट त्यानें असा निरोप पाठविला कीं, " तेथली परिस्थिति काय आहे, हें कळल्याशिवाय मी सैन्य हलविणार नाहीं. "

शेवटीं रणमल्लजयमल्लांचा बेत असा ठरला कीं, रात्रीं जयमल्लानें जोधरावाकडे जाऊन येथली वस्तुस्थिति त्याला नीट सागावयाची व शक्य असल्यास रात्रींच चितोडवर छापा घालावयाचा.

## प्रकरण ३२ वें

# पिता कीं पिशाच्च !

उजाडतांच राणीनें एका मारवाडी दासीस बोलावून आणलें व रणमल्लास बोलावयास पाठविलें. जोधरावाकडून नुकताच जयमल्ल आला होता व त्यानें सांगितलें कीं, जोधरावला रणमल्लाचें हें कपटकारस्थान मुळींच आवडलें नाहीं. त्यानें आपल्या बापाला दोष दिला. त्यामुळें रणमल्ल जरा रागांतच होता. इतक्यांत राणीनें बोलावलें आहे असें सांगावयास दासी आली. प्रथम

त्याला बरेंच आश्चर्य वाटलें. कारण राणी त्याच्याशीं बोलत नव्हती व उघड त्याचा तिरस्कार करीत होती. तो चारपांच दिवसांत राजवाड्यांत गेलाच नाहीं. मुकुलजीला युक्तिप्रयुक्तींनें राणीपासून दूर नेण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला पण एकहि साधला नाहीं. तिला आपल्या बापाचा दुष्ट हेतु कळला होता व म्हणून ती जागरूकतेनें आपल्या मुलाचें रक्षण करीत होती. सावध सिंहिणीच्या पुढ्यांतून तिचा छावा हिसकावून नेणें रणमल्लाला अशक्य झालें होतें. शिवाय ही गोष्ट जर बाहेर फुटली तर चितोडचे लोक आपल्या पक्षाचे आहेत तरी आपल्या राण्याच्या जिवाला धोका आहे हें कळतांच राणीच्या पक्षाला मिळतील व आपला सारा व्यूह ढासळून जाईल ही त्याला भीति होतीच. कोणाला न कळत मुकुलजीला या जगांतून एकदा नाहींसा केल्यावर मग इतरांचा तितका जोर चालणार नाहीं असें त्याला वाटत होतें. मुकुलजीला राणीजवळून एकीकडे नेण्याला त्याला संधीच मिळत नव्हती. आपलें सैन्य आल्यावर चितोड स्वाधीन करून घेतांच मुकुलजीलाहि जबरदस्तीनें राणीजवळून काढून घ्यावयाचा त्याचा विचार होता.

आपल्या मुलीचें काय म्हणणें आहे हें जाणण्यासाठीं रणमल्ल राजवाड्यांत आला. राणी त्याची वाट पहातच होती. राणीनें मुद्दाम आज सौम्यरूप धारण केलें होतें. पित्याला सन्मानपूर्वक तिनें बसावयास सांगितलें. जसें कांहींच घडलें नाहीं असा मानभावीपणाचा आव आणून रणमल्ल म्हणाला, " पद्मकुमारी, मला कशाला बोलावलंस ? "

" बाप्पाजी, उद्यां पौर्णिमा आहे व येथून तीनचार कोसांवर गोमुंडा गांव आहे तिथं आमची देवी आहे. देवीचा उत्सव दरवर्षी होतो व चितोडच्या राण्याला दर्शनाला जावें लागतें. म्हणून बाल मुकुलला घेऊन मला देवीच्या दर्शनाला गेलं पाहिजे."

कपाळाला आठ्या घालून रणमल्ल म्हणाला, " मुकुलला जायचं आहे ना ? धाडीन मी त्याला. "

"नाहीं. मीहि त्याच्या बरोबर जाणार. " राणी निश्चयी स्वरानें म्हणाली; " बाप्पाजी, मी माझ्या बाळाला एकट्याला पाठविणार नाहीं. "

"म्हणजे ?" ओठ आवळून रणमल्ल जोरानें म्हणाला, " तुला काय वाटतं माझ्या मुलावर तुझीच सत्ता, माझी नाहीं ?"

" नाहीं. बाप्पाजी, तुमची सत्ता कधींच नाहींशी झाली. जे दिवशीं तुम्हो मला व माझ्या बाळाला माझ्याच वाड्यांत बंदिवान करून ठेवलंत, तेव्हांच तुमचं अंतरंग मला कळून आलं. कोणत्या हक्कानं तुम्ही सत्ता मागता ?" राणीचा क्रोध दर क्षणाला वाढत होता. तिचें सर्वांग थरथर कांपू लागलें व क्रुद्ध नागिणीप्रमाणें ती दिसूं लागली.

" असं काय ? पद्मा, तूं अद्याप तुझ्या बापाला ओळखलं नाहींस ?" रणमल्ल शब्दावर जोर देऊन आज्ञतेनें म्हणाला.

" खरंच. इतके दिवस ओळखलं नव्हतं पण आतां या आठदहा दिवसांत चांगलं ओळखलं आहे. तुम्हाला न ओळखूनच मी कुमारचंद्रसिंहासारख्या हितकर्त्याला दूर केलं व म्हणून आज कैद भोगते आहे " राणी क्रोधकंपित स्वरानें म्हणाली.

रणमल्लाचाहि संताप भडकला होता. परंतु अधिक संतापण्याची ही वेळ नव्हे असें त्याला वाटलें. त्यानें आतां जरा नमते घ्यावयाचा विचार केला, आपल्या रागानें गोष्ट भलत्याच थराला जाईल व आपलाच तोटा होईल हें जाणून तो क्षणभर गप्प राहिला. जें कार्य चितोडांत साध्य होत नाहीं तें चितोडच्या बाहेर सहज साध्य होईल हा विचार त्याच्या मनांत येऊन त्याला समाधान वाटलें.

तो हंसून म्हणाला. " पद्मा, इतकी रागावूं नकोस. बाल मुकुलजीला घेऊन देवीच्या दर्शनाला जायची तुझी इच्छा आहे तर खुशाल जा. तुमच्या कुल-परंपरेंत मी कशाला आड येऊं ? मी तुला कैद करून ठेवलंय असं उगाचंच तुला आपलं वाटतंय झालं. माझ्याविषयीं तुझा गैरविश्वास झालाय त्याला इलाज नाहीं. बरं, केव्हां निघायचंय तुम्हांला ? व कोण कोण बरोबर पाहिजे ?"

राणीहि जरा नरम पडली. आपलं काम साधेपर्यंत त्याच्याच कलानें घ्यावें असें तिनें ठरविलें. आम्हाला आज रात्रींच निघालं पाहिजे व बरोबर जसु अन् मानकुंवर तर पाहिजेतच. आणखी कोण कोण मंडळी देणार तुम्ही ?"

" जसु अन् मानकुंवर, होय ?" मान डोलवून रणमल्ल म्हणाला. मानकुंवरचें नांव ऐकतांच त्याच्या मनांत एक विचार आला. " बरं, या दोघी

आणखी दुसरी मंडळी कोण द्यायची याचा मी विचार करतों. रात्रीं तुम्ही तयार रहा. दोन मेणे तुमच्यासाठीं येतील व बरोबर कांहीं स्वार पण येतील." इतकें बोलून रणमल्ल उठला. राणी पुढें कांहीं बोलली नाहीं. जातां जातां मानकुंवरकडे तिरक्या डोळ्यानें पहात त्यानें आपल्या मिशाला पीळ भरला व छद्मिपणानें स्मित केलें. मानकुंवरनें त्याच्याकडे पाहिलें नाहीं. परंतु त्याच्या त्या जहरी नजरेची तिला विलक्षण दहशत बसली, आणि आपल्यावर भयंकर अरिष्ट येणार अशी तिला भीति वाटूं लागली.

रणमल्ल गेल्यावर राणीनें आपली तयारी चालविली. ती शंकराची क्षणोक्षणीं करुणा भाकूं लागली. "माझ्या बाळाला एकदां सुरक्षित बाहेर जाऊं दे व चंद्रसिंहाला मदतीला येऊं दे." रात्र केव्हां होते याची ती उत्कंठेनें वाट पाहूं लागली.

राजवाड्यांतून चंद्रमहालांत जातांच रणमल्लानें जयमल्लास आपल्या खोलींत बोलाविलें.तो येतांच रणमल्ल म्हणाला," आज रात्रीं पद्मकुमारी आपल्या मुलाला घेऊन गोमुंडाला देवीच्या दर्शनाला जाणार आहे. तिच्याबरोबर कोण कोण मंडळी द्यावी ? "

" आपण त्यांना वाड्याबाहेर जाऊं देणार ? " जयमल्ल आश्चर्यानें म्हणाला.

" हो जयमल्ल, जो कार्यभाग चितोडच्या राजवाड्यांत साधत नाहीं तो गोमुंडाच्या वाटेंत साधून घ्यायचा. काय समजलास ? तुलाच तिच्याबरोबर गेलं पाहिजे. आपले चाळीस निवडक लोक बरोबर घे. राण्याच्या इतमामाला शोभेल असा लवाजमा बरोबर पाहिजे. "

" आपला उद्देश नीटसा नाहीं माझ्या लक्षांत आला. " शंका प्रदर्शित करून जयमल्ल म्हणाला. त्यावर हंसून रणमल्ल म्हणाला. " अरे, जयमल्ल, जरा नीट विचार तर कर. मी पद्मकुमारीला कां जाऊं देणार आहे तुला कळलं नाहीं?"

" अं हं. "

" हें बघ, पद्मकुमारी मुकुलला घेऊन चितोडबाहेर गेल्यावर पुनः तिचा मुलगा चितोडांत येणार नाहीं, अशी व्यवस्था करायची. आतां कांहीं तरी सोक्षमोक्ष झालाच पाहिजे. यापूर्वीच त्या पोराची वाट लावली असती, पण चितोडच्या राजवाड्यांत कार्य साधून घ्यायला धैर्य होत नव्हतं. परंतु चितोडबाहेर आपला कार्यभाग उरकून घ्यायला किती सोईस्कर आहे पहा ! तिथं तिच्या मदतीला कोण येणार आहे ? जयमल्ल, स्वतः पद्मकुमारी जर आड आली तर तिलाहि

आपल्या मुलाच्या भेटीला जाऊं दे." जयमल्ल दुष्ट होता, परंतु रणमल्लाचें भाषण ऐकून त्याच्याहि अंगावर शहारे आले! हा पिता कीं पिशाच्च असें क्षणभर त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. रणमल्लच पुढें म्हणाला. "जयमल्ल, तिकडे या दोघांची वाट लावून मी उद्यांच चितोडचा महाराणा होणार; चितोडच्या सिंहासनाचा उपभोग घेणार, नंतरची व्यवस्था ठरवून टाकूं. तुझ्याशिवाय हें कार्य साधारण नाहीं. हें कार्य उरकलं कीं, सालुंब्रा प्रांत तुझा." जयमल्लाच्या मुखाकडे त्यानें पाहिलें व पुढें म्हणाला, "दुसरंहि एक काम साधायचं आहे."

"कसलं?" रणमल्लानें त्याच्या कानांतच कांहीं तरी सांगितलें. जयमल्ल हंसून म्हणाला. "वाहवा! एकंदरींत सर्वच गोष्टी आपण एका रात्रींत उरकून घेणार अं?"

"जयमल्ल, निघण्यापूर्वी हीहि कामागिरी करून टाक बरं कां?"

"त्यांत मोठसं नाहीं. सहज करून टाकीन."

"जयमल्ल, तुला जास्त सांगायाला नकोच पण नीट सावधागिरी ठेव बरं कां! ही कामागिरी एकदां पार पाडलीस कीं, सालुंब्रा प्रांत तुझाच आहे."

"महाराज, त्याची काळजी नको. काम कसं चोख करतों तें पहा."

ठरल्याप्रमाणें प्रहर रात्रीच्या सुमारें दोन मेणे व चाळीसपन्नास स्वार राजवाड्याजवळ तयार असल्याची वर्दी राणीला देण्यांत आली. राणी मुकुलला घेऊन घाईनें निघाली. जसूनें मानकुंवरचा तपास केला पण ती कोठेंच आढळली नाहीं. तिनें राणीलाहि सांगितलें. 'अशा वेळीं ही मानकुंवर गेली तरीं कोठें?' राणी म्हणाली. जावयाला उशीर होऊं लागला. रणमल्ल स्वतः तेथें आला.

"काय झालं? तुम्ही निघा आतां."

"बाप्पाजी, मानकुंवर कुठं गेली?"

"मानकुंवर, असेल कुठं तरी, पुढं व्हा, मी पाठवून देतों तिला. तुम्ही चालू लागा नाहीं तर रात्र होईल तुम्हाला. अशा वेळीं ती गेली तरी कुठं? मी तिला मागोमाग पाठवितोंच."

राणी, मुकुलजी व जसु एका मेण्यांत बसले. एक मेणा मानकुंवरसाठीं मागें ठेवण्यांत आला. राणी स्वाराबरोबर निघाली. ती मंडळी दिसेपर्यंत रणमल्ल उभा राहून पहात होता. त्याच्या मुखावर समाधानाचें हास्य दिसत होतें.

# प्रकरण ३३ वें

## वेळेवर मदत

चितोडच्या महाद्वारांतून राणी आणि तिच्या बरोबरची मंडळी पुढें निघून गेली. राणी मेण्यांत आपल्याच विचारांत स्तब्ध बसली होती. चंद्रसिंह आपल्याला वेळेवर भेटेल कीं नाहीं ? संग्राम चितोडांतून बाहेर पडला कीं नाहीं ? आपल्या बाळावरचें संकट कसें निवारण होईल ? वगैरे अनेक शंकाकुशंकांनीं तिचें मन व्यग्र झाल्यामुळें मानकुंवरला ती क्षणभर विसरली.

" बासाहेब, बिचारी मानकुंवर कुठं बरं गेली ? ती अशी जायची नाहीं. " जसूला न राहवून ती काळजीच्या स्वरानें म्हणाली.

" खरंच. " भानावर येऊन राणी म्हणाली, " मानकुंवर अशी एकदम नाहींशी कशी झाली ? ती आपल्याबरोबर गोमुंडाला येणार असल्याचं तिला माहीत होतं. "

" मला वाटतं बिचारीवर कांहीं अरिष्ट तर नाहीं ओढवलं ? ती आपल्या बरोबर येण्याच्या तयारींतच होती. "

" जसु,मला वाटतं बाप्पाजीनं तर तिला कुठं अडकवून ठेवली नाहीं ना ? " दुःखी स्वरानें राणी म्हणाली.

" मला पण तीच शंका येते ! " श्वास सोडून जसु म्हणाली.

" कोणाला तरी परत पाठवूं कां ? जसु, दुसरा मेणा येतो का म्हणून कोणाला तरी विचार बरं. येत असला तर त्यांत मानकुंवर असेल. " जसूनें मेण्याचा पडदा किंचित् बाजूला सारून जवळच असलेल्या स्वारास विचारलें " दुसरा मेणा मागें कुठं दिसतो कां ? " परंतु जयमल्ल जवळच असल्यामुळें त्याला जसूचें बोलणें ऐकूं येऊन तोच म्हणाला. " तुम्ही काळजी करूं नका मी एका स्वाराला पहायला पाठवितों. " जसूला जरा धीर आला.

गोमुंडागांव चितोडपासून फारसें दूर नव्हतें. चितोडच्या भरभराटीच्या दिवसांत हें गांवहि चांगलें शोभिवंत होतें व अगदीं खेडें नसून त्याची गणना नगरांत होत होती. ही प्रवासी मंडळी मध्यरात्रींपूर्वीच गोमुंडाजवळ आली. गांव आतां अर्ध्या कोसावरच होतें. चांदणें स्वच्छ पडलें होतें थंडीचे दिवस असल्यामुळें कडक थंडी पडली होती, काळसर हिरव्या घनदाट वृक्षांच्या छायेंत

गोमुंडा गांवांची कांहीं उंच उंच घरें व देवीच्या देवळाचें पांढरें शिखर दिसत होतें. प्रवासी मंडळींच्या घोड्यांच्या टापाखेरीज चोहींकडे निःस्तब्ध शांतता पसरलेली वाटत होती.

" स्वार हो ! आतां पुढं जाण्याची जरूर नाहीं." जयमल्ल एकदम हुकमी आवाजानें म्हणाला."आपला कार्यभाग इथंच उरकून घ्यायचा आहे."भोयांनीं राणीचा मेणा खालीं ठेवला. मेणा असा मध्यें का ठेवला म्हणून पडदा दूर सारून राणीनें बाहेर डोकावून पाहिलें. जयमल्ल हातांत उघडी तलवार घेऊन तिच्या मेण्याजवळ आला व कठोरवाणीनें म्हणाला. " राणीसाहेब, राण्याला माझ्या स्वाधीन करा. "

" कां म्हणून ? " झोंपीं गेलेल्या आपल्या बाळाला घट्ट हृदयाशीं धरून राणी सिंहिणीप्रमाणें गर्जून म्हणाली. जयमल्लाचा उद्देश तिच्या लक्षांत यावयाला वेळ लागला नाहीं.

" आमच्या महाराजांची आज्ञा तुम्ही बऱ्याबोलानं राण्याला माझ्या स्वाधीन करणार नाहीं तर मला जबरदस्तीनं त्यांना ओढून घ्यावं लागेल. "

"माझ्या बाळाला मी तुमच्या स्वाधीन करीन ? कधीं नाहीं. माझ्या देहांत प्राण असेंपर्यंत माझ्या बाळाला तुम्ही कसा हात लावतां तें पहाते." राणीचें सर्वांग क्रोधानें कांपत होतें व तिनें आपल्या प्रिय पुत्राला अधिक दाबून धरलें. आपल्या दुष्ट पित्याचा कावा आतां तिच्या लक्षांत आला. या चांडाळाच्या हातून आपल्या बाळाचें कसें रक्षण करावें हें तिला सुचेना ! जिवांत जीव असें-पर्यंत त्याला सोडायचा नाहीं असा तिनें निश्चय केला. राणाहि आतां चांगला जागा झाला होता, परंतु आपल्यावरच्या संकटांची त्याला जाणीव नव्हती. तो मातेच्या कंठाला मिठी मारून म्हणाला. " वा, तुला काय झालं ग ? " राणीचा कंठ भरून आला व तिच्या मुखांतून शब्दोच्चारहि होईना ! जसूलाहि कळलें कीं आतां आपल्या राण्याचा जीव वांचविणें कठीण आहे. परंतु ती अबला असली तरी ती एक रजपुत स्त्री होती.

" सरदारसाहेब, आमच्या जिवांत जीव असेपर्यंत बालराणाजींच्या केंसाला धक्का लागूं देणार नाहीं. " ती जयमल्लास दरडावून म्हणाली.

" चल, थेरडे. तुला कोण विचारतो. " असें म्हणून जसूचा हात धरून तिला हिसकून त्यानें मेण्याबाहेर काढलें. व राणीकडे वळून म्हणाला. " मुकुलजीला माझ्या स्वाधीन करतां कीं नाहीं ? "

" नाहीं, माझा जीव घ्या मग माझ्या बाळाला हात लावा. " ती निश्चयी स्वरानें म्हणाली.

" असं कां ? " असें म्हणून राणीच्या बाहुपाशांतून राण्याला ओढावयास त्यानें हात पुढें केले.

" दुष्टा, माझ्या अंगाला स्पर्श करूं नकोस. तूं राक्षस कीं सैतान आहेस? " असें म्हणत सर्व शक्ति एकवटून तिनें त्याचे हात हिसकून टाकले. " भगवान एकलिंगजी ! माझ्या बाळाचं रक्षण कोण करील ? हे प्रभू ! माझं विधवेचं हें धन पितृरूपी तस्कर चोरून नेणार काय ? देवा ! माझ्या बाळाची तुला करुणा येत नाहीं कां ? माझ्या पाडसाचं रक्षण कोण करील ? " राणीनें करुण स्वरानें हांक फोडली. जसु पुढें येत होती, परंतु जयमल्लाच्या खुणेमुळें दोन स्वारांनीं तिला घट्ट धरून ठेविली. पुनः त्यानें राण्याला धरावयाला हात पुढें केले.

" मेल्या पाप्या, तुझा सत्यनाश होईल.माझ्या बाळाचा घात करूं नकोस. " राणी संतापून म्हणाली.

" पद्मकुमारी, मला कां शिव्या देतेस ? तुझ्या लोभी पित्याला शिव्या दे. मला तुझ्या मुलाला या जगांतून नाहींसा केलाच पाहिजे. " म्हणून त्यानें बालराण्याचा हात जोरानें धरला.

" देवा, देवा ! माझ्या बाळाचं आतां तूंच रक्षण कर. " राणी उच्च स्वरानें म्हणाली.

" भिऊं नका. बासाहेब, माझ्या देहांत प्राण असेपर्यंत बालराण्याच्या केंसाला भीति नाहीं " एकदम एक तरुणवीर पुढें झाला व त्यानें जयमल्लावर प्रहार केला. तरुण वीर संग्राम होता हें कळतांच राणीला जरा धीर आला.असा अकस्मात् हल्ला झाल्यामुळें जयमल्ल आश्चर्यानें संग्रामाकडे पाहूं लागला व हा भूत होऊन आला कीं काय असें क्षणभर त्याला वाटलें. परंतु लागलाच सावध होऊन त्यानें संग्रामचा दुसरा प्रहार चुकविला. तरीपण संग्रामानें आणखी एक चपळपणानें जोराचा प्रहार केल्याबरोबर जयमल्लाची तरवार दूर जाऊन पडली. हें इतक्या अल्पावकाशांत घडून आलें कीं, इतर स्वार आश्चर्यानें पहातच राहिले.

संग्राम गर्जून म्हणाला. " वीर हो, ज्यानें चितोडचें अन्न खाल्लें असेल तो या वेळीं बालराण्याच्या रक्षणाला धांवून येईल. " त्याबरोबर त्या पन्नास स्वारांच्या टोळींतून पंधरासोळा मंडळी संग्रामाच्या बाजूला एकदम वळली. ते चितोडचे रजपुत होते आणि रणमल्लाचे अंकित असले तरी आपल्या राण्यावर प्राणसंकट येतांच ते उलटले. आपल्या मदतीला इतकी मंडळी आली याचेंच संग्रामाला समाधान वाटलें. तो त्यांना उद्देशून म्हणाला. "वीर हो, जीवाची आशा करूं नका. तुमच्या राजाचें रक्षण करणं तुमचं कर्तव्य आहे. या उपटसुंभ मारवाड्यांना कापून काढा. ज्यांचं निमक खाल्लंत त्यांना सहाय्य करा. यांपैकीं एकालाहि परत चितोडांत जाऊं देऊं नका. चला, भगवान् एकलिंगजी की जय ! " म्हणतांच पंधरा सोळा मंडळींच्या कंठांतून तेच शब्द निघाले व ते त्वेषानें त्या मारवाड्यांवर तुटून पडले. घटकाभर युद्धाची धुमश्चक्री चालली. संग्राम आपल्या मंडळीला प्रोत्साहन देतच होता, परंतु मारवाडी सैन्य संख्येनें अधिक असल्यामुळें शेवटीं संग्रामसिंहाला माघार घ्यावी लागणार असें दिसूं लागलें. कारण त्याच्या लोकांपैकीं पाचसात जखमी होऊन खालीं पडले. दहा बारा लोकांनिशीं भिडणें मुष्किलीचे होतें.

" वीर हो ! शूर चितोडच्यांनो, मारूं किंवा मरूं पण या परक्या गिधाडांनां येथल्यायेथें गाडून टाकूं. भगवान एकलिंगजी की जय ! " दहा बारा मंडळींनीं उत्साहानें जयनाद केला ! " भगवान एकलिंगजी की जय ! " दूर अंतरावर तोच नाद ऐकूं आला. "भगवान् एकलिंगजी की जय ! " आपल्या गर्जनेचा हा प्रतिध्वनि आहे असें संग्रामास वाटलें. पुनः तो आवेशानें तेच शब्द बोलला व पुनः " भगवान् एकलिंगजी की जय " गर्जना ऐकूं आली. प्रत्येक झाडापानांतून, चारी दिशेला वर आकाशांत आणि खालीं जमिनींत तोच जयनाद घुमत असावा असें राणीला व संग्रामालाहि वाटूं लागलें. इतक्यांत बाजूच्या झाडींतून कांहीं घोडेस्वार पुढें आले. एक दोन येता येतां चाळीस स्वारांची टोळी पुढें आली. सर्वांपुढें असलेल्या नायकानें पुनः जयनाद केला 'भगवान् एकलिंगजी की जय!"तो प्रदेश त्याच जयनादांत क्षणभर दुमदुमून गेला! नायक पुढें झाला व संग्रामाला उद्देशून म्हणाला. " संग्राम, नेटानें लढा, आम्हीं तुमच्या मदतीला आलों आहोंत. या परक्यांना कापून काढा. " बोलणाऱ्या व्यक्तीला प्रथम संग्रामानें ओळखलें नव्हतें. कारण या नवीन



"लढाई बंद करा." चंद्रसिंह मोठ्यानें ओरडून म्हणाला. "संग्राम, या सर्व मारवाड्यांना कैद करा."

[ पान १४७.

आलेल्या स्वारांनीं बुकान्या[1] बांधल्या होत्या. त्यामुळें त्यांचे अर्धे चेहरे झांकून गेले होते. प्रथम त्याला संग्रामसिंह ओळखूं शकला नाहीं. पण शब्दावरून तो कुमार चंद्रसिंहच आहे हें त्याला कळावयाला उशीर लागला नाहीं. आतां त्याला विलक्षण स्फुरण चढलें. तो मोठ्यानें गर्जना करून म्हणाला, " वीरांनो, आतां मुळींच भिऊं नका. कुमार चंद्रसिंह आपल्या मदतीला आले आहेत. जय भगवान् एकलिंगजी कीं जय ! कुमार चंद्रसिंहजी की जय ! राणा मुकुलजी की जय ! " तीव रणगर्जना चाळीसपन्नास स्वारांच्या कंठांतून निघाली व दूरवर नाद पसरला. नवीन आलेले स्वार या मारवाड्यांवर तुटून पडले.

जयमल्लास आतां खरी वस्तुस्थिति कळून आली. चंद्रसिंहापुढें आपल्या मंडळींचा निभाव लागणार नाहीं हें तो समजून चुकला. पण आतां माघार घेणें ठीक नाहीं म्हणून तो त्वेषानें संग्रामवर तुटून पडला. संग्रामच्या मानेवर तो जोराचा प्रहार करणार, तोंच चंद्रसिंहानें त्वरा करून त्याच्या हातावर सफाईनें वार केला. त्याबरोबर तलवारीसह त्याचा हात दूर उडून पडून जयमल्ल बेशुद्ध होऊन खालीं पडला ! जयमल्लाला पडलेला पहातांच इतर मारवाडी घाबरून गेले. त्यांनीं पटापट शस्त्रें खालीं टाकलीं. " अभय, अभय ! कुमारसाहेब, आम्हाला अभय. " ते चंद्रसिंहाला शरण आले.

" लढाई बंद करा. " चंद्रसिंह मोठ्यानें ओरडून म्हणाला. " संग्राम, या सर्व मारवाड्यांना कैद करा. " त्याचा हुकूम होतांच क्षणांत त्या सर्वांना कैद करण्यांत आलें. जयमल्लालाहि कैद करण्यांत आलें. भयभित व स्तंभित अशा राणीकडे आतां तो वळला. राणीनें अद्याप आपल्या पुत्राला हृदयाशीं कवटाळून धरलें होतें. चंद्रसिंह मदतीला आल्यामुळें तिला हर्ष झाला होता, परंतु पुढच्या परिणामाकडे ती सभयपणें पहात उभी होती. चंद्रसिंहानें राणीजवळ जाऊन प्रथम तिला व नंतर बाळराण्याला प्रणाम केला. राणीनें मुकुलजीला धरून चंद्रसिंहाच्या हातीं देत सद्गदित अंतःकरणानें म्हटलें. " कुमार, हा चितोडचा राणा नसून तुमचा लहानगा भाऊ आहे, याचें रक्षण आतां तुम्हीच करा.. " तिच्यानें पुढें बोलवेना !

"बासाहेब, मुकुलजी माझा भाऊच आहे अन् चितोडचा महाराणा पण आहे

---

१ हनुवटीखालून वर डोक्याला बांधलेले रुमाल.

माझ्या जीवांत जीव असेपर्यंत मी त्यांचें रक्षण करीन. मी बाप्पाजींना वचन दिलेलं आहे त्यांत अंतर पडूं देणार नाहीं. " त्यानें मुकुलजीला दोन्ही हातांनीं उचलून आपल्या हृदयाशीं स्नेहभरानें धरलें. आपल्या ' मोठाभाईला त्यानें ओळखलें. आनंदानें त्याच्याः गळ्याला मिठी घालून तो म्हणाला."मोठाभाई, तुम्ही कुठं गेला होतां ? मी तुमची रोज वाट पहात होतों. माझ्यावर रागावलां होतात ?"

" नाहीं. नाहीं." चंद्रसिंहाचा कंठ भरून आला. ममतेनें त्याच्या पाठी-वरून तो हात फिरवीतच राहिला. गहिंवरल्यामुळें त्याला पुढें बोलवेना.

" कुमार, कुमार, माझ्यामुळं तुम्हाला चितोड सोडून जावं लागलं. कुमार, मला क्षमा करा; मी अपराधिनी आहे. "राणी करुण वाणीनें म्हणाली, " कुमार, हा बाळ तुमचा आहे; अन् चितोडहि तुमचंच आहे. तुम्हाला वाटेल तसं त्याचं रक्षण करा; मी पुनः मूर्खपणा करणार नाहीं. " तिला पश्चात्ताप झालेला दिसत होता.

"बासाहेब, झालं ते गेलं,आतां मनांत आणायचं नाहीं.प्रथम शत्रू चितोडांतून बाहेर काढले पाहिजेत. " तो संग्रामकडे वळून म्हणाला. " संग्राम, चला, प्रथम गोमुंडांत जाऊं, या कैद्यांना तिथं बंदोबस्तांत ठेवून राणाजीलाहि सुरक्षित जागीं ठेवून आतांचें आतां चितोडांत पोंचलं पाहिजे. उजाडण्यापूर्वी एकहि परका शत्रू चितोडांत राहूं द्यायचा नाहीं. "

नंतर सर्व गोमुंडागांवांत गेले. गांवच्या मुख्याधिकाऱ्याला चंद्रसिंहानें बोलाविलें.राणी व बालराणा यांना नीट सुरक्षित स्थळीं ठेवून व कैद्यांचा बंदो-बस्त करून थोडेसे लोकहि त्यांच्या रक्षणासाठीं ठेवले. बाकीच्या लोकांना घेऊन ते चितोडकडे निघाले.इतकें होईपर्यंत रात्रीचे तीन प्रहर उलटून गेले होते. त्यांनीं वेगानें घोडे सोडले व शक्य तितक्या लवकर ते चितोडच्या वेशी-जवळ आले. तेथें थोडेच पहारेकरी होते त्यांना कापून काढून ही मंडळी चितोडच्या रामपोल सिंहाद्वाराशीं आली तेथें मात्र कडक पहारा होता. पंधरावीस सशस्त्र मारवाडी जागरूकतेनें पहाऱ्याचें काम करीत होते. या टोळीला पहातांच मुख्य पाहारेकऱ्यानें रोंकलें, "तुम्ही कोण ! कुठून आलांत?"

" आम्ही राणा मुकुलजींच्या बरोबर गेलेली मंडळी आहोंत, 'महाराजांचा हुकूम बजावून आतां त्यांना भेटायाला जात आहोंत, " धीटपणानें चंद्रसिंहानें

उत्तर दिलें. त्यांचे चेहरे पुरे दिसत नव्हते पोषाखहि मारवाड्यासारखेच असून संख्येनेंहि गेलेल्या मंडळींयेवढीच ही मंडळी असल्यामुळें पहारेकऱ्यांना विशेष संशय आला नाहीं. त्यांनीं यांना आंत जाऊं दिलें. सर्व स्वार घाईनेंच आंत शिरले !

## प्रकरण ३४ वें

# आसुरी लालसा

महाराणा लाक्षाजीच्या शयनखंडांत एका स्त्रीला तेथल्याच पलंगाच्या पायाला हातपाय बांधून ठेवलेली होती व तिच्या तोंडात बोळा कोंबला होता. ती दुर्दैवी स्त्री दुसरी कोणी नसून बिचारी मानकुंवरच होती. हातपाय जखडल्यामुळें ती बसल्या जागेवर तळमळत सुटण्याचा प्रयत्न करीत होती, परंतु तिचा सर्व प्रयत्न फुकट जाऊन आतां ती रडूं लागली. तिची ही करुण स्थिति पहावयाला तेथें कोणीच नव्हतें.

राणीच्या बरोबर ती गोमुंडाला जावयाला निघाली. राणी व जसु निघताच तीहि त्यांच्याबरोबर बाहेर पडणार होती. परंतु रणमल्ल दारांत उभा होता. त्यानें राणीला व जसूला बाहेर जाऊं दिलें. नंतर तो मुद्दामच रस्ता अडवून उभा राहिला. जाण्याच्या घाईमुळें राणीच्या लक्षांत त्याचा उद्देश आला नाहीं. रणमल्ल जरा दूर सरकला म्हणजे आपण बाहेर पडूं, म्हणून मानकुंवर क्षणभर मागेंच उभी राहिली. राणी व जसु पुढें जातांच रणमल्लहि त्यांच्या मागोमाग गेला त्याबरोबर मानकुंवर दाराबाहेर पडली, परंतु तितक्यांत कोणाचा तरी राकट हात तिच्या मुखावर ठेवला गेला आणि तिचे दोन्ही हात मागच्या मागें बांधण्यांत आले. हा प्रकार इतक्या अल्पावकाशात घडला कीं; काय झालें हें क्षणभर मानकुंवरलाहि कळलें नाहीं. जेव्हां तिच्या तोंडांत बोळा घालून एका दांडगेश्वरानें तिला तेथून उचलून नेलें तेव्हां, आपल्यावरच्या भयंकर संकटाची तिला कल्पना आली. लाक्षराण्याच्या शयनखंडांत तिला पलंगाला जखडून टाकल्यानंतर तिच्यापुढें जयमल्ल आला. तो तिच्या त्या असहाय स्थितींत तिच्याकडे पाहून बेशरमपणें हसत होता. तिचा संतापाग्नि भडकून गेला परंतु ती दीन हरिणी या लांडग्याच्या हातांत पुरतेपणीं सांपडली होती.

"कां, मानकुंवर, आतां तुझा तोरा कुठं गेला?" निर्लज्जपणें हसत तो म्हणाला. "सतीत्वाचा मोठा गर्व वहात होतीस नाहीं, आतां काय करणार तूं? जशा चितोडच्या सर्व स्त्रिया सती. पद्मिनी लागून गेल्यात खरं ना?" मानकुंवर उत्तर काय देणार? तोंड बांधून हा मर्मभेदक शब्दाचा मार तिला निमूटपणें सहन करावा लागत होता. तिनें त्याच्याकडे तिरस्कारानेंच फक्त पाहिलें. 'यावेळीं तुझं वाटेल तें मला करतां येईल समजलीस? पण मला दुसऱ्या महत्त्वाच्या कामाला जायचं आहे. मी तिकडून आलों म्हणजे जरूर तुझी भेट घेईन. अन् सध्यां तूं आमची राणीसाहेब आहेस. आमच्या राजेसाहेबांना खूष करा राणीसाहेब." टोंचून उपहासानें तिला म्हणून जयमल्ल तेथून निघून गेला. आपल्या वरच्या भयंकर संकटाची तिला चांगली कल्पना झाली. चांडाल रणमल्ल येण्यापूर्वी तेथून सुटण्यासाठीं ती धडपडूं लागली, परंतु घट्ट बांधल्यामुळें तिचा उपाय चालला नाहीं. तशीच जागेवर ती पडून राहिली व कोठें जरा खुट्ट झालें कीं रणमल्ल आला कीं काय अशी तिला धास्ती वाटूं लागली!

अर्ध्या रात्रीनंतर कोणीतरी दरवाजा उघडीत आहे असें तिला वाटलें. तिनें भयभीत होऊन दरवाज्याकडे पाहिलें; यमदूतासारखा रणमल्ल तिच्या दृष्टीस पडला! रणमल्लानें आकंठ मदिरापान केलें होतें, असें त्याच्या तारवटलेल्या नेत्रावरून दिसत होतें. मदिरेचें सेवन करून आतां त्याला मदिराक्षीची जरूर भासूं लागली. रणमल्लाचे केंस पांढरे झाले होते, पण त्याचें अंतःकरण काळेकुट्ट होतें! पहिल्यापासूनच मानकुंवरवर त्याचा डोळा होता. ती त्याची आसुरी लालसा त्याला आज पूर्ण करून घ्यावयाची होती. आपल्या कुटिल कारस्थानाला अपेक्षेबाहेर यश आल्यामुळें तो हर्षनिर्भर झाला होता. आपण आतां या मेवाडभूमीचे स्वामी झालों याचा त्याला अभिमान वाटत होता. जयमल्ल मुकुलला ठार मारणारच याची त्याला खात्री होती. जोधरावला आपल्या बाजूला वळवून घेऊन आपल्या मर्जीप्रमाणें करावयास त्यानें लावलें होतें. सूर्योदयापूर्वी जयमल्ल मुकुलचा वध करून येईल व आपण उद्यांच्या उद्यां चितोडच्या सिंहासनावर बसूं. कोणी अडथळा केल्यास त्याला शिक्षा करावयाला कितीसा वेळ लागणार आहे? कोणी दगा करील तर त्याला ताबडतोब ठार करण्याचा त्यानें आपल्या सरदारांना हुकूम देऊन ठेवला होता

चितोडचे बहुतेक लोक आपल्याला अनुकूल आहेत असेंच त्याला वाटत होतें. आपल्या नातवाचा वध करून आपण महाराणापद मिळविणार या आनंददायक कल्पनातरंगांत तो तरंगत होता. मनुष्याला शक्य तितकीं सुखें उपभोगून घ्यावयाचीं असें त्यानें मनांत आणलें. आनंदाच्या तरंगांनीं त्याचें हृदय उचंबळून येत होतें. तसेंच मदिरेच्या कैफामुळें त्याचें सर्वांग हवेंत तरंगत होतें. कैफाच्या आणि राज्यमदाच्या धुंदीनें तो एका निरपराध साध्वी स्त्रीच्या अब्रूवर दरवडा घालावयास आला. रणमल्लाला तशा आसुरी स्थितींत पहातांच बिचाऱ्या मानकुंवरचें काळीज फाटून गेलें ! या नराधमाच्या हातून आपली सुटका कशी होईल ? त्याचें तिला भय वाटूं लागलें. ती दीनवदनानें त्याच्याकडे पाहूं लागली.

रणमल्लानें जवळ येऊन तिच्या तोंडांतला बोळा काढून टाकला व हंसून तो म्हणाला, " मानकुंवर, त्या जयमल्लानें असा शृंगार तुला चढवून ठेवला अं ? जाऊं दे. आतां तरी तूं प्रसन्न होशील कां ? बघ, मी आतां मारवाडचाच राजा नसून पण समस्त मेवाडचा महाराणा झालों आहे. "

" महाराज, या गरीब अबलेला कां छळतां ? " मानकुंवर काकुळतीनें रडत रडत म्हणाली. " मला तुम्ही मुलगी म्हणाला आहांत. या अभागिनीचा अंत पाहूं नका. महाराज, आता तुम्हीच माझें रक्षण करूं शकाल. मला धर्मकन्या समजा. "

" हं. हं. " विकट हास्य करीत रणमल्ल म्हणाला. "अग, पोटच्या मुलीला मी मुलगी समजत नाहीं तर तुझी काय बिशाद ? नाहीं. मानकुंवर, तुला माझें ऐकलंच पाहिजे. अग, माझी मर्जी प्रसन्न झाल्यावर तुला कोणत्याच सुखाचा तोटा नाहीं. " असें म्हणत तो पुढें झाला.

"चांडाळा, सैताना, दूर हो ! " दांत ओठ खाऊन संतापून ती ओरडली. त्या बंधनांतून तिला आपली सोडवणूक करून घेतां आली नाहीं ! अखेरीस त्या दुष्ट सैतानानें एका पवित्र कुमारिकेचा बळी घेतला ! मानकुंवरनें परमेश्वराची पुष्कळ करुणा भाकली, पण परमेश्वराला गाढ निद्रा लागली होती ! तिनें आपल्या सर्व शक्ति एकवटून त्या सैतानाचा प्रतिकार केला, परंतु त्या क्षीण ठरल्या. मानवी सैतानाचा जय होऊन पवित्र देवतेचा पराजय झाला ! शिव ! शिव ! !

मध्यरात्र उलटून गेली होती, जिकडे तिकडे शांतता पसरली होती. आपल्या सर्व इच्छा तृप्त झाल्यामुळें रणमल्लास परमानंद झाला होता. दारूच्या निशेमुळें त्याचीं सर्व गात्रें चैतन्यशून्य बनलीं होतीं. त्याला गाढ झोंप लागली होती. मानकुंवर हळूच उठली, तिचे बंद त्यानें केव्हांच सोडले होते. तिचें सर्वांग क्रोधानें कंप पावत होतें. तिच्या डोळ्यांत आतां अश्रु नव्हते पण अग्नीचे कण होते. तिची देहयष्टि नाजूक होती, पण आतां त्या देहात वज्राची कठोरता आली होती; तिच्या हातांत शस्त्र नव्हतें; परंतु तिच्या हृदयांत झालेल्या जखमेमुळें ती भयंकर चिडली होती. महालाच्या पश्चिमेकडच्या खिडकींतून चंद्रप्रकाश आंत येत होता. विश्वांत सर्वत्र शांतता नांदत होती. पंचमहाभूतांनीं शांत स्वरूप धारण केलेलें होतें. परंतु मानकुंवरच्या हृदयांत घनघोर अंधःकार पसरला होता व पंचप्राणांचा भयंकर खळबळाट उसळला होता !

मानकुंवरनें उठून तेथेंच पडलेली रणमल्लाची मारवाडी पगडी उचलली व त्या साठ[1] हाताच्या लांब चिंधीनें तिनें हळूहळू त्याचा साडेतीन हात देह भक्कम जखडून पलंगाला बांधून टाकला. तरी त्याच्या मदांध डोळ्यावरचा मद उतरला नाहीं. आपण अप्सरेबरोबर विमानांत बसून स्वर्गांत विहार करीत आहोंत असें त्याला सुखदायक स्वप्न पडत होतें. त्याच वेळीं मानकुंवरनें त्याच्या हृदयावर एक लत्ताप्रहार हाणून त्याला जागा केला. त्यानें चटकन डोळे उघडले. मानकुंवरकडे पाहून तो आश्चर्यानें म्हणाला, " मानकुंवर, मला कसं छान स्वप्न पडत होतं; आपण स्वर्गांत विमानांत बसून विहार करीत आहोंत म्हणून. "

" होय. दुरात्म्या, लवकरच तुझी स्वर्गांत बोळवण करतें समजलास ? "

क्रोधभरानें दुसरा एक लत्ताप्रहार तिनें त्याच्या छाताडांत मारला. आतां आपल्याला बांधून ठेवल्याचें त्याला ज्ञान झालें.

"अरे वा ! मानकुंवर, मघाच्या बंधनाचं आतां तूं हें उसण घेतेस वाटतं ?" तो निर्लज्जपणें हंसूं लागला.

" दुष्टा, हें उसण कांहींच नाहीं. आतां मी असं उसण घेणार आहे कीं मेल्या-नंतरहि तुला त्याची चांगली आठवण राहील समजलास? पहिल्यानें तुझ्या त्या

( १ मारवाड्यांची पगडी साठ हात लांब असे. ) भिक्षु अखंडानंदकृत राजस्थानचा इतिहास.

काळ्या फत्तरासारख्या काळजाचे तुकडे तुकडे करून या माझ्या अपवित्र देहाचा शेवट करून घेईन. पाप्या, मांग हृदया, तुला चितोडचं सिंहासन भोगायचंय होय ना? आतां नरकपुरीचं राज्य भोग!" मानकुंवर दांतओठ खाऊन म्हणाली.

"मानकुंवर, तूं थट्टा तर नाहीं करीत?" कांहींसा घाबरून रणमल्ल म्हणाला.

"थट्टा? थट्टा? बघ, बघ, डोळे फाडून बघ. तुझी दारूची धुंदी उतरली असली तर नीट शुद्धीवर येऊन बघ. दुष्टा, माझ्याजवळ शस्त्र नाहीं; नाहीं तर केव्हांच तुझे पंचप्राण तुझ्या या काळ्या हृदयांतून निघून गेले असते. पण आतां इथल्या या पितळी समईनं तुझं मस्तक ठेंचून ठेंचून तुझा जीव घेईन. अन् मरतांना तुला ज्या वेदना होतील त्या पाहून मला अंशतः तरी समाधान वाटेल. तुझ्या देहांतल्या लाल रक्तानं तुझं काळं हृदय धुऊन निघेल."रणमल्लास मानकुंवर यावेळेस भयंकर दिसूं लागली. ती स्त्री नसून कोणी तरी पिशाच्चिनी आहे असें त्याला वाटलें. त्याची धुंदी आतां साफ उतरली व तो तिच्याकडे भयभीत नजरेनें पाहूं लागला.

"मानकुंवर, मला क्षमा कर. मी तुझा अपराध केला खरा पण मला आतां सोडून दे." तो विनवणीनें म्हणाला.

"सोडून देऊं?" भेसूर हंसून ती म्हणाली. "नाहीं. तुझा मुडदा पाडीन तेव्हांच मला थोडंसं समाधान वाटेल." ती करकर दांत खात होती. पूर्वींची मानकुंवर ती नसून आतां ती कराल माया बनली होती! तेथें जळत असलेल्या चार समयांपैकीं एक तिनें उचलली व त्याच्या डोक्यांत घाव घालावयास ती आली. इतक्यांत दाराबाहेर बऱ्याच लोकांचा गलबला ऐकूं आला व दारावर जोरजोरानें प्रहार होऊं लागले. तिनें समई खालीं ठेवली. ती आश्चर्यानें दाराकडे पाहूं लागली.

"दार उघडा." कोणीतरी कठोरपणानें म्हणालें.

## प्रकरण ३५ वें

# कर्माचें फळ

" उघडत नसेल तर फोडा दरवाजा ! " हुकूम होतांच दारावर जोराचा प्रहार झाला. मानकुंवरनें चटकन् दार उघडलें. सर्वांच्या पुढें कुमार चंद्रसिंह होता. त्याच्या हातांतली तलवार विद्युल्लतेप्रमाणें चमकत होती. त्याच्या मागें दहाबारा सशस्त्र लोक होते.

" कुठं आहे तो चोर ? कुठं आहे तो मारवाडी ? " चंद्रसिंह ओरडून म्हणाला. त्याला ओळखतांच मानकुंवर जरा बाजूला झाली व तिनें आपल्या ओढणीनें आपलें कलंकित मुख झांकून घेतलें. दरवाजा उघडतांच सर्व मंडळी आंत घुसली. आतां येथें उमें रहाण्यांत अर्थ नाहीं. कुमार या पाप्याला प्रायश्चित्त दिल्याशिवाय रहाणार नाहींत. असें जाणून मानकुंवर झटकन् बाहेर निघून गेली. रणमल्लाला तसा पलंगाला जखडून बांधलेला पहातांच सर्वांस विलक्षण आश्चर्य वाटलें !

त्याच्या हृदयावर आपल्या तलवारीचें टोंक ठेवून चंद्रसिंह म्हणाला. " कपट्या, घातक्या, चितोडचं सिंहासन तुला पाहिजे ना ? थांब. तुला लवकरच स्वर्गांत पाठवितों. नराधमा, धिःक्कार असो तुला. राज्यलोभानं तूं प्रत्यक्ष आपल्या नातवाचा खून करूं पहात होतास ? तुझ्यासारखा पापी चांडाळ अखिल भूमंडळात कोणी नसेल. "

असा काळासारखा अकस्मात् चंद्रसिंहाला आपल्या समोर पाहून रणमल्लासहि आश्चर्य वाटलें. आपला मृत्यु जवळ आला हें तो समजून चुकला. परंतु तशाहि स्थितींत तो चंद्रसिंहाला म्हणाला. " चंद्रसिंह, मी निःशस्त्र आहे, म्हणून वाटेल तसं तूं बोलून घेतोस, अन् मला ठार मारशीलहि. तूं जर खरा क्षत्रिय वीर असलास तर माझ्या हातांत शस्त्र देऊन माझ्याशीं लढाई करशील. "

" दुष्टा, मी क्षत्रिय कुळाला काळिमा आणणारें वर्तन कधींहि करणार नाहीं समजलास ? तुझी तशी इच्छाच असली तर तुझ्याशीं लढायला मी तयार आहे. " नंतर चंद्रसिंहानें आपल्या तलवारीनें त्याचे बंध कापून टाकले. "द्या रे,कोणाची तरी तरवार ? " त्याचा हुकूम होताच एकानें आपली तरवार रणमल्लास दिली व दोघांचें क्षणभर भयंकर द्वंद्व झालें. मारूं किंवा मरूं अशा

निश्चयानें दोघे लढत होते. रणमल्ल कसलेला योद्धा होता. त्याच्या एका प्रहारानें चंद्रसिंहाच्या डाव्या खांद्याला एक जखम झाली व त्यांतून रक्ताची धार लागली, परंतु आपल्या जखमेकडे लक्ष न देतां, त्यानें त्वेषानें रणमल्लावर हल्ला केला. एक घाव त्याच्या मर्मी लागून रणमल्ल जमिनीवर कोसळला ! तो खालीं पडताच चंद्रसिंहाच्या नांवाचा सर्वांनीं जयघोष केला. रणमल्लास त्याच्या पापाचें प्रायश्चित्त मिळालें! त्याची राज्यभोगाची इच्छा जागच्या जागींच राहून गेली. रक्तस्रावानें चंद्रसिंहास ग्लानि येऊन तो क्षणभर तेथेंच बसला. संग्राम वगैरे मंडळींनीं त्याची जखम धुऊन ताबडतोब बांधून टाकली.

क्षणभरानें तो लागलाच उठून म्हणाला. "संग्राम, चला, सूर्योदयापूर्वी या सर्व परक्या कावळ्यांना मेवाडच्या हद्दींतून हांकून दिलें पाहिजे."

"कुमार, आपण थोडा वेळ विश्रांति घ्या." संग्राम म्हणाला.

"संग्राम, ही वेळ विश्रांतीची नाहीं. प्रथम या मारवाड्यांना हांकून देईन तेव्हांच माझ्या मनाला खरी विश्रांति मिळेल." इतकें म्हणून रणमल्लाच्या रक्तानें लाल झालेली तलवार घेऊन तो बाहेर पडला व त्याच्या बरोबर सर्व मंडळी निघाली. राजावाड्यांत जो मारवाडी दिसला त्याची त्यांनीं कत्तल चालविली. रणमल्ल गतप्राण झाल्याचें कळताच त्याचे लोक भयभीत झाले, व राजवाड्याबाहेर पळूं लागले. परंतु चंद्रसिंहाच्या हुकुमावरून त्यांना जागच्या जागींच ठार करण्यांत आलें. जे थोडे उरले ते शरण आले व त्यांना कैद करून ठेवण्यांत आलें. आतां चंद्रसिंह राजवाड्याबाहेर पडला. रामपोल दरवाजाशीं येऊन त्यानें तेथल्या मारवाडी पहारेकऱ्याना कापून काढून तो मार्ग मोकळा केला. इतक्यांत रामसिंग, करणसिंग वगैरे सरदार शेंदोनशें लोक घेऊन चंद्रसिंहाला मिळाले. उजाडण्यापूर्वींच या चितोडच्या शूर वीरांनीं व चंद्रसिंहाबरोबर आलेल्या चाळीस पन्नास राजदुर्गकरांनीं मारवाड्यांपासून सर्व ठाणीं हस्तगत करून घेतलीं.

सूर्योदय होतांच नगरांत जिकडेतिकडे गडबड उडून गेली. रणमल्लाचा अंत व कुमार चंद्रसिंहाचें आगमन या गोष्टी सर्व चितोडवासीयांस कळल्या. आपल्या कुमाराच्या आगमनानें सर्वांस हर्ष झाला. रणमल्लाचे पक्षपाती शक्य तितक्या त्वरेनें त्याचा मुलगा जोधरावाला जाऊन मिळाले आणि चितोडचे स्वाभिमानी लोक चंद्रसिंहाच्या निशाणाखालीं एकत्र झाले. जे कांहीं

चितोडचे सरदार रणमल्लास अनुकूल होते ते लज्जित होऊन चंद्रसिंहाला शरण आले. पुढील कालावर दृष्टि देऊन चंद्रसिंहानें त्या सर्वांस क्षमा करून पूर्वीच्याच मानाप्रमाणें वागविण्याचें आश्वासन दिलें व आपल्या सैन्यांत दाखल करून घेतलें. रणमल्लाच्याच पक्षांत जे होते यांना देहांत शासन केलें.

जोधरावला आपल्या पित्याचें कृत्य जरी पसंत नव्हतें, तरी पुत्रधर्माप्रमाणें याचा सूड घेतला पाहिजे असें वाटून तो संग्रामाला सिद्ध झाला. परंतु चंद्रसिंहाचें बळ आतां अधिक झाल्यामुळें जोधरावला युद्धांत यश न येतां उलट पराजय पावून तेथून पळ काढावा लागला. स्वतः चंद्रसिंह त्याचा पाठलाग करूं लागला. जोधवरावाला मेवाडच्या प्रदेशांतूनच नव्हे परंतु त्याच्या मारवाडांतहि चंद्रसिहानें राहूं दिलें नाहीं. त्यानें त्वेषानें सर्व मारवाड लुटून आपल्या मेवाडला जोडून घेतला. जोधराव एका पहाडांत पळून गेला. त्याला आपल्या दुष्ट पित्याच्या पापाचें प्रायाश्चित्त भोगावें लागलें! पाप्यांना त्यांच्या पापाचें प्रायश्चित्त भोगावें लागतेंच. परंतु त्यांच्या वंशजालाहि त्या दुष्कृत्यांचे शिंतोडे भोंवतात!

आपल्या एका सरदाराला मंदोरला ठेवून कुमार चंद्रसिंह तांतडीनें चितोडास आला. त्याला अद्याप राजदुर्गाकडेहि जावयाचें होतें. चितोडांत येतांच त्यानें मोठ्या इतमामानें राणी व बाल राणाजी यांना गोमुंडाहून नगरांत आणलें. नगर शृंगारण्यांत आलें होतें व राण्याचें स्वागत मोठ्या समारंभानें आणि हर्षानें नगरवासीयांनीं केलें. नगरप्रवेशानंतर चितोडच्या सर्व सरदार सामंताचा मोठा दरबार भरविण्यांत आला व स्वतः चंद्रसिंहानें आपल्या लहानग्या बंधूला पुनः सिंहासनावर बसविला. या समारंभाला राणी स्वतः हजर राहिली होती. आपला पुत्र सुखरूपपणें पुनः सिंहासनावर बसलेला पाहून तिला समाधान वाटलें व याचें सर्व श्रेय चंद्रसिंहास आहे हें ती विसरली नाहीं. तिनें रामसिंगाकडून चंद्रसिंहाचा गौरव करविला व पूर्वी त्याला दिलेला साळुंब्राप्रांत त्याच्याचकडे दिल्याचें आणि राणाजीच्या खालोखाल साळुंब्राधिपतीचा मान राहील असें जाहीर केलें. मुकुलजीचे वंशजहि ही प्रथा चालवितील अशी त्याच्या जवळून विधिपूर्वक शपथ घेतविली, तसेंच राणा वयांत येईपर्यंत चितोडच्या राण्याचें व सिंहासनाचें रक्षण चंद्रसिंहानें

करावें अशी इच्छा प्रदर्शित केली. चंद्रसिंहानें त्याप्रमाणें शपथ घेतली. नंतर सर्वांस बहुमानपूर्वक शस्त्रें, वस्त्रें देऊन सर्वांनीं बाळराण्याचें रक्षण करावें म्हणून तलवारीवर हात ठेवून भगवान एकलिंगजीच्या शपथा घेतल्यावर दरबार खलास झाला.

राणी मानकुंवरला विसरली नव्हती. तिनें तिचा पुष्कळ तपास केला पण तिचा पत्ता लागला नाहीं. जसूची खात्री होती कीं तिनें आपल्या जिवाचें कांहीं तरी करून घेतलें असलें पाहिजे.

दरबारचें काम आटोपून चंद्रसिंह आपल्या चंद्रमहालांत आला. राजदुर्गाकडे जावयाला निघावयाचें याचा विचार करीत क्षणभर विश्रांती घेण्यास बसला. इतक्यांत वृद्ध मेरामण तेथें आला. आपल्या बापूला पुनः चितोडांत परत आलेले पाहून त्याला विलक्षण आनंद वाटत होता.

" बापू, पुनः तुम्ही या म्हाताऱ्याच्या दृष्टीस पडाल असं मला वाटत नव्हतं." असें म्हणून भक्तिभावानें त्यानें आपल्या मस्तकावरची पाघडी काढून चंद्रसिंहाच्या पायावर ठेवली.

" मेरा, हें काय ? " असें म्हणत चंद्रसिंहानें स्वहस्तानें ती पाघडी पुनः त्याच्या मस्तकावर ठेवली. तो हंसून म्हणाला. " मेरा, मी कुठं स्वर्गांत का गेलों होतों ? "

" बापू-बापू, असं अभद्र बोलूं नका, " आपल्या कानावर हात ठेवून मेरामण म्हणाला. " बापू, तुमच्यासाठीं या जीर्ण देहांत माझे प्राण अद्याप अडकून राहिले आहेत. नाहीं तर हा जीर्ण देह केव्हांच कोसळून पडला असता."

" नाहीं. मेरा, अद्याप तुला जगलं पाहिजे. "

" मेराकाका, कुमार चंद्रसिंहांच्या छोट्या बापूला तुमच्या पांढऱ्या दाढीशीं अद्याप खेळायचें आहे. " आंत येत संग्रामसिंह हंसत म्हणाला.

" तेवढं कुठं माझं भाग्य आहे ? " मेरा श्वास सोडून म्हणाला. " तेवढीच या म्हाताऱ्याची एक इच्छा होती. " तो चंद्रसिंहाकडे पाहूं लागला व चंद्रसिंहाच्या मुखावर त्याला स्मित दिसलें.

" मेराकाका, तुमची ती इच्छा लवकर पूर्ण होणार आहे बरं ? " संग्राम हंसून म्हणाला.

" खरंच ! " त्याला विलक्षण हर्ष झालेला दिसला.

" हो. मेरा, मला आतां तिकडेच गेलं पाहिजे. संग्राम, मी आज रात्रींच राजदुर्गाकडे जाणार आहे, कारण मी इकडे दहापंधरा दिवस गुंतून राहिल्यामुळं तिकडे काय प्रकार घडला हें कळत नाहीं.''काळजीच्या स्वरानें चंद्रसिंह म्हणाला.

" होय, कुमार, लवकर गेलंच पाहिजे. मीहि येतों आपल्या बरोबर. " इतक्यांत मानसिंग येऊन सांगूं लागला.

"कुमारसाहेब, राजदुर्गाकडून एक स्वार आला आहे व हें जरूरीचं पत्र आपल्याला राजेसाहेबांनीं दिलं आहे. '' असें म्हणून त्यानें पत्र पुढें केलें. चंद्रसिंहानें घाईनेंच तें वाचलें.

" संग्राम, चल, आतांच मी निघणार. '' तो एकदम उठून म्हणाला. संग्रामहि त्याच्याबरोबर जावयास तयार झाला.

## प्रकरण ३६ वें

# तरुण वीर कोण ?

चंद्रसिंहाला हरपालदेवानें लिहिलें होतें कीं, राजकुंवर जोरावरला न दिल्यामुळें तो चिडून दोन अडीच हजार सैन्य घेऊन राजदुर्गाला वेढा देऊन बसला आहे. आम्ही थोडे दिवस अद्याप किल्ला लढवूं, पण तुम्ही शक्य-तितक्या लवकर मदतीला या. '' पत्र वाचतांच चंद्रसिंह तात्काल राजदुर्गाला जावयाला सिद्ध झाला. त्यानें रामसिंगास सांगून पाठविलें व हजार बाराशे सैन्याला निघण्याला हुकूम सोडला. स्वतः रामसिंगहि बरोबर निघाले. क्षणाचीहि विश्रांति न घेतां ही मंडळी तिसरेच दिवशीं राजदुर्गासमीप येऊन पोंचली.

जवळ जवळ पंधरा दिवसांपासून जोरावरनें राजदुर्गाला वेढा दिला होता. हरपालदेव उघड सामना देत नव्हते. फक्त जोरावरच्या हल्ल्याचा प्रतिकार करावयाचा एवढेंच धोरण त्यांनीं स्वीकारलें होतें. जोरावरशीं उघड संग्राम करण्याचें त्यांचें सामर्थ्य नव्हतें. चंद्रसिंह मदतीला येईपर्यंत जोरावरला थोपवून धरावयाचें या विचारामुळेंच लढाईचें काम दिरंगाईनें चाललें होतें. "राजकुंवर आम्हाला सोंपा म्हणजे आम्ही जातों. '' असा निरोप नित्य जोरावरकडून

येत असे व हरपालदेव कांहींच उत्तर पाठवीत नसे. दोनचार दिवसांत आपोआप राजकुंवर आपल्याला देतील असें जोरावर मनांत मांडे खात होता. राजकुंवर कोठें जाणार आहे ? असें त्याला वाटत होतें, परंतु पंधरा दिवस होऊन गेले तरी हरपालदेव लढाईला बाहेर येईना व राजकुंवरहि स्वाधीन करीना ! तेव्हां तो अगदीं चिरडीस गेला.

राजदुर्ग किल्ला चांगला मजबूत असल्यामुळें तो सहज हातीं येण्यासारखा नव्हता. एकदम हल्ला केल्यानें किल्ला सर होणार नाहीं हें जोरावर जाणून होता. परंतु आता अधिक दिवस घालविण्यांत अर्थ नाहीं असें वाटून त्यानें आपल्या सैन्याची चागली तयारी केली व हरपालदेवास निर्वाणीनें कळविलें कीं, सूर्योदय होतांच राजकुंवर आमच्या शिबिरांत पाठवून द्या नाहीं तर आम्ही उद्याच्या उद्या किल्ला व राजकुंवर लढून घेणार." आता मात्र हरपालदेवास धास्ती पडली !

जोरावरचा वेढा पडतांच हरपालदेवानें एक पत्र विश्वासू माणसाबरोबर चंद्रसिंहाला चितोडला पाठवून दिलें होतें. परंतु अद्याप चंद्रसिंह न आल्यामुळें आपला निभाव जोरावरपुढें कसा लागेल ? अखेरीस तो आपल्या देखत आपल्या मुलीला घेऊन जाईल कीं काय ? अशी त्याना भीति वाटूं लागली. इकडे दोलतासिंग वगैरे जे सरदार लढाईच्या विरुद्ध होते ते म्हणूं लागले कीं, कोणी तरी एक उपऱ्या मनुष्य मी चितोडचा कुमार चंद्रसिंह आहे म्हणून सागून राजकुंवरला नेण्याचा प्रयत्न करून गेला. राजकुंवर सहज न मिळाल्यामुळें तो कांहीं तरी निमित्तानें पळाला. त्याच्या बळावर आपण संग्रामाला सिद्ध झालांत हें चांगलें केलें नाहीं व अखेर याचा परिणाम काय होणार तो दिसतोच आहे ! राजकुंवरला तर जोरावर नेणारच पण राजदुर्गाचा सर्वस्वी नाश होणार !

दोलतासिंग तर उघड उघड हरपालदेवाच्या तोंडावर तसें म्हणून त्यांचा उपहास करूं लागला. आपण उतावळेपणानें अविचार केला नाहीं ना ? असें आतां हरपालदेवालाहि वाटूं लागलें. दोन्हींकडून त्यांची कुचंबणा होऊं लागली. आतां माघार घेणेंहि प्रशस्त वाटे ना ! कांहीं झालें तरी हरकत नाहीं परंतु उद्याचे जोरावरावर तुटून पडावयाचें हा एकच विचार हरपालदेवाच्या मनांत अनेकवार येत होता.

आपल्या पित्याची एकंदर परिस्थिति कळून राजकुंवरला अत्यंत वाईट वाटूं लागलें. या सर्व अनर्थाचें मूळ आपण आहोंत यामुळें तिला आपला स्वतःचाच तिरस्कार वाटूं लागला. कुमार चंद्रसिंह अद्याप मदतीला येत नाहींत, तेव्हां त्यांना आपली तितकी जरूरच नसावी. आपण पत्र लिहिलें म्हणून आपल्याला मदत करण्याचा त्यांनीं उदारपणा दाखविला इतकेंच, परंतु आपण त्यांच्या बरोबर न गेल्यामुळें कदाचित् त्यांना आपला रागहि आला असेल. आपल्यासारख्या कुमारिकेनें एका परक्या तरुणाला पत्र लिहिणें हेंच मुळीं गैर होय. असे अनेक प्रकारचे कल्पनातरंग मनांत उद्भवून तिला अगदीं उदास वाटे.

“ कुंवरबा, आज तुम्ही अशा उदास कां बरं दिसतां ? ” चंदानें तिला प्रश्न केला.

“ चंदा, ” दीर्घ श्वास सोडून ती म्हणाली. “ माझ्यामुळं पिताजीवर केवढं घोर संकट आलं आहे ? मला खरोखरीच मुळींच चैन पडत नाहीं ! चंदा, बाहेर तो जोरावर रणकुंड पेटवून बसला आहे अन् इकडे आपलेच सरदार दुरुत्तरांनीं त्यांच्या हृदयाला भाजून काढीत आहेत. मी त्याच वेळीं माझ्या जिवाची आशा केली नसती तर आज हा प्रसंग त्यांच्यावर आला नसता. चंदा, माझ्याच मुळं रणकुंड पेटलं आहे, तेव्हां मीहि पण उद्यां सर्वांबरोबर त्यांत उडी घेणार व एकदाचं या देहाचं विसर्जन करणार. ही गोष्ट तूं कोणाला सांगूं नकोस. ”

“ काय म्हणतां ? ” घाबरून चंदा म्हणाली. “ कुंवरबा, तुम्ही लढाईला जाणार ? ”

“ हो. मी उद्यां लढाईला जाणार. ” ती शांतपणें म्हणाली. “ चंदा, पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि लढाईचं शिक्षण रजपुत देत असतात, हें तुला माहीत आहे अन् माझ्या पिताजींनीं मला थोडंसं शिक्षण दिलंहि आहे. घोड्यावर बसणं अन् पट्ट्याचा हात फिरविणं रजपुत स्त्रीला अवश्य यावंच लागतं. ”

“ अहो,पण तुम्ही अनायासेंच त्यांच्या हातांत सांपडाल याची काय वाट ? तुमची ही कल्पना मला पटत नाहीं. ” चंदा मान हलवून म्हणाली.

“ वेडी नाहीं तर ? चंदा, मी अशा स्त्रीवेषांतच जाणार आहे वाटतं ? ” ती हंसून म्हणाली. नंतर तिनें चंदाच्या कानांत आपला बेत सांगून म्हटलें. “पहा बरं, इतक्यांत कोणाला कळवूं नकोस.नाहीं तर भलताच प्रकार होईल.”

पहांट होण्यापूर्वीच आपल्या सैन्याला दरवाजा उघडून जोरावराच्या सैन्यावर तुटून पडावयाची हरपालदेवानें आज्ञा दिली. हरपालदेवाचे सातशें आठशें लोक अकस्मात् जोरावरवर तुटून पडले. जोरावरचे सैनिक जंगलांत तळ देऊन राहिले होते व दिवस थंडीचे असल्यामुळें त्यांना थंडीचा अतिशय त्रास होत होता. ठिकठिकाणीं रात्रीं केलेल्या शेकोट्या कुडींतून निघून गेलेल्या प्राणाप्रमाणें आतां निर्जीव दिसत होत्या. सैनिक अद्याप झोंपेंतच होते. तोंच शत्रूचा जोराचा हल्ला आला व एकच गोंधळ आणि गर्दी उडून गेली. चोहींकडून ' महाकालेश्वरकी जय ' म्हणून जयनाद निघूं लागला. जो तो आपाआपलीं वस्त्रें सांवरून, शस्त्रें हुडकूं लागला व जें दिसेल तें शस्त्र घेऊन लढूं लागला. अर्धवट जागृतीमुळें आपण शत्रूला मारतों कीं मित्राला मारतों याचेंहि त्या यवनसेनेला भान राहिलें नाहीं. जोरावर गडबडीनें कशी तरी वस्त्रें घालून घोड्यावर स्वार होऊन आपल्या लोकांनां प्रोत्साहन देण्यास निघाला. त्यानें कसेंबसें आपले सैनिक एकत्र करून लढाईला तोंड दिलें व आतां खरी हातघाईची लढाई सुरू झाली.

युद्धाला निघते वेळीं हरपालदेवानें थोडेसे लोक मागें किल्ल्यांत ठेवले होते. लढणें शक्य नाहीं असें दिसतांच आम्ही केसरी निशाण दाखवूं. ती खूण दिसतांच किल्ल्यांतील जवाहिर व स्त्रिया यांना अग्नींत भस्म करून लढाईचा शेवट करावा असा हुकुम हरपालदेवानें देऊन ठेवला होता. राजस्त्रियांनीं जोहाराची तयारी चालविली.पण या सर्व अनर्थाचें मूळ राजकुंवर ती कोणाच्याच दृष्टीस पडली नाहीं.

इकडे किल्ल्याखालीं जोरावरावर हरपालदेवाचा हल्ला इतक्या आकस्मिक व जोराचा पडला होता कीं, क्षणभर हरपालदेवाचाच जय होणार असें चिन्ह दिसूं लागलें.आपलें सैन्य संख्येनें अधिक असून या मूठभर लोकांनीं आपणास पराजित करावें याचा जोरावरला भयंकर संताप आला तेव्हां त्यानें निकरानें हल्ला करावयास आपल्या लोकांना हुकूम दिला. पुनः बाजू उलटली. त्या असंख्य सैनिकांपुढें या थोड्या रजपुतवीरांचें बळ किती वेळ चालणार ? हरपालदेवाचे सैनिक पटापट खालीं पडूं लागले. आपले लोक क्षणाक्षणांत कमी होत आहेत हें पाहून आपला निभाव फार वेळ लागणार नाहीं याची खात्री हरपालदेवास वाटूं लागली. सूर्योदय झाला होता, आपली बिकट परिस्थिति ओळखून

लूणेचें केशरी निशाण उभारावयास ते आज्ञा देणार तोंच समोरच्या दाट झाडांतून असंख्य घोडेस्वार येतांना दिसूं लागले. युद्धाची धुमश्चक्री पाहून नवीन येणाऱ्या स्वारांनीं “ भगवान् एकलिंगजी कीं जय ! ” म्हणून गगन-भेदी गर्जना केली. सर्वांच्या पुढें आपल्या आवडत्या अश्वावर कुमार चंद्रसिंह होता. त्याला पहातांच हरपालदेवाला विलक्षण उत्साह वाटून त्यांनीं गर्जना केली, ‘ महाकालेश्वर की जय ’ चितोडच्या वीरांनीं एकलिंगजीच्या नांवानें जयनाद केला. महाकालेश्वर व एकलिंगजीच्या नांवांचा जयनाद परस्परांत मिसळून गेला.

हरपालदेवाला नवीन कुमक मिळतांच लढाईचें पारडें फिरलें. चितोडच्या शूर वीर ताज्या दमाच्या लोकांपुढें जेरावरचे लोक टिकाव धरूं शकले नाहींत. चंद्रसिंह जोरावरला शोधूं लागला. थोड्या अंतरावर जोरावरचें व एका तरुण सरदार-पुत्राचें मोठ्या आवेशानें युद्ध चाललें होतें. तो तरुण इतक्यां शौर्यानें लढत होता कीं, त्याच्याकडे पाहून चंद्रसिंहाच्या मुखांतून प्रशंसोद्गार निघाले,

“ शाबास, वीरपुत्रा ! शाबास ! ”

चंद्रसिंहाचे उद्गार ऐकून त्या योद्धयाला विलक्षण स्फुरण चढलें आणि तो अधिक उत्साहानें जोरावरावर हल्ला करूं लागला.

“ तरुण वीरा, तुझें शौर्य पाहून मीहि खुष झालों, पण तुझ्या या बाललीला आतां पुरे झाल्या. माझ्या एका प्रबल आघातानें तुझ्या नाजुक देहाचे खंडविखंड होऊन जातील.” आढ्यतेनें जोरावर म्हणाला. पण तो तरुण एकहि शब्द न बोलतां जोरावरच्या अंगावर त्वेषानें चाल करून गेला. त्यानें आपल्या भाल्याचें टोंक जोरावरच्या हृदयाला भिडविलें. इतक्यांत त्याच्या मागून एका सैनिकानें त्याच्या हातावर आपल्या तलवारीचा जोरानें घाव केला. प्रहार होण्यापूर्वींच चंद्रसिंहानें त्या सैनिकावर आपल्या तलवारीनें प्रहार करुन तरुणावर होणाऱ्या प्रहाराचा प्रतिकार केला. सैनिक गतप्राण होऊन खालीं पडला; परंतु तलवारीचा निसटता वार तरुण योद्धयाच्या दंडाला लागला व त्यांतून रक्तहि येऊं लागलें. त्या वेदनेनें त्याच्या हातांतून भाला गळून खालीं पडला. जोरावर आसुरी हास्य करून आपली तलवार पेलून त्याच्यावर चालून आला. त्याचा हात खालीं येण्या-पूर्वींच चंद्रसिंहाचा प्रहार जोरावरच्या तलवारीवर झाला व खणकन् आवाज होऊन जोरावरची तलवार कोठल्या कोठें उडून पडली ! आतां जोरावर निःशस्त्र झाला होता. त्यानें आपल्याभोंवतीं पाहिलें तेव्हां आपल्या सैन्याचा

मोड झालेला असून आपल्या मदतीला जवळपास कोणीच नाहीं असें दिसलें. त्याचा रणमद आतां मावळला. तो चांगला रणशूर होता, पण चंद्रसिंहापुढें त्याचें शौर्य निस्तेज भासूं लागलें. इतक्यांत 'जय एकलिंगजी की जय !" म्हणून रजपुत सेनेनें केलेला जयघोष ऐकून आपला पराभव झाला असें वाटून जोरावर तेथून जीव घेऊन पळूं लागला. त्याच्या मागें चंद्रसिंह व तरुण योद्धा हे दोघेहि त्वरेनें निघाले. जोरावरला जिवंत जाऊं द्यावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय होता. जोरावर आतां प्राणभयानें वायुवेगानें अश्व पिटाळून पळूं लागला. हे दोघे वीरहि त्याच्या मागें भरधांव अश्वारूढ धांवूं लागले. तिघेहि रणक्षेत्रापासून बरेच दूर गेले. तरुण वीराला दोन चार जखमा होऊन त्यांतून रक्तस्राव होत होता. आतां त्याला अधिक पळवेना म्हणून तो मागें राहिला.

चंद्रसिंह थोडासा पुढें गेला इतक्यांत तरुण स्वाराचा घोडा रिकामाच पुढें आला. त्याला तसा पाहून चंद्रसिंहानें मागें परतून पाहिलें तर तो वीर जमिनीवर पडलेला त्याला दिसला. त्याला तसाच टाकून जोरावरचा पाठलाग करणें योग्य नाहीं हें जाणून चंद्रसिंहानें आपल्या पुष्कराला मागें वळविला. त्यानें खालीं उडी टाकून त्या तरुणाकडे पाहिलें. तो बेशुद्ध होता. जवळच्या घनदाट झाडींत चंद्रसिंह त्याला उचलून घेऊन गेला. त्याला खालीं गवतावर निजवून जवळपास पाणी आहे कां म्हणून तो पाहूं लागला. कांहीं अंतरावर एक स्वच्छ पाण्याचा ओढा त्याला आढळला. पानाच्या द्रोणांतून पाणी घेऊन चंद्रसिंह त्या तरुणाजवळ आला, त्यानें थोडें पाणी त्याच्या मुखावर शिंपडलें, व थोडें थेंब त्याच्या मुखांत घातले. तरुण वीरानें क्षणभरानें आपले विशाल नेत्र उघडून चंद्रसिंहाकडे पाहिलें, त्याचा चेहरा आरक्त झाला व त्यानें आपले नेत्र घट्ट मिटून घेतले.

" तरुणवीरा, तुला आतां कसं वाटतं ? " त्याचा हात हातांत धरून स्नेहभरानें त्याच्याकडे पाहून चंद्रसिंह म्हणाला.

" महाराज, मला बरं वाटतंय. आपले उपकार–" कंपित स्वरानें तरुण उद्गारला पण त्याला मध्येंच थांबवून चंद्रसिंह म्हणाला. " मित्रा, उपकार कसले ? उपकार स्मरण्याची ही वेळ नव्हे. तुझ्या दंडाची जखम मला प्रथम बांधूं दे. तुझें शौर्य पाहून मी फार खुष झालों. तुझं नांव काय बरं ? "

तरुण आतां नीट उठून आदबीनें बसला होता. त्याच्या दंडाचें दुःख त्याला सहन होत नव्हतें असें त्याच्या गोऱ्यामोऱ्या मुखावरून दिसत होतें. चंद्रसिंहानें पुनः त्याचा हात ममतेनें हातांत घेतला. " मित्रा, मला तूं आपला मित्र समज. तुझी जखम पाहूं दे बरं ? " त्यानें चटकन् चंद्रसिंहाच्या हातांतून आपला हात काढून घेतला व तो कावराबावरा होऊन इकडेतिकडे पाहूं लागला. मृदुस्वरानें चंद्रसिंह म्हणाला " मित्रा, तूं असा बिचकूं नकोस. जखम कशी बांधावी हें मला ठाऊक आहे. फार वेळ रक्तस्राव झाला तर त्याचा परिणाम वाईट होतो. हं कर पाहूं हात इकडे ? " पुनः त्यानें आपला हात पुढें केला. परंतु तरुण लगबगीनं उठूं लागला. त्या गर्दीत मागच्या झुडुपाच्या फांदीला त्याच्या डोक्याचा मंदील अडकून तो बाजूला सरला. त्याची ती विलक्षण धांदल पाहून चंद्रसिंह आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागला. मंदील बाजूला सरतांच लांब भुंजगासारखी वेणी खालीं आली.आतां मात्र चंद्रसिंहाला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटून तो चमकला व स्तिमित भावानें त्याच्याकडे पहातच राहिला ! आपली पुरीच फाजिती झाली हें जाणून राजकुंवर लज्जित झाली व तिनें खालीं मान घातली.

राजकुंवर पुरुषवेषानें समरांगणांत आली होती. रजपुत रमणीप्रमाणें निमुटपणें अग्निकुंडांत प्रवेश करण्यापेक्षां रणकुंडांत उडी घेऊन दहापांच शत्रूंला लोळवून मगच प्राणार्पण करावा असा तिनें बेत केला व फक्त चंदाला सांगून ती सैनिकांच्या गर्दीत किल्ल्याबाहेर पडली. तिला पुरुषवेषांत कोणी ओळखूं शकलें नाहीं व कोणाला तितका अवकाशहि मिळाला नाहीं.

आपल्यापुढें पुरुषवेषांत एका तरुण स्त्रीला पाहून चंद्रसिंहाला जितकें आश्चर्य वाटलें, तितकाच आतां संकोच वाटूं लागला. राजकुंवराच्या मनाची स्थिति तर अगदीं चमत्कारिक झाली होती. " हे तरुण कुमारिके, तूं कोण आहेस हें मला कळेल कां ? " जिज्ञासा उत्पन्न होऊन चंद्रसिंहानें प्रश्न केला. त्यानें तिला ओळखलें नव्हतें.

" महाराज. " कंपित स्वरानें ती म्हणाली. " मी एक गरीब स्त्री आहे. मला या वेषांत पाहून आपल्याला आश्चर्य वाटणं सहाजिक आहे. परंतु पुरुषांनींच समर करावा अन् स्त्रियांनीं कां करूं नये ? असें वाटून मी हा वेष घेऊन समरांगणावर आले. "

" अन् तुझें अतुल शौर्य पाहून, रजपुत वीराप्रमाणें रजपुत वीरांगनाहि

तितक्याच शूर असतात हें माझ्या चांगलंच प्रत्ययाला आलं. माझ्या कुळांतल्या स्त्रिया अशा तुझ्यासारख्या शूर, वीर, धाडसी होत्या व आहेत."

"महाराज, आपल्या कुलाचा अभिमान जसा आपल्याला आहे तसाच मलाहि माझ्या कुलाचा अभिमान आहे. म्हणून म्हणतें इथं एकांतांत आतां फार वेळ गमावणं चांगलं नव्हे." आपल्याविषयीं तिचा भलताच ग्रह झाला आहे हें जाणून चंद्रसिंह म्हणाला. "तरुण कुमारिके, तूं कोणीहि ऐस, परंतु या चंद्रसिंहापासून तुला कसलंच भय नाहीं. तुला पुरुष समजून मी जो स्पर्श केला त्याबद्दल तूं मला क्षमा करशीलच. परंतु यापुढं माझ्या हातून तुझा अपमान होईल असं तूं मनांत आणूं नकोस." त्याचें मुख गंभीर झालें होतें. आपल्याला त्यानें ओळखलें नाहीं हें राजकुंवर समजली व हंसूं लागली.

"महाराज, न समजून आपण मला इथं घेऊन आलात, माझ्यासारख्या अविवाहित मुलीनं आतां काय करावं ?"

"होय. तो दोष माझाच आहे असं मी म्हणतों व तूं सांगशील तें प्रायश्चित्त घ्यायला मी तयार आहे."

राजकुंवर हंसत म्हणाली, "महाराज, आपल्या या दोषामुळं माझं केवढं नुकसान होणार आहे !"

"कोणतं ?"

"मी हरपाल देवाची कन्या असून मेवाडच्या राजसिंहासनाचा ज्यांनीं त्याग केला अशा श्रेष्ठ वीर पुरुषांशीं माझा विवाह होणार आहे, परंतु त्यांना ही गोष्ट कळतांच ते माझ्या सारख्या एका स्त्रीचाहि क्षणांत त्याग करतील."

चंद्रसिंह किंचित् स्मित करून म्हणाला, "तुझा अपराध नसतांहि?"

"आपल्यासारख्या परक्याशीं मी बोलत बसलें हा काय थोडा अपराध ? ज्यांना राज्याची देखील किंमत वाटली नाहीं त्यांना एका स्त्रीची काय किंमत वाटणार आहे?" राजकुंवरनें त्याच्याकडे सप्रेम पहात म्हटलें. चंद्रसिंह मृदु हंसूं लागला.

"राजकन्ये, तुझी आज्ञा होत असली तर मी देहान्त प्रायश्चित्त घ्यायला तयार आहे." राजकुंवर जमिनीकडे पाहूं लागली व तिच्या मुखावर आनंदाचें स्मित विलसूं लागलें. वर मान करून त्याच्या नजरेला नजर भिडविण्याचें ।रिष्ट तिला होईना !

" राजकुंवर, लग्नापूर्वी पुरुषवेषांत आपल्या भावी पतीची अशी एकांतांत भेट घ्यायची परमारकुळांत रीत आहे वाटतं ? "

" अन् लग्नापूर्वी भावी वधूला एकांतांत गांठून इतका वेळ अडवून ठेवायची शिसोदिया कुळांत रीत आहे वाटतं ? " राजकुंवर मधुर हास्य करून म्हणाली. नंतर ती नको नको म्हणत असतां चंद्रसिंहानें तिच्या दंडाची जखम बांधली व दोघेहि आपल्या घोड्याजवळ आले. चंद्रसिंहानें हात देऊन राजकुंवरला घोड्यावर बसविलें व आपण आपल्या पुष्करावर आरूढ झाला. दोघेंही प्रमुदित अंतःकरणानें परतलीं.जातां जातां राजकुंवरनें सर्व वृत्तांत त्याला सांगितला. तिच्या धाडसाचें, तसेंच शौर्याचें कौतुक व अभिमान त्याला वाटूं लागला. आपली निवड उत्कृष्ट ठरली याचें समाधानहि त्याला झालें.

## प्रकरण ३७ वें

# शेवटीं

चंद्रसिंह व पुरुषवेषांत राजकुंवर जोरावरच्या मागें गेल्यावर इकडे संग्रामसिंह, मानसिंग, हरपालदेव, वगैरे सर्वांनीं निकराचा हल्ला करून यवन सेनेचा अगदीं मोड करून टाकला. आपला सेनानायकच जीव घेऊन पळून गेल्याचें कळतांच इतर सैनिक सैरावैरा वाट फुटेल तिकडे पळूं लागले. हरपालदेवाला विजय मिळाला. त्यांनीं कुमार चंद्रसिंहाच्या नांवाचा जयनाद केला, त्यावेळीं तें शब्द अगणित सैनिकांच्या कंठांतून निघून दशदिशा व्यापून राहिले. परंतु चंद्रसिंह त्या गर्दींत कोठेंच दिसेना म्हणून हरपालदेव वगैरेंस मोठी चिंता उत्पन्न होऊन सर्वजण त्याला शोधूं लागले. इतक्यांत समोरून चंद्रसिंह आणि राजकुंवर येतांना सर्वांस दिसले तेव्हां त्यांनीं पुनः चंद्रसिंहाच्या नांवाचा उच्चस्वरानें जयघोष केला. राजकुंवर तेथून झटकन् किल्ल्यांत निघून गेली. तिला कोणी ओळखूं शकलें नाहीं.

ऐन वेळीं चंद्रसिंहाची मदत मिळाल्यामुळें जोरावरला अपमानित आणि पराजित होऊन पळून जावें लागलें. हरपालदेवानें नंतर या सर्वांस मोठ्या

समारंभानें किल्ल्यांत नेऊन चितोडच्या वीरांचा व आपल्या सैनिकांचा गौरव केला.

नंतर हरपालदेवानें चंद्रसिंहास विनंति केली कीं आतां विवाह उरकून घ्यावा, त्यानें ती गोष्ट मान्य करून चितोडला राणी व राणाजी यांना बोलावून आणावयास संग्रामसिंहास पाठविलें. राणीसाहेब आल्यानंतर कुमार चंद्रसिंहाचा आणि राजकुंवरचा विवाह मोठ्या थाटानें झाला. चितोडच्या महाराण्याला शोभेल असा सढळ हातानें राणीनें खर्च केला.त्याप्रीत्यर्थ जिकडे तिकडे आनंदोत्सव साजरा करण्यांत आला.

× × × × ×

विवाहानंतर राजकुंवरसह चंद्रसिंह चितोडांत आला. आपल्या सिंहबापूनें लग्न केलें यामुळें वृद्ध भेरामणला परमावधीचा हर्ष झाला होता. चंद्रसिंहाच्या विवाहांत संग्रामसिंहाचाहि विवाह चंदाबरोबर झाला.

मानकुंवरचा पत्ता लागला नाहीं व ती कोणाच्या दृष्टीस पडली नाहीं. जयमल्लाचा एक हात तुटला होता व त्याला चंद्रसिंहानें कैद करून ठेवलेलाच होता. एके दिवशीं पहाटेस बंदिगृहाच्या पहारेकऱ्याकडे एक कृश व अशक्त स्त्री येऊन त्याला म्हणूं लागली कीं, " जयमल्ल माझा पिता असून त्याची मला क्षणभर भेट घ्यावयाची आहे. " प्रथम पहारेकरी तिचें म्हणणें कबूल करीना, परंतु तिनें अतिशय विनवणी केली तेव्हां त्याला तिची दया येऊन त्यानें तिला आपल्या समक्ष थोडा वेळ भेट घेऊं द्यावयाची परवानगी दिली. नंतर तो तिला घेऊन जयमल्लाच्या कोठडींत गेला. पहारेकरी दाराजवळ उभा होता, जयमल्लाला पहातांच त्या स्त्रीनें एकदम त्याच्याकडे धांव घेतली, ती काय करीत आहे हें कळण्यापूर्वींच जयमल्लानें एक हृदयभेदक किंकाळी फोडून तो जमिनीवर निचेष्टित पडला. त्याच्या कमरेंत एक लाथ मारून ती स्त्री त्वेषानें म्हणाली " चांडाळा, आपल्या कर्माचें फळ भोग आतां. " जयमल्लाच्या हृदयांतून रक्ताची धार वहात होती. त्या स्त्रीनें त्याच्या काळजांत कट्यार खुपसून त्याचा जीव घेतला होता. जयमल्लास लत्ताप्रहार देऊन तिनें झटकन् तीच कट्यार आपल्या हृदयांत खुपसून घेतली व तीहि मरणप्राय होऊन खालीं पडली. हा प्रकार इतक्या अल्पावकाशांत झाला कीं तो पहारेकरी आश्चर्यानें जागचेजागींच क्षणभर खिळून गेला. काय

करावें हें त्याला सुचेना. जयमल्लाची कर्कश किंकाळी ऐकून दुसरे एकदोघे शिपाई तेथें धांवून आले. नंतर ही हकीकत चंद्रसिंहाला कळविण्यांत आली. दोन्ही प्रेतें बाहेर आणल्यावर ज्या स्त्रीनें जयमल्लाचा बळी घेतला ती मानकुंवरच असल्याचें आढळून आलें. गरीब बिचारी! आपल्या शीलाचा नाश करणाराला मदत करणाऱ्या एका नराधमाचा सूड घ्यावयास मिळाला म्हणून तिला तितकेंच समाधान वाटलें असेल!

× × × × ×

चंद्रसिंहाच्या माऱ्यामुळें जोधराव पहाडांत पळून गेला होता. तेथें त्याचे फार हाल होऊं लागले. खरा दोष आपल्या पित्याचाच आहे हें त्याला कळत होतें. शेवटीं त्यानें चंद्रसिंहाकडे संधीचें बोलणें लावलें. आपला अपराध कबूल करून तो म्हणाला "माझ्या पित्यानें तुमचा घोर अपराध केला आहे, त्याची आतां मला क्षमा करा व माझा देश मला परत द्या. माझ्या देशांतला गोद्वार प्रांत मी तुम्हाला आनंदानें देतों." खरें पाहिलें तर दोष रणमल्लाचाच विशेष होता. हें जाणून चंद्रसिंहानें त्याचें म्हणणें कबूल करून त्याचा मारवाड त्याला सोंपला. जोधरावानें खुषीनें आपला गोद्वारप्रांत मेवाडच्या स्वामीला अर्पण केला.

जोधराव मोठा शूर योद्धा होता. पुढें त्याच्या नांवानें जोधपूर वसलें गेलें.

× × × × ×

चंद्रसिंहाच्या विवाहाला तीनचार महिने झाले होते, चैत्रीपौर्णिमा होती, चांदणें स्वच्छ पडलें होतें. सर्व विश्व स्फटिकवत् चांदण्यांत न्हात होतें, महालांतून दीपप्रकाश दिसत होता. चंद्रसिंह आपल्या चंद्रमहालाच्या गच्चीवर एका मंचकावर पडला होता, सोन्याच्या हुक्क्याची नळी त्याच्या ओठांत होती, मंचकावर पायथ्याशीं राजकुंवर बसली होती व ती क्षणांत वर गगनांत पूर्ण कलांनीं विकसित अशा चंद्राकडे पाही आणि क्षणांत जवळच्या चितोडच्या चंद्राकडे प्रेमभरानें पाही, तिच्या या खेळाकडे पाहून हंसत चंद्रसिंह म्हणाला, "राजकुंवर, काय चालवलं आहेस?"

"दोन चंद्रांची मी तुलना करतें." तीहि हंसून म्हणाली.

"म्हणजे, अस्मानांत दोन चंद्र कधींपासून उगवूं लागले?" वर पाहून तो म्हणाला.

"अस्मानांत एकच चंद्र आहे पण—"

" पण काय ? "

" म्हटलं. आकाशांतल्या चंद्रापेक्षां या भूलोकीचा चितोडचा चंद्र निष्कलंक आहे असं आपलं मला वाटतं. "

" हों. माझ्याजवळचा मुखचंद्र त्या अस्मानाच्या कलंकित चंद्रापेक्षां निष्कलंक आहे खरा." तो एकदम उठून बसला व त्यानें तिचे दोन्ही हात प्रेमभरानें धरून तिच्या मुखाकडे पाहूं लागला.

आपली दृष्टि खालीं करून ती मृदु हंसून म्हणाली. " छे! मी मला स्वतःला म्हणते वाटतं ? "

" मग कोणाला ? " तोहि स्मित करून विचारूं लागला.

" चंद्र कांहीं माझं नांव नाहीं. "

" हं. अस्सं होय ? हें कविविरुद्ध तुझं बंड आहे राजकुंवर. "

" कसं काय "? आपले तेजस्वी नेत्र त्याच्याकडे रोखून ती म्हणाली.

" आजपर्यंत फक्त सुंदर स्त्रियांच्या मुखचंद्राला कविलोक चंद्राची उपमा देत असत, परंतु आतां आम्ही दाढीमिशावाले पुरुषहि चंद्र बनूं लागलों म्हणजे झालंच, " मधुर हास्य करून चंद्रसिंह म्हणाला. " राजकुंवर, तूं माझ्या नुसत्या नांवावर भाळूं नकोस. "

" मी तुमच्या नुसत्या नांवावरच भाळलें नाहीं, पण तुमच्या हृदयचंद्रानें मला वेड लावलें. "

" राजकुंवर, आकाशांतील चंद्रापेक्षां तूं माझी योग्यता जास्त ठरवितेस, पण तो कलंकित चंद्र रात्रीच्या भागाला तरी आकाशाचा राजा असतो, पण तुझा हा निष्कलंकित चंद्र तर आपलें राज्य कायमचें गमावून बसला आहे. "

" महाराज, आपण राज्यत्याग केलात त्याबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं. स्त्रियांना जगानं लोभी ठरविल्या आहेत, परंतु सर्वच स्त्रिया तशा नसतात. आपण प्रतिज्ञेनं नाकारलेलं राज्य आपल्याला पुनः मिळावं अशा क्षुद्र बुद्धीची ही राजकुंवर नाहीं. मी मुंजभोजांच्या परमार वंशांत जन्म घेतला आहे अन् आतां बाप्पारावळांच्या पवित्र अशा शिसोदिया वंशाशीं निगडित झालें आहे. आपलं खरं कर्तव्य काय हें मला चांगलं कळतं. राजे तितके सुखी

असं असतं तर आजपर्यंत होऊन गेलेले व पुढं होणारे सर्व राजे सुखी ठरले असते. पण वस्तुस्थिति तशी नसते, उलट राजांना समाधान नसावं असंच मला वाटतं. आपल्या राज्यत्यागाबद्दल मीच तर काय पण आपले वंशज देखील कधींहि खेद तर करणार नाहींतच, पण पुनः चितोडचं राज्य आपल्याला मिळावं म्हणून प्रयत्नहि करणार नाहींत अशी माझी खात्री आहे." बोलतां बोलतां राजकुंवरचा चेहरा गंभीर झाला व सात्विक तेजानें चमकूं लागला.

आपल्या पत्नीच्या अंतःकरणाचा उदारपणा पाहून चंद्रसिंहाला फार समाधान झालें. सर्व वसुधातल, सर्व चराचर जीवसृष्टि सुधाकरच्या शांत सुधेंत डुंबत आहे असें त्याला वाटूं लागलें! त्याच्या सुधातुल्य किरणांचा शीतलपणा त्याला अधिक शीतल व रम्य भासूं लागला.

स्नेहभरानें राजकुंवरला जवळ घेऊन तो म्हणाला, "राजकुंवर, मी धन्य आहे!"

